






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका







महाराष्ट्र साहित्य पत्रिका
संपादक - श्री. ह. ल. निपुणगे
अंक - २८५ - एप्रिल - जून १९९८
" - २८६ - जुलै - सप्टेंबर ९८
" - २८७ - ऑक्टोबर - डिसेंबर ९८
(दिवाळी अंक १९९८)

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २८७, ऑक्टोबर-नोव्हेंबर डिसेंबर १९९८

दिवाळी अंक १९९८



## दशकातील कथाकार विशेषांक



सुमेध वडावाला



मिलिंद बोकील



रवींद्र शोभणे



सुबोध जावडेकर



सदानंद देशमुख



भा. ल. महाबळ



मेघना पेठे

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २८७ - ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर १९९८
दशकातील कथाकार विशेषांक-दिवाळी १९९८

◻

संपादक
हं. ल. निपुणगे

◻



◻

महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळक रोड,
पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी : ४७५९६३

---

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका







मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.
मुद्रणस्थळ : जंगम ऑफसेट, प्रा. लि., २५/१०, नांदेड फाटा, पुणे ४११ ०४१.
मुखपृष्ठ रचना : स. म. जंगम
संगणकीय अक्षरजुळणी : यशश्री एंटरप्रायजेस, कोथरूड, पुणे ४११ ०२९.
मूल्य : रुपये सत्तर    वार्षिक वर्गणी संस्थांसाठी : शंभर रुपये.
आजीव सदस्य शुल्क : रु. ५००/-    वार्षिक सदस्य शुल्क : रु. ५०/-
अंक क्र. २८७, ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर १९९८

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे.
या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी सा. सं. मंडळ किंवा राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

# संपादकीय



ह. ल. निपुणगे



प्रत्येक दशक नव्या आणि बदलत्या विचारांचे घडत असते. या दशकात नवे वाचक तयार होतात, तसेच नवे लेखकही तयार होत असतात. विचारांची दिशा बदलत असते. समाजाची जडण-घडण बदलत असते. साहित्यातही नवनवे प्रवाह येत असतात. साहित्याच्या विविध क्षेत्रांत- कादंबरी, कथा, चरित्रे, आत्मचरित्रे यांचेही नवे प्रवाह येत असतात. 'चारोळ्या' या काव्यप्रकारालाही याच दशकात गती मिळाली.

'कथा' या वाङ्मय प्रकारात या दशकात नेमके काय घडले, कोणते नवे कथाकार गतिमान झाले, त्यांच्या कथालेखनाचा प्रकार कोणता होता, या सर्वांचा शोध घेणे आवश्यक वाटले आणि म्हणूनच 'दशकातील कथाकार' विशेषांकाची योजना झाली.

कथा या वाङ्मय प्रकाराची निर्मिती मोठ्या प्रमाणात होत असते. काव्य-कवितेच्या खालोखाल ती असते. लघुकथा आणि दीर्घकथा हे दोन प्रकार त्यात असतात. ज्याप्रमाणे अनेक नवे कवी उदयाला येतात आणि दर्जाचा फारसा विचार न करता अशा कविता समाजापुढे-वाचकांपुढे आणि श्रोत्यांपुढेही येत असतात, तसेच अनेक कथाकार उदयाला येतात. त्यांची एखाद-दुसरी कथा दैनिकांच्या साप्ताहिक आवृत्यांत प्रकाशित होते. त्यांच्याकडे हवे तेवढे सातत्य आणि अभ्यास नसतो. मग ते थांबतात. पण या सर्वांतूनच काही कथाकार पुढे येतात. ते आपले सातत्य जपतात, प्रयत्न करतात आणि हळुहळू त्यांच्या कथा विविध ठिकाणी प्रसिद्ध होतात आणि त्यांची साहित्यमूल्ये वाचकांच्या ध्यानात येतात. अर्थात त्याच दशकात त्यांचे कथासंग्रह प्रकाशित होतात असे नाही, तर कथासंग्रह प्रकाशित व्हायला पुढचे दशकही उजाडते. थोडक्यात चांगले कथाकार समाजापुढे यायला दोन दशकांचा कालावधी लागतो.

कथासंग्रह प्रकाशित झाल्यावर वाचकांच्या प्रतिक्रिया तसेच समीक्षकांचे अभिप्राय यायला काही कालावधी लागतो. कदाचित संग्रहाला पारितोषिकही मिळून जाते.



अनुक्रमणिका






एवढा सगळा काळ, या कथा-लेखकाला सतत नव्या विषयांचा शोध घेऊन आपली कथा विकसित करण्याचा प्रयत्न करावा लागतो. यात ग्रामीण कथा, शहरी कथा, सामाजिक कथा, विनोदी कथा, विज्ञान कथा, स्त्री-वादी कथा यातील एकाच विषयावर विशेष लक्ष ठेऊन कथा लिहिणाऱ्या लेखकांच्या कथा त्या त्या विभागात विशेष वाचकप्रिय होतात. अर्थात दहा वर्षांत दहा-बारा चांगल्या कथा लिहून, त्यांचा संग्रह काढून त्या संग्रहालाही विशेष लोकप्रियता आणि पारितोषिके मिळवणाराही एखादा कथालेखक असू शकतो.

दशकातील कथाकारांचा विचार करताना आम्ही या दृष्टीने विचार केला. कथांच्या विविध वाङ्मयप्रकारातून वेगवेगळ्या वाङ्मय प्रकारातील कथालेखकांची निवड केली. त्यांचे कथासंग्रह वाचून त्यातील चांगल्या कथांची निवड केली आणि अशा निवडक सात कथालेखकांच्या कथा त्यांच्या भूमिकांसह या अंकात सादर केल्या.

या कथा वाचताना या दशकातील कथालेखकांचा कल दीर्घकथा लिहिण्याकडे अधिक जाणवतो. कथाविषयांची निवडही कथालेखक खूप विचार करून, अभ्यास करून करतात, हेही लक्षात येते.

एका गोष्ट मात्र खटकली, राजकीय विषयांवर कथा लिहिण्याचे धाडस फारसे कथालेखक करताना दिसत नाहीत. मात्र सामाजिक विषयांकडे अनेक कथालेखकांचा ओढा दिसतो आहे. हे विषय त्यांनी परिश्रमपूर्वक हाताळलेले दिसतात.

विज्ञानकथा लिहिणारे अगदी मोजकेच लेखक दिसतात. विनोदी कथालेखक तर अगदी एखादं-दुसराच उदयाला आलेला आहे.

या दशकात कथालेखकांनी घेतलेले विविध वळण डॉ. अंजली सोमण यांनी आपल्या बीजलेखात सविस्तर चर्चा करून स्पष्ट केलेले आहेच. या अंकाचे संपादन करताना दशकातील कथाकारांची निवड करताना त्यांचे मला भरपूर सहकार्य लाभले आहे. कथाविषयाच्या त्यांच्या विशेष अभ्यासाची बहुमोल मदत झाली आहे.

कथांच्या विविध प्रकारांत नवनवे लेखक उदयाला येऊन मराठी साहित्यातील कथाविभाग अधिक समृद्ध आणि कसदार व्हावा, अशीच अपेक्षा आहे.

या अंकाबद्दल वाचकांनी आपल्या प्रतिक्रिया अवश्य कळवाव्यात.

ही दिवाळी आणि नवीन वर्ष सर्वांना सुखा-समाधानाचे आणि भरभराटीचे जावो, याच शुभेच्छा !

□



अनुक्रमणिका

# दशकातील कथाकार : सजग अनुभव !



डॉ. अंजली सोमण



स्वत:चे अनुभव इतरांना सांगण्याची आणि इतरांना आलेले अनुभव ऐकण्याची आवड माणसाला उपजतच असते. कथात्म साहित्याचा जन्म याच आवडीतून होतो. भारतीय परंपरेत कथात्म साहित्याची परंपरा खूप प्राचीन आहे. पण आरंभीच्या काळातील हे कथात्म साहित्य मौखिक स्वरूपाचे होते. इंग्रजांचे राज्य भारतावर सुरू झाल्यानंतर 'लघुकथा' या नव्या गद्य वाङ्मयप्रकाराची ओळख मराठी साहित्याला झाली आणि मराठीत अनेक कथाकारांनी आपल्या लेखनाने मराठी कथा वाङ्मय समृद्ध केले.

१८८० पासून मराठी कथेस सुरुवात झाली असे स्थूलमानाने मानले तर त्या नंतरच्या दर दशकात दोन चार महत्त्वाचे कथाकार मराठी कथासाहित्यावर प्रभाव टाकताना दिसतात. दर दशकात कथेचे स्वरूपही आधीच्या दशकाच्या तुलनेने थोडे बदललेले दिसते. कधी लेखनामागील प्रवृत्ती-प्रेरणा बदलतात, कधी प्रवृत्ती-प्रेरणा त्याच राहिल्या तरी कथेची धाटणी आणि तपशील बदललेले दिसतात.

१९८० ते १९९० या दशकात अनेक कथाकारांनी स्वत:ची नाममुद्रा मराठी कथेवर उमटवली होती. मराठी कथेच्या जडणघडणीत महत्त्वाचा वाटा असलेले 'सत्यकथा' हे मासिक ऑगस्ट १९८२ मध्ये बंद झाले. कथाकारांसाठी, विशेषत: नव्या शैलीने लिहू बघणाऱ्या नव्या कथाकारांसाठी हा मोठा धक्का होता. पण हीही पोकळी भरून निघाली. 'अनुष्टुभ', 'स्त्री', 'किर्लोस्कर', 'सत्याग्रही' इत्यादी नियतकालिकांतून आणि दिवाळी अंकांतून कथाकारांच्या कथा प्रसिद्ध होत राहिल्या. भारत सासणे आणि राजेंद्र बनहट्टी यांच्या दीर्घकथांनी या दशकावर प्रभाव टाकला. सासण्यांच्या कथेत नियतीची मानवी जीवनावरील पकड आणि जीवनातील अतर्क्यता आणि गूढता हे घटक सूक्ष्म पद्धतीने व्यक्त होत राहिले. बनहट्टींनी आपल्या दीर्घकथांतून मध्यमवर्गीय जीवनातले वेगवेगळे कंगोरे मांडले. रंगनाथ पठारे यांचे या दशकात दोनच कथासंग्रह प्रसिद्ध झाले. पण त्यांनी कथेच्या संदर्भात बरेच प्रयोग केले. अर्धशहरी आणि अर्धग्रामीण भागातील बदलते वातावरण आणि समाजाच्या विविध क्षेत्रांतील भ्रष्टाचार त्यांनी आपल्या चिंतनाचा विषय बनविला. राजीव नाईक यांनी 'मोकळा' या कथासंग्रहातून कथेच्या तंत्रात विविध प्रयोग केले. लहान-मोठे आकार, कधी प्रथमपुरुषी निवेदन तर कधी तृतीयपुरुषी निवेदन, कधी आठवणी तर कधी संज्ञाप्रवाहांची, स्वप्नांची गुंतागुंत यांतून त्यांच्या या संग्रहातील कथा व्यक्त होत गेल्या. गौरी देशपांडे, सानिया, प्रिया तेंडुलकर, आशा बगे या कथालेखिकांनी स्त्रियांच्या नव्या जाणिवा



अनुक्रमणिका

मांडून १९८० ते ९० हे दशक समृद्ध केले.

१९९० ते २००० या कथादशकाला अशी समृद्ध पूर्वपीठिका लाभलेली आहे. विसाव्या शतकातील या शेवटच्या दशकातही जीवनातील विविधांगी आणि तळस्पर्शी अनुभव मांडणारे, शैली आणि अविष्कार यांचे विभिन्न प्रयोग करणारे काही समर्थ कथाकार निर्माण झालेले दिसतात. मिलिंद बोकील, प्रकाश नारायण संत, सुमेध वडावाला, रवींद्र शोभणे, मेघना पेठे, सदानंद देशमुख या ह्या दशकातील कथाकारांचा आवर्जून उल्लेख करायला हवा. ह्या सर्वांनी अतिशय मनापासून आणि गांभीर्याने लेखन केले आहे, हे त्यांच्या लेखनाचे प्रथमत: जाणवणारे वैशिष्ट आहे. सजगपणे जगत असताना त्यांना अस्वस्थ करणारे विचार आणि चिंतन करायला लावणारे अनुभव त्यांनी आपल्या कथांमधून शब्दबद्ध करायचा प्रयत्न केलेला आहे.

१९८० नंतरच्या कथेने वर्तमानकालातील गुंतागुंतींना सामोरे जाऊन त्यांना थेटपणे भिडणे हे आपले लक्ष्य मानले होते. १९९० नंतरची कथाही हेच उद्दिष्ट घेऊन पुढे प्रवास करताना दिसत आहे. त्यामुळे सामाजिक वास्तवातील घटना घेऊन त्यांचे 'रिपोर्टाज्'च्या पद्धतीने चित्रण करणारे प्रवीण पाटकर यांचे या दशकात दोन संग्रह प्रसिद्ध झाले. त्यातील 'फिल्डवर्क' (१९९०) विशेष गाजला.

सामाजिक प्रश्न व त्यातून निर्माण होणाऱ्या व्यक्तिगत समस्या, सामाजिक प्रश्नांच्या गुंतागुंती आणि त्या सोडवताना तरुण कार्यकर्त्यांना येणारी उद्विग्नता, समतेसाठी चाललेल्या चळवळी आणि आंदोलने आणि या प्रयत्नांना न जुमानता समाजात टिकून राहिलेली विविध स्तरांवरील विषमता असे अनेक विषय पाटकरांच्या कथासंग्रहातून व्यक्त होताना दिसतात.

प्रवीण पाटकर हे व्यावसायिक सामाजिक कार्यकर्ते आहेत. आपल्या 'केस-स्टडीज'चा वापर त्यांनी आपल्या काही कथांसाठी केला असावा, हे लक्षात येते. सामाजिक प्रश्नांकडे पाटकर अतिशय सजगतेने पाहातात. त्यांची कथा वाचकांना जीवनाची नवी रूपे दाखवते आणि प्रसंगी चिंतनशीलही बनवते. पण बरेच वेळा 'रिपोर्टाज'च्या पद्धतीने केले गेलेले हे लेखन कथेला आवश्यक असलेला जीवनविषयक संघर्ष उभा करण्यात किंवा विविध स्वरूपी व्यक्तिरेखा रंगवण्यात पुरेसे यशस्वी झालेले दिसत नाही.

मिलिंद बोकील हे या दशकातील एक महत्त्वाचे लेखक. त्यांचे सामाजिक भान लक्षवेधी आहे. मिलिंद बोकील यांना अतिशय तलम-पारदर्शी शैली लाभलेली आहे. त्यांच्या कथा आकाराने दीर्घ असतात. कारण त्यांच्या कथेचा आशय अतिशय वजनदार असतो. बोकीलांच्या कथेचे वैशिष्ट्य हे की त्यांची कथा मध्यमवर्गीय कौटुंबिक आशयाभोवती घुटमळत राहात नाही तर समाजातल्या विविध स्तरांत ती फिरते. वेगवेगळे व्यवसाय आणि वेगवेगळी जीवनदृष्टी असणाऱ्या माणसांच्या आंतरिक घालमेलीचा त्यांची कथा वेध घेण्याचा प्रयत्न करते. सध्याच्या सामाजिक चळवळी व त्यात काम करणारे सामाजिक कार्यकर्ते यांमध्येही त्यांची संवेदनशीलता रस घेते. सामाजिक चळवळीतील विविध ताण आणि सामाजिक कार्यकर्त्यांच्या मनात खोलवर रुतून बसलेल्या वेदना याभोवतीही त्यांची कथा रुंजी घालते. समकालीन वास्तवाचे आगळे, सूक्ष्म दर्शन ती वाचकांना घडवते.



अनुक्रमणिका



अंजली अरुण सोमण

शिक्षण : एम्. ए. (मराठी) श्री. ना. दा. ठाकरसी विद्यापीठात सर्वप्रथम

पी.एच्. डी. (श्री. ना. दा. ठाकरसी विद्यापीठ) पी.एच्. डी.साठी अनुदान मंडळाची शिष्यवृत्ती.

व्यवसाय : श्री. ना. दा. ठाकरसी कलावाणिज्य महाविद्यालयात भाषा व साहित्य यांचे अध्यापन.

**ग्रंथ**

**स्वतंत्र :**

१) साहित्य आणि सामाजिक संदर्भ (समीक्षा)

२) मराठी कथेची स्थितिगती (राज्यशासनाचा समीक्षाविषयक पुरस्कार)

३) बंदिश (कादंबरी) म. सा. परिषद, पुणेचा दि. बा. मोकाशी पुरस्कार सहकार्याने

४)Learning Marathi (अमराठी भाषकांसाठी मराठीचा अभ्यास)

५) भाषाविज्ञान परिचय

**संपादित :**

१) तिमिर भेद (अंधश्रद्धा निर्मूलन विषयक लेख)

२) विस्तारलेले क्षितिज (स्त्री-कथाकारांच्या निवडक कथा)

३) भाषाविज्ञान : वर्णनात्मक आणि ऐतिहासिक

४) वर्णनात्मक भाषाविज्ञान : स्वरूप आणि पद्धती

५) भाषांतर मीमांसा

**कथेचा विशेष अभ्यास :**

१) १९७५ साली पीएच्. डी.च्या संशोधनासाठी 'स्त्रियांचे कथालेखन (इ. स. १८८० ते १९७५) हा विषय निवडला. त्या काळात स्त्रियांच्या कथालेखनाचा स्वतंत्रपणे फारसा अभ्यास होत नव्हता, उलट त्यावेळी समीक्षक मराठी लेखिकांविषयी 'चिंता आणि चिंतन' करत होते. मराठी कथेच्या दृष्टीने महत्त्वाच्या असलेल्या पण वाङ्मयेतिहासात ज्यांची योग्य ती दखल घेतली जात नाही, अशा काही कथालेखिकांचा या प्रबंधात विस्ताराने विचार केला आहे.

२) मराठी कथेची स्थितिगती (१९९५) या ग्रंथात गेल्या शतकातील मराठी कथेचा सामाजिक संदर्भलक्ष्यी अभ्यास मांडला आहे. 'कथा' या वाङ्मय प्रकाराकडे वाङ्मयीन दृष्टिकोनातून येथे बघितलेले आहेच, पण स्त्रियांची कथा, दलित कथा, ग्रामीण कथा इत्यादी कथा विशेषांचा अभ्यास करताना या प्रवाहांमागील सामाजिक स्थितिगतीचाही वेध घेण्याचा प्रयत्न केला आहे.

अशा वैशिष्ट्यांनी युक्त असलेला त्यांचा 'उदकाचिया आर्ती' हा पहिलाच संग्रह लक्षवेधी ठरला आणि पारितोषिके मिळवून गेला. सामाजिक चळवळीमध्ये 'फुलटायमर' असलेल्या शशिकांतची वेदना त्यांनी 'भावी इतिहास' कथेत रंगवली आहे. खेड्यांतील माणसांमध्ये क्रांतिकारी जाणीव निर्माण करण्यासाठी तो भटकत राहातो. सुमा त्याच्या या क्रांतिकारी ऊर्मी समजून घेऊ शकत नाही. पण ती त्याचा संसार करते. सामाजिक कामामुळे तो संसाराकडेही धड लक्ष देऊ शकत नाही. मोर्च्यामध्ये भर उन्हात पायात चपला न घालता तो चालत राहातो. कारण मोर्च्यातल्या अनेकांच्या पायात चपला नसतात. 'मजुरांच्या एकजुटीचा विजय असो' अशा घोषणा देणाऱ्या मोर्चेकऱ्यांतील आपापसातली भांडणे बघून त्याच्या मनात स्वतःच्या सामाजिक कामाविषयीच वैफल्य दाटून येते. मोर्चावर झालेल्या लाठीमारात जखमी होऊन तो बेशुद्ध पडतो. शुद्धीवर आल्यानंतर दवाखान्यातले डॉक्टर आपल्याला ओळखतात आणि आपल्या कामाची ते किंमत करतात हे जाणवून त्याला थोडी उभारी येते. काम संपवून तो घरी परततो तेव्हा सुमा बाळंत व्हायला हॉस्पिटलमध्ये गेलेली असते-जन्मलेल्या आपल्या नवजात बालकाला जवळ घेतल्यानंतर त्याला जाणवते की या बालकाच्या स्पर्शातून आपल्याला एक प्रेरणा स्रोत मिळत आहे. उद्यासाठी, भविष्य काळातील उभारीसाठी! शशिकांतच्या मनातील अशी द्वंद्वे बोकील या दीर्घकथेत नेमकेपणाने टिपतात. 'उदकाचिया आर्ती' या त्यांच्या दुसऱ्या कथेत नवऱ्याच्या पैशाच्या गैरव्यवहारांची चीड येऊन घराबाहेर पडलेली आणि धरणग्रस्तांच्या प्रश्नात आपल्या जीवनाचे सारसर्वस्व शोधणारी रोहिणी ते अशाच ताकदीने रंगवतात. 'भूमी' या कथेत परदेशातून भारतात येऊन राहिलेल्या आणि खेड्यांतील रचनात्मक कामाला सहकार्य करणाऱ्या फादरच्या निमित्ताने बोकील सामाजिक कामाची एक वेगळी बाजू रंगवतात. या सर्व कथा वाचताना सामाजिक चळवळींशी बोकीलांचा निकटचा संबंध असावा, किमान त्यांचे निरीक्षण तरी सर्वस्पर्शी असावे असे वाटत राहाते.

'चक्रव्यूह,' 'ओझं,' 'लेमन ट्री,' इत्यादी कथांमधून बोकील स्त्री-पुरुष संबंधाचा वेगवेगळ्या बाजूंनी वेध घेतात. स्त्री-पुरुष संबंधांवर असलेले सामाजिक दडपण, अशा संबंधात कधी दोघांमध्ये निर्माण होणारी जवळीक, कधी परस्परांच्या स्वभावांतील कंगोऱ्यांमुळे निर्माण होणारा दुरावा तर कधीतरी जाणवणारे तुटलेपण हे सर्व पैलू बोकील अतिशय भावस्पर्शी पद्धतीने टिपतात. 'विदेश' ही कथा विशेष लक्षवेधी वाटते. चंद्रशेखर अमेरिकेत मोठ्या पगाराच्या नोकरीवर असतो. सीमाशी लग्न करून तो तिला अमेरिकेत घेऊन जातो. दोन वर्षांतच सीमा 'अमेरिकनाईझ्ड' व्हायला लागते. अमेरिकेत 'मास्टर्स' करत असताना ती प्रोफेसर डेव्हिड स्टॅनफर्डबरोबर रात्री घालवायला लागते आणि शेवटी घटस्फोटाच्या दिशेने तिचा प्रवास सुरू होतो. या घटनाचक्रात व्यथित झालेल्या चंद्रशेखरच्या मनात 'आपण कशासाठी अमेरिकेला आलो? हे असले आयुष्य जगायला का?' असे प्रश्न त्याच्याही नकळत निर्माण होत राहात. विदेशात स्थायिक झालेल्या भारतीय कुटुंबांच्या 'भारतीय' मनाची उलघाल बोकील अतिशय सखोलपणे या कथेत सादर करतात. जीवनाची सर्वांगीण जाण आणि नवे प्राण समजावून घेणारे आधुनिक आकलन मिलिंद बोकील यांच्यापाशी आहे. ते अशाच कथा लिहित राहिले तर मराठी कथेला निश्चितच समर्थ

रूप देऊ शकतील. बाह्य परिस्थितीनुसार बदलणाऱ्या नव्या नव्या प्रश्नांचा दमदारपणे मागोवा घेऊ शकतील.

बोकील सामाजिक प्रश्नांचे किंवा सामाजिक चळवळींचे इतक्या बारकाव्याने निरीक्षण करतात की प्रवीण पाटकरांप्रमाणे बोकीलांचे लेखनही 'रिपोर्टाज'च्या अंगाने जाऊ लागेल का अशी शंका काहींना येणे शक्य आहे. पण बोकील केवळ 'रिपोर्टाज' लिहिणारे किंवा सामाजिक वास्तव 'वापरणारे' लेखक नाहीत. सामाजिक वास्तवाची अतिशय प्रगल्भ जाण त्यांच्यापाशी आहे. सामाजिक परीवर्तनाच्या दिशेचे भान त्यांना असल्यामुळे उद्याच्या काही प्रश्नांचे संसूचनही त्यांच्या कथांमधून घडते. कथेतील व्यक्ती, मग त्या प्रमुख असोत की दुय्यम, बोकील त्यांना अतिशय दमदारपणे चित्रित करतात. माणसामाणसांतील आंतरसंबंधांचा ते अतिशय सूक्ष्मपणे वेध घेतात. व्यक्ती आणि समाजव्यवस्था यांच्यात असलेल्या संघर्षाचेही चित्रण बोकीलांच्या कथेत जागोजागी उमटते. सामाजिक वास्तवाची इतकी सर्वांगीण जाण रिपोर्टाज लिहिणाऱ्या लेखकापाशी नसते. ती प्रतिभावंतापाशीच असू शकते. बोकील प्रतिभावंताच्या जातकुळीतले लेखक आहेत.

प्रकाश नारायण संत यांच्या मोजक्याच कथा या कालखंडात प्रसिद्ध झाल्या. तरीही दशकातील कथाकारांचा विचार करताना संतांचा विचार आवर्जून करावा लागतो. त्यांच्या कथा लंपन या शाळकरी मुलाच्या भावविश्वाशी निगडित झालेल्या असतात. 'वनवास' हा त्यांचा कथासंग्रह पूर्वीच प्रसिद्ध झाला आहे. 'शारदा संगीत' हा त्यांचा अगदी अलीकडील कथासंग्रह. त्यात पाच दीर्घकथांचा समावेश आहे आणि या पाचही कथा लंपनभोवतीच केंद्रित झालेल्या आहेत.

संत यांच्या कथा आकाराने दीर्घ असल्या तरी तपशील उभे करण्याचे संतांचे सामर्थ्य आश्चर्य वाटण्याजोगेच आहे. लंपनची शाळा, त्याचे मित्र, लंपनची आजी, लंपन करत असलेल्या गंमतीजमती यांचे अतिशय सूक्ष्म चित्रण संत करत जातात. त्यामुळे कथेतील संपूर्ण अनुभवासच गोलाई येते. लंपन हा अतिशय हुशार, कलासक्त आणि संवेदनाशील मुलगा आहे. त्याने घेतलेले अनुभवही साहजिकच अतिशय तरल झाले आहेत. हा कल्पना लढवण्यात पटाईत असलेला मुलगा. त्याचं वाचनही दांडगं. तऱ्हेतऱ्हेच्या विचारांची लंपनच्या डोक्यात कायम गर्दी. जणू डोक्यात एखादा कापूस पिंजणारा पिंजारीच बसला आहे. लंपनचं वर्णन त्याच्याच शब्दांत करायचं तर 'माझी पार फुलवातच झाली होती. म्हणजे खाली वातीसारखा निमुळता मी आणि वरती मस्तपैकी पिंजून पिंजून फुललेलं माझं डोकं.

अशा फुललेल्या डोक्यानं लंपन अनेक अनुभव टिपत जातो. कधी 'आगगाडीचे रूळ' कधी 'राणीचा बाग' तर कधी 'घसरगुंडी' या सर्व कथांमधून लंपनची तल्लख बुद्धी सर्वत्र जाणवत राहाते. बालांचे मनोव्यापार, त्यांची निरागतसा, अनेक गोष्टींबद्दल त्यांना असलेलं कुतूहल, अर्धवट समजत असल्यामुळे बऱ्याच काही गोष्टी धूसर धूसर दिसणं - हे सारं प्रकाश नारायण संत नेमकेपणाने आपल्या कथांत टिपत जातात.

लंपनची त्या वयातली एका विशिष्ट भाषाशैली, प्रत्येक गोष्टीला 'मॅड' म्हणण्याची त्याची लकब इत्यादी गोष्टी संतांच्या कथालेखनाची वैशिष्ट्य ठराव्यात. एक लहान वयाचा मुलगा











आपले अनुभव सांगतो आहे हे भान संतांनी आपल्या लेखनात सतत बाळगलेले दिसते. त्यांच्या कथेच्या काही मर्यादा आहेतच. लंपनकडे कथा निवेदकाने अधिक लक्ष दिल्यामुळे कथेतील अन्य पात्रे धूसर राहाणे किंवा कथा पसरट बनणे, हे दोन दोष चटकन जाणवतात. अचूक तपशील देणारी भाषा, शैलीचा वेगळा बाज आणि अगदी वेगळा विषय यामुळे या दशकात संतांच्या कथांनी लक्ष वेधून घेतले. जुन्या पिढीच्या वाचकांना त्यांची कथा निश्चितच भावेल. पण ज्यांना हे वातावरण अपरिचित आहे अशा नव्या पिढीच्या वाचकांशी संवाद कसा जुळेल याविषयी शंका वाटत राहातात.

'सांजवा' (१९९३) आणि 'चांदणफुला' (१९९५) या दोन कथासंग्रहांनी सुमेध वडावाला वाचकांचे लक्ष वेधून घेतले. त्यांच्या कथा दीर्घ आणि वेगळ्या स्वरूपाच्या असतात. आधुनिकतेपेक्षा परंपरा वडावाला यांना अधिक भावत असावी असे त्यांच्या कथांचा आशय आणि अभिव्यक्ती लक्षात घेतल्यानंतर वाटत राहाते. त्यांच्या कथांमधील प्रश्नही नव्या जमान्यातले, नव्या जाणिवेने विचार करणाऱ्या स्त्री-पुरुषांमधील नसतात. हे प्रश्नही बरेच वेळा पारंपारिकच वाटतात. त्यांच्या कथांमधील वातावरणही बरेच वेळा कोकणामधील, जुन्या रूढी संस्कारांनी युक्त (उदा. तुळशी वृंदावन, ओसरीवर चालणारे कीर्तन-प्रवचन असे असते.) 'सांजवा' संग्रहातील कथांमधून त्यांनी मुख्यत्त्वे वृध्दांच्या समस्या मांडण्याचा प्रयत्न केला आहे. 'आषाढातले चांदणे' कथेत कोकणातल्या एका आडगावात राहाणाऱ्या नाना आणि माईंना आपली सून गरोदर आहे असे लक्षात येते. हे मूल आपल्या दिवंगत पुत्राचे नाही हे चाणाक्ष माईंना चटकन समजते. अशा वेळी नाना आपल्या व माईंच्या वासनेने भरलेल्या तारुण्याच्या आठवणी काढून माईंना सुनेकडे सहानुभूतीने आणि सबुरीने बघण्याचा सल्ला देतात. कथेचा हा विषय तसा वेगळा आहे. पण व्यक्ती, तिची अंतर्द्वंद्वे आणि वातावरण रंगवताना कथा अकारण दीर्घ बनत जाते आणि परिणामात उणी पडते. 'वासांसि जीर्णानि' कथेत वृध्दाश्रमात खितपत पडलेल्या बापूसाहेबांचे दु:ख सुमेध वडावाला रंगवतात. बापूसाहेबांच्या सुनेला ॲनीला पूर्णपणे स्वार्थी व बेबंद दाखवल्यामुळे बापूसाहेबांच्या व्यथेला खऱ्या अर्थाने टोक येऊ शकत नाही. संपूर्ण कथाभाग एकारलेल्या व्यक्तिरेखांनी भरलेला असल्यामुळे खोटा आणि जुजबी वाटू लागतो. तरुण पिढीचे प्रश्न समजावून घेण्यापेक्षा त्यांना व्यसनी व बेबंद रंगवण्याकडे या कथाकाराचा कल दिसतो. 'दान' कथेतील ('चांदण फुला') शुभंकर आणि शांभवी या जोडप्याची मुलगी शालिनी अशीच व्यसनी, बेजबाबदार आणि आईबापांची जराही कदर न करणारी दाखवलेली आहे. अशा भडक, एकांतिक 'टच' मुळे वडावालांच्या कथेतील प्रश्न वाचकांना खऱ्या अर्थाने भिडत नाहीत, अस्वस्थ करत नाहीत. 'व्यवहार' कथेत ('सांजवा') स्वत:पुरतं पहाणाऱ्या दिवाकरने झिडकारल्यानंतर कुटुंबाची जबाबदारी पार पाडत निवृत्तीच्या दिशेने एकाकी प्रवास करणारा आनंदी, वडावाला यांनी चित्रित केली आहे. या कथेतले वातावरण मात्र लेखकाने सूक्ष्मतेने रंगवले आहे. पण अशा प्रौढ किंवा वृद्ध कुमारिकांचा प्रश्न मराठी साहित्याला आता नवा राहिलेला नाही. एकूणच प्रदीर्घ आकाराच्या वडावाला यांच्या कथांत सांगण्यासारखे असे फार थोडे आहे, असे सारखे वाटत राहाते.

वडावाला यांचे भाषेवरील प्रभुत्त्व मात्र नावाजण्यासारखे आहे. त्यांच्या निसर्गवर्णनपर भाषेला

अंगभूत लय असते. प्रतिमांचा ते अतिशय सुंदर उपयोग करून घेतात. 'क्षणाक्षणाने मृत्यूदंडाजवळ जाणारी पोर, उन्हात टाकलेल्या बिब्ब्याच्या बोंडासारखी सुकली आहे.' किंवा 'दूर गोंडाच्या माळाशी पौर्णिमेचा चंद्र पार तळाशी उतरेपर्यंत, शुक्रतारा चमकू लागेपर्यंत, पाठची प्राजक्ती पांढरा साज भुईच्या गळ्यास चढवेपर्यंत - रात्र रात्र जागेपणात जायची' अशी त्यांची लयबद्ध वाक्ये मनात घर करून राहातात. या दशकातील कथाकारांमध्ये शैलीचा असा बाज फारच थोड्या कथाकारांपाशी सापडतो.

रवींद्र शोभणे यांचे 'वर्तमान' (१९९१), 'दाही दिशा' (१९९४) असे कथासंग्रह या दशकात प्रसिद्ध झाले. आपल्या लेखनातून त्यांनीही स्वत:चा ठसा या दशकावर उमटविण्याचा प्रयत्न केला. ग्रामीण आणि नागरी असे दोन्ही पद्धतीचे अनुभव शोभणे आपल्या कथांतून मांडत जातात. त्यांच्या कथालेखनात कथाविषयक नवे प्रयोग फारसे आढळत नाहीत. त्यांची कथा बव्हंशी घटनाप्रधान किंवा कथानकप्रधानच राहाते. पण मध्यमवर्गीय जीवनाच्या पलीकडले काही अस्वस्थ करणारे अनुभव ते कथांतून मांडत राहातात.

'वर्तमान' या त्यांच्या पहिल्याच कथासंग्रहातील विषयांची विविधता नजरेत भरल्याशिवाय राहाता नाही. 'पायरीचा दगड' या कथेत आपल्या समाजासाठी काहीतरी काम करू इच्छिणारा सुधीर सातपुते प्रस्थापित व्यवस्थेच्या पकडीत कसा सापडत जातो, याचे चित्रण शोभणे करतात. आपल्या समाजातील विवाहोत्सुक तरुण-तरुणींचे मेळावे बोलावणारा, शंकराचार्यांच्या जातीय तत्त्वज्ञानाला आव्हान देणारा बंडखोर सुधीर आमदार बाळासाहेब पाटलांच्या नजरेत भरतो. आमदारसाहेब त्याच्याशी ओळख करून घेतात. आमदारांमार्फत समजाकल्याण खात्यात विभागीय मुख्याधिकारी म्हणून सुधीरला नोकरी मिळते. येणाऱ्या निवडणुकीत आपल्या समाजाची मतं बाळासाहेबांना मिळावी असा सुधीर प्रयत्न करतो. पुढे आमदारांच्या भाचीच्या प्रेमपाशात सापडल्यानंतर विवाह करून सुधीर सामाजिक कामापासून हळू हळू कसा दूर होत जातो याचे बारकावे शोभणे ह्या कथेत रंगवतात.

'इस शहर में हर शख्स' या कथेच्या विषयात नाविन्य नसलं तरी विषयाची हाताळणी रवींद्र शोभणे यांनी अतिशय सूक्ष्मपणे केली आहे. भाईजींच्या गायनावर भाळून सुशीला त्यांच्यावर आपलं सर्वस्व उधळून देते. भाईजी विवाहित असतात. त्यांची मुलगी विभा सुशीलाची मैत्रीण. सुशीला आणि भाईजी यांच्यातील नातं त्यांच्या कुटुंबीयांना मुळीच मान्य नसतं. तरीही स्वत:चं गाणं आणि भाईजींमधलं आणि स्वत:मधलं चढउताराचं, उन्मादानं आणि नैराश्यानं भरलेलं नातं सुशीला समंजसपणे सांभाळत राहाते. सुशीलाचे मानसिक ताणतणाव शोभणे अतिशय तटस्थपणे टिपत जातात.

'जल्लोश' कथेत कॉलेजमधल्या निवडणुकीचे वातावरण, त्यात हुशार आणि प्रामाणिक विद्यार्थ्यांची होत जाणारी घुस्मट आणि त्याला येणारे नैराश्य शोभणे रंगवतात.

'शहामृग' (१९९८) मधील शोभण्यांच्या कथा आकाराने दीर्घ आहेत. कथेला आवश्यक असलेले तपशील रंगवण्याचे शोभण्यांचे कसब या संग्रहातही लक्षात येते. स्त्री-पुरुषांमधील आदिम वासना हे या संग्रहातील दीर्घकथांचे मुख्य सूत्र आहे. 'केसाळ कातडीचं श्वापद' सारखी



अनुक्रमणिका





यातली एखादी कथा चांगली जमून जाते. 'शहामृग' कथेत किरणला वेश्याव्यवसायापासून परावृत्त करताना आनंदराव तिच्यात कसे गुंतत जातात, हा कथाभाग शोभण्यांनी रंगवला आहे. 'सती आणि महात्मा' कथेतील आचार्यांचे तत्त्वज्ञान आणि त्यांची व्यक्तिरेखा मात्र शोभणे पुरेशा ताकदीने रंगवू शकले नाहीत. त्यामुळे ही दीर्घकथा उपरी आणि उथळ वाटते.

प्रस्तुत अंकासाठी निवडलेली रवींद्र शोभणे यांची 'तद्भव' ही कथा 'विशाखा'च्या दिवाळी अंकात (१९९६) प्रसिद्ध झाली आहे. या कथेतील विषयाचा आणि शैलीचा ताजेपणा लक्ष वेधून घेणारा आहे. पुराचं कव्हरेज घ्यायला गेलेली एक जर्नॅलिस्ट तरुणी आणि एक प्रोफेशनल फोटोग्राफर यांच्यातल्या मनमोकळ्या मैत्रीचं आणि शेवटी त्यांच्यात निर्माण झालेल्या गैरसमजाचं चित्रण शोभणे या कथेत करतात.

कथालेखनात शोभणे, शैली, वातावरणनिर्मिती यांचा चांगला वापर करत असले तरी विषयाचा उत्कट प्रत्यय देण्यात किंवा वाचकांना अस्वस्थ बनवण्यात त्यांची कथा कुठेतरी कमी पडते, असे सतत जाणवत राहाते.

१९८० ते १९९० या दशकावर स्त्री कथाकारांचा मोठा प्रभाव होता. नवे विषय, स्त्रीपुरुष नात्याचं अनोखे चित्रण आणि नव्या पद्धतीची मांडणी या वैशिष्ट्यांनी गौरी देशपांडे यांनी आपल्या कथांकडे वाचकांना आकृष्ट केले. सानिया आणि प्रिया तेंडुलकर यांनी नवे बदलाचे वारा आणि जुने न बदलणारे पारंपारिक कौटुंबिक वातावरण यांच्यातील ताण सूक्ष्मतेने आणि समजदारीने रंगवले. आशा बगे यांनी वेगवेगळ्या स्तरांतल्या, जुन्या-नव्या वळणांच्या व्यक्ती रंगवून आपले कथाविश्व समृद्ध केले.

या दशकात मेघना फटांगरे आणि मेघना पेठे या दोन कथालेखिकांनी नव्या वळणाचे आणि आशादायी वाटावे असे कथालेखन केले.

मेघना फटांगरे यांच्या 'खोल सूक्ष्म आवेश' या पहिल्याच कथासंग्रहास १९९८ सालचा 'दि.बा.मोकाशी' साहित्य पुरस्कार मिळाला. त्यांची 'कन्या' ही कथा १९९६ च्या 'सत्याग्रही'च्या कथा विशेषांकात प्रसिद्ध झाली होती. श्री.व्यं.केतकरांच्या 'ब्राह्मण कन्या' या कादंबरीवरून प्रेरणा घेऊन आपण ही दीर्घकथा लिहिली असे मेघना फटांगरे यांनी म्हटले होते. कथेच्या अविष्काराला दुय्यम मानून कथेतून महत्त्वाच्या आशय व्यक्त करणे हे त्यांचे या कथेच्या लेखनामागील उद्दिष्ट होते. त्यांचे सामाजिक निरीक्षण व्यापक, सूक्ष्म आणि उद्याच्या परिवर्तनाची दिशा दाखवणारे होते. आज जातिभेदांचे बाह्यत: निर्मूलन झाले असले तरी समाजमानसात जाति-जातींतील ताण आणि श्रेष्ठ-कनिष्ठ भाव कसा आस्तित्त्वात आहे, याचे चित्र मेघना फटांगरे यांनी या कथेत रंगवले होते. दलित जातीत जन्माला आलेली, शिकलेली आणि म्हणूनच जातीय सवलती नाकारणारी एक तरुणी या कथेच्या केंद्रस्थानी होती. अशा वेगळ्या पद्धतीने जगायची तयारी दाखविल्यामुळे समाजात स्वजातीयांकडून व वरिष्ठ जातीयांकडून तिची होणारा फरफट व तिने आत्मविश्वासाने समाजाशी केलेला संघर्ष हा या कथेचा मुख्य विषय होता.

'खोल सूक्ष्म आवेश' या त्यांच्या संग्रहातील बऱ्याचशा कथा पूर्वी प्रसिद्ध झालेल्या नाहीत. 'आपल्या कथांतून आपण नव-नागरी जाणिवा व्यक्त करतो त्यामुळे आपले साहित्य ग्रामीण

- दलित - नागरी असे कप्पे ओलांडून समावेशक - सर्वांगीण समाजस्थितीचे चित्रण करते? - असे त्यांनी या संग्रहाला जोडलेल्या प्रस्तावनेत म्हटले आहे. 'प्रवाहपतित' - या छोटेखानी कथेत त्या सहा प्रकरणे पाडतात आणि आविष्काराचे बरेच स्वातंत्र्य घेत महानगरी जीवनातील कंटाळवाणेपणा चित्रित करतात. 'व्रतस्थ' कथेत स्त्री-पुरुषांमध्ये समानतेचे नाते मानणारी स्वाती एका फॅक्टरीत मॅनेजरची नोकरी करत असते. तिचा प्राध्यापक नवरा सध्याच्या स्पर्धेच्या जगात गुरफटत चाललेला असतो. या स्पर्धेच्या वातावरणामुळे त्याच्यातील संवेदनाशील माणूस बोथट होत चालला आहे असे स्वातीला वाटत असते- या पतिपत्नीमधील संवाद-विसंवादाची कथा फटांगरे 'व्रतस्थ' मध्ये साकार करतात. या कथेतही 'कथा' या आकृतिबंधाचा फटांगरे अतिशय लवचकपणे वापर करतात.

समाजात नव्या नैतिकता तयार व्हायला पाहिजेत असा मेघना फटांगरे यांचा दावा आहे. समाजातल्या कुठल्याही वर्गातल्या, प्रकारातल्या माणसाला योग्य न्याय देण्याच्या क्षमतेवर मानवी मूल्यांची सार्थकता अवलंबून असते. छोट्या-छोट्या नैतिकता माणसं पाळतात आणि त्यातूनच मूल्ये तयार होतात' -असे त्यांना वाटते. मेघना फटांगरे यांच्या कथेतील आशय बीज नेहमी नवे आणि दमदार असते. कथेच्या आकृतिबंधाकडे त्या अधिक लक्ष देतील तर त्यांची कथा पुढे निश्चितच प्रभावी बनेल.

'हंस अकेला' (१९९७) हा मेघना पेठे यांचा पहिलाच कथासंग्रह त्यांना बराच नावलौकिक मिळवून देऊन गेला. समाजाचं अतिशय जवळून आणि विविध स्वरूपात केलेलं निरीक्षण आणि कथेतील व्यक्तिरेखा बारकाव्यासह उभ्या करण्याचं अजब कसब ही दोन मेघना पेठ्यांच्या कथालेखनाची चटकन जाणवणारी वैशिष्ट्ये आहेत.

'समुद्री चहुकडे पाणी' ही त्यांची या अंकासाठी निवडलेली कथा त्यांच्या लेखनाची सगळी सामर्थ्य दाखवणारी आहे. एक प्रौढ कुमारिका या कथेच्या केंद्रस्थानी आहे. तिचे दुःख, तिला वाटणारा एकाकीपणा या कथेत वेळप्रसंगी व्यक्त होतो. पण तो व्यक्त करणे हे या कथेमागचं एक मात्र उद्दिष्ट नाही. या प्रौढ कुमारिकेचं चित्रण मेघना पेठे यांनी अतिशय गंभीरपणे तरीही तटस्थपणे केलेले आहे. एकूणच कथेची हाताळणी नव्या पद्धतीची आहे. सुमेध वडावाला यांच्या 'व्यवहार' या कथेशी तुलना केल्यानंतर मेघना पेठे यांच्या हाताळणीतले नवेपण लक्षात येईल. 'व्यवहार' कथेत प्रौढ कुमारिका असलेल्या आनंदीचा एकाकीपणा आणि तिला फसवणाऱ्या दिवाकरची स्वार्थी वृत्ती यावर वडावाला यांनी लक्ष केंद्रित केले आहे. मेघना पेठे यांना प्रौढ कुमारिकेच्या एकाकीपणाभोवती आपली कथा घुटमळत ठेवायची नाही, तर स्वतःला प्रतिष्ठित म्हणवणारा मध्यमवर्गीय समाज कसा ढोंगीपणाने वागत असतो हे चित्रित करण्यावर मेघना पेठे यांचा भर आहे. कॉलनीत राहाणाऱ्या नेरूरकरचे या प्रौढ कुमारिकेशी शरीरसंबंध असतात. त्याच कॉलनीतील सुभद्रा जमेल तसे, जमेल तेवढे 'फ्लर्टिंग' करत असते. पण या कॉलनीतील ही तथाकथित संभावित माणसे कॉलनीत राहाणाऱ्या उत्तर हिंदुस्तानातल्या पाठकची बायको वेश्याव्यवसाय करते असे आरोप करून त्या कुटुंबला आणि त्यांच्या तीन मुलांना मात्र कॉलनीतून बाहेर घालवतात. माणसामधील क्रौर्य आणि त्याचा दांभिकपणा यांचे स्वच्छ चित्रण मेघना पेठे

या कथेत करतात. हे क्रौर्य इतके अघोरी बनते की या पाठक कुटुंबाच्या जगण्याला आणखी काही वेगळ्यां बाजू, वेगळ्या मानवी गरजा असतील याचा ही माणसं विचारही करत नाहीत. ही कथा वाचल्यानंतर मन सुन्न होते, मनात मानवी जीवनाविषयी अनेक प्रश्न उभे राहातात. एकाच विषयावरील सुमेध वडावाला यांची कथा किती पारंपारिक पद्धतीने व एकदिश स्वरूपात प्रवास करते आणि त्याच विषयावरील मेघना पेठे यांची कथा कसे नवे भान आणून संपते आणि किती बहुआयामी होते, ही तुलना मनात जागी झाल्याशिवाय राहात नाही.

एक दिवस 'स्टू'चा... या कथेचा विषयही असाच वेधक आहे. औरंगाबादचं सगळं सोडून नाटकात करीअर करायला मुंबईला आलेला 'स्टू' नाटकात काम मिळावीत म्हणून सर्व प्रकारच्या तडजोडी करणारा 'पेशावर' आणि दारूच्या व्यसनाच्या आहारी गेलेली एक चित्रतारका यांच्यातील अनोखे मानवी संबंध मेघना पेठे अतिशय ताकदीने रंगवतात. 'हंस अकेला' संग्रहातील इतर कथांमधून मेघना पेठे वेगवेगळ्या आर्थिक स्तरांतल्या आणि वेगवेगळे व्यवसाय करणाऱ्या स्त्री-पुरुषांची चित्रं उभी करतात. मात्र या स्त्रीपुरुषांचे भावविश्व रेखाटताना त्यांच्यातील सफल-असफल किंवा यांत्रिक शरीरसंबंधाकडे मेघना पेठे यांची कथा निरंतर झेपावताना दिसते. शरीरसंबंध हे मानवी जीवनातील एक अटळ वास्तव आहे, असे तर मेघना पेठे यांना सुचवायचे नसावे ना?

मेघना पेठे यांच्या कथालेखनाचा एकूण बाज लक्षात घेता यापुढेही काही चांगल्या नव्या कथा त्या लिहितील अशा आशा वाटते. स्त्री असूनही केवळ स्त्रीचे भावविश्व चित्रित करणे एवढी एकच मर्यादा मेघना पेठे यांनी स्वत:वर घालून घेतलेली नाही. मानवी जीवनाचा त्या समग्रपणे वेध घेऊ पाहातात हे निश्चितच स्वागतार्ह आहे.

मराठी साहित्याला विनोदी लेखकांची मोठी परंपरा लाभलेली आहे. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांपासून सुरू झालेल्या या परंपरेत पु.ल.देशपांडे यांच्यापर्यंत अनेक विनोदी लेखकांनी भर घातलेली आहे. अलीकडच्या काळात वि.आ.बुवा, रमेश मंत्री इत्यादी विनोदी लेखकांचा विनोद अतिशय दर्जेदार नसला तरी ते सातत्याने विनोदी लेखन करत राहिले आहेत. १९८० ते ९० या दशकात मुकुंद टाकसाळे व आधीच्या पिढीतील क.दि. सोनटक्के यांनी काहा विनोदी कथांचे लेखन केले होते. समाजातील विसंगती या कथांद्वारे टिपण्याचा त्यांचा प्रयत्न होता. १९९० नंतरच्या दशकात विनोदी कथांची फारशी निर्मिती झालेली दिसत नाही. भा.ल.महाबळ यांचे चार विनोदी कथांचे संग्रह या दशकात प्रसिद्ध झाले. पण फारशा दर्जेदार विनोदाची निर्मिती ते करू शकत नाहीत असे जाणवते. त्यांच्या कथा मुख्यत्त्वे कौटुंबिक प्रश्नांभोवती घोटाळतात व त्यातील विनोदी जागा टिपण्याचा ते प्रयत्न करतात. सामाजिक विसंगती त्यांना नेमकेपणाने टिपता येत नाहीत.

जेव्हा सामाजिक प्रश्नांकडे त्यांचे लक्ष जाते तेव्हा त्याचे अतिरंजित स्वरूपात ते चित्रण करतात. (उदा. महाबळांच्या 'स्त्री - मुक्ती' विषयावरील कथा) त्यांच्या लेखन शैलीचा ताजेपणा मात्र लक्षात राहातो.

मराठीतील ग्रामीण कथेलाही संपन्न परंपरा लाभलेली आहे. १९८० ते १९९० या दशकात

बाबाराव मुसळे, प्रतिमा इंगोले, सदानंद देशमुख यांनी अतिशय दर्जेदार ग्रामीण कथालेखन केले. ग्रामीण कुटुंबात होणारे बदल, आर्थिक सुधारणा आणि औद्योगिकरण यांचा ग्रामजीवनावर होणारा परिणाम व या सुधारणांचे त्यांच्या जीवनावर घडणारे दुष्परिणाम यांचे चित्रण या ग्रामीण कथाकारांनी केले

सदानंद देशमुख यांचे 'लचांड' (१९९३, उठावण (१९९४) व महालूट (१९९५) हे तीन ग्रामीण कथांचे संग्रह मेहता प्रकाशनाने काढलेले. ग्रामजीवनातील कौटुंबिक संघर्ष आणि आधुनिक्किरणाचा ग्रामीण भागावर होणारा परिणाम या विषयांवर या संग्रहातील कथा आधारलेल्या आहेत. या अंकासाठी निवडलेली 'महालूट' ही कथा याच पद्धतीची आहे. सरकारने ज्वारीसाठी हमी भाव जाहीर केल्यानंतर सोसायटीवाले आणि व्यापारी संगनमत करून छोट्या शेतकऱ्यांची कशी पिळवणूक करतात याचे हृदयद्रावक चित्रण देशमुखांनी या कथेत केलेले आहे.

दलित कथेच्या संदर्भात योगीराज वाघमारे, उत्तम बंडू तुपे, अविनाश डोळस, वामन होवाळ, अमिताभ इत्यादी कथाकारांची १९८० ते ९० या दशकातील कामगिरी महत्त्वाची होती. विशेषत: अमिताभ यांनी 'पड' या कथासंग्रहात झोपडपट्टीत राहाणाऱ्या दलितांच्या जीवनातील दैन्याचे चित्रण केले. दलित चळवळीतील संधिसाधू पुढारी, दलित स्त्रियांवर होणारे अन्याय-अत्याचार यांनाही त्यांच्या कथांनी स्पर्श केला. १९९० नंतर दलित कथांची निर्मिती होत असली तरी १९७० ते ८० या दशकात दलित साहित्यात जो जोम व चैतन्य जाणवत होते ते आता फारसे आढळत नाही. 'भोगी' हा कचरू भालेराव यांचा संग्रह १९९७ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यांच्या संग्रहातील विषय नवे आहेत. विशेषत: दलित ख्रिश्चन समाजाचे चित्रण त्यांनी एका कथेत केले आहे. पण त्यांच्या या संग्रहातील कथा त्रुटित स्वरूपाच्या वाटतात. विषयाचे पूर्ण आकलन करून घेऊन त्यातले तपशील वाचकांपर्यंत पोहोचवण्यात भालेराव कुठेतरी कमी पडतात. ते पुढे चांगले लेखन करू शकतील अशी आशा मात्र हा संग्रह निर्माण करतो.

दिलिप चित्रे यांच्यामुळे मराठीत आस्तित्त्ववादी विचारांचा प्रभाव असलेली कथा सुरू झाली. पुढे विलास सारंग, अनिल डांगे इत्यादी लेखकांनी या पद्धतीचे कथालेखन केले. १९९० नंतरच्या दशकात मात्र ही धारा क्षीण झालेली दिसते. श्याम मनोहरांच्या काही कथा या दशकात प्रसिद्ध झाल्या. त्यांचे थोडेसे नाते अस्तित्त्ववादी प्रवाहाशी असले तरी सामाजिक आशयाचे तिरकस शैलीने चित्रण करणे किंवा उपहासात्मक विनोदी पद्धतीने तो मांडणे हेच श्याम मनोहरांच्या कथालेखनाचे मुख्य सूत्र आहे.

राजीव नाईक यांच्याप्रमाणे कथेच्या घाटात विविध प्रयोग करणाऱ्या कथा मात्र या दशकात फारशा लिहिल्या गेल्या नाहीत. पंकज कुरुलकर यांच्या कथांत आविष्काराचे काही नवे प्रयोग होते. पण त्यांचा भर आधुनिक स्त्री-पुरुषांच्या नातेसंबंधातील विविध बाजू मांडण्यावर जास्ती होता.

अद्‌भूत कथा किंवा भयकथा मराठीत आरंभापासूनच लिहिल्या जात होत्या. पण विज्ञानात विशेष प्रगती झाल्यानंतर मराठीत 'विज्ञान कथे'चे युग सुरू झाले. ग्रामीण कथेत 'ग्रामीणत्त्व' किंवा दलितकथेत 'दलितत्त्व' ह्या कथाशयाच्या मूलभूत संकल्पना असतात. वाचताना वाचकांनीही

त्या गृहीत धरलेल्या असतात. तसा विज्ञान कथेत विज्ञानाचा एखादा खेळ किंवा चमत्कार कथेच्या केंद्रस्थानी असतो. त्याशिवाय विज्ञान कथेची उभारणी होऊ शकत नाही. जयंत नारळीकर, बाळ फोंडके इत्यादी लेखकांनी मराठी विज्ञान कथेत महत्त्वाची भर घातलेली आहे. 'गुगली' हा त्यांचा पहिला विज्ञान कथासंग्रह. या दशकात सुबोध जावडेकर यांचे 'वामनाचे चौथे पाऊल' (१९९४) आणि 'संगणकाची सावली' (१९९७) हे दोन विज्ञानकथांचे संग्रह महत्त्वाचे ठरले.

'वामनचे चौथे पाऊल' या संग्रहात जावडेकर विज्ञानाच्या आधारे भविष्याचा वेध घेऊ बघतात. 'या कथा विज्ञानाच्या नाहीत, विज्ञान सोपे करून, समजावून सांगण्यासाठी नाहीत तर या माणसांच्या कथा आहेत. ' असे या संग्रहाच्या मलपृष्ठावर म्हटले आहे आणि ते बरोबरच आहे. माणसे आणि मानवी व्यवहार जावडेकर यांच्या कथेच्या केंद्रस्थानी असतात. व्यक्तिरेखा ते अतिशय नेटकेपणाने उभे करतात. संवादांतून त्यांची कथा उलगडत जाते व विज्ञानातील रहस्याकडे वाचकांना खेचत नेते. या सगळ्यामुळे त्यांच्या विज्ञानकथा अतिशय वाचनीय आणि आकर्षक बनतात. सामाजिक, राजकीय, व सांस्कृतिक परिस्थितीवर ते टीका-टिप्पणीही करतात. पण याच वेळी विज्ञान आणि मानवी भावभावना यांचा समतोलही साधतात.

'एका बीजापोटी' या कथेत डॉ. रायकर करत असलेला 'क्लोनिंग'चा (कृत्रिम पद्धतीने मानवाची निर्मिती करण्याचा) प्रयोग आणि त्यातून निर्माण झालेली रहस्यात्मक, गुंतागुंती निष्पत्ती यांचे चित्रण ते करतात. 'संगणकाची सावली' मधील विज्ञानकथा संगणक आणि माणूस यांच्या संबंधाचा शोध घेणाऱ्या आहेत. एका पन्नाशी उलटून गेलेल्या गायिकेच्या आवाजात आलेली खरखर नाहीशी करून तिची नवी गाणी तिच्या जुन्या आवाजात ध्वनिमुद्रित करण्याचा प्रयत्न संगणकाच्या आधारे एक शास्त्रज्ञ करतो आणि त्यातून कसे नाट्य उभे राहाते हे सांगणारी 'आतला आवाज' सारखी या संग्रहातील कथा लक्ष वेधून घेते. कथाबीजाचा थोडा अधिक तपशीलाने जावडेकर विस्तार करू लागले तर त्यांच्या कथा अधिक आकर्षक झाल्याशिवाय राहाणार नाहीत.

स्त्रियांचे प्रश्न मर्यादित आकलनाने मांडणाऱ्या स्त्री - कथाकारांच्या कथा या दशकातही 'माहेर' 'ललना' इ. स्त्रियांच्या नियतकालिकांतून प्रसिद्ध होत राहिल्या. तसेच दुय्यम - तिय्यम दर्जाच्या रंजनप्रधान, शृंगारिक कथांचीही निर्मिती होत राहिली. तरी नव्या प्रश्नांना नव्या जाणिवांतून, सामोरे जाणाऱ्या काही दर्जेदार कथाकारांनी या कथादशकाला स्वत:चा असा एक चेहरा मिळवून दिला! मराठी कथेच्या इतिहासात या दशकातील ह्या दर्जेदार कथाकारांची कामगिरी निश्चितच महत्त्वाची ठरेल.

☐

डॉ. अंजली सोमण
देवेश सोसायटी, मेहेंदळे गॅरेजजवळ,
एरंडवणे, पुणे ४११ ००४.



अनुक्रमणिका







# व्यवहार



सुमेध वडावाला-रिसबूड



एक अस्वस्थ दुपार. कळांवर कळा उमटविणारी. अनिश्चित... घड्याळाची रोजचीच टिकटिक. पण आज जाणवणारी. जपावे, असे वाटणाऱ्या क्षणांचा अंशाअंशाने क्षय करणारी...

टीचभर खिडकीतून आनंदीने अस्वस्थपणे पाहिले.

आभाळाला धडका देणाऱ्या किती तरी इमारतींचे सुळके. त्या सुळक्यांनीच आभाळ ढवळत असावे, असे हलणारे, झुलणारे ढग. काळे, पांढरे, पिंगे... उसळताना त्यांचे होणारे अमूर्त आकार... जूनच्या उंबरठ्यावरचे वेसावध दिवस. घुसमटलेल्या वातावरणातली गूढता... आभाळाने दिलेले अस्फुटसे हुंकार.

कुणाच्या तरी प्रतीक्षेची ही उचकी आहे का? कुणाच्या? दिवाकरच्या?...

परवा लिफ्टमधून वर येताना तिसऱ्या माळ्यावर तो उभा असल्याचा आपल्याला भास झाला होता. फक्त हनुवटीवरची छोटीशी दाढी, पूर्वीइतकीच काळी, रेखीव, ती नजरेत भरली होती...

म्हणून प्रतीक्षा म्हणायची? सारे संपून गेल्यावर आता... आभाळाचे हुंकार हे विव्हळणे आहे. मुक्या वेदनेने, प्रतीक्षे-नंतरच्या वेदनेने पसरविलेले... आयुष्यातली गजबज आता अबोल झाली आहे. उरणार आहे, ती वैराण शांती. आनंदीला वाटले...

का आपण प्रवाहाचे वाहणं गृहित धरले? खळबळाटाची सोबत गृहित धरली?

'टण्ण' घड्याळाने निष्ठुर टोला दिला. वाहत्या अव्याहत प्रवाहाची जाणीव देणारा आपल्यासाठी मात्र हा थबकला आहे.

'हं...' आनंदी स्वत:शी सुस्कारली.

उद्याच्या आपल्या नसण्याने ही जगरहाटी थांबणार नाही. इथली मॅक्सन् कन्सल्टन्सीची... कारण छत्तीस वर्षांपूर्वीच्या आपल्या आगमनाने या रहाटीला त्वाणही मिळाले नव्हते. सापेक्षता आहे, ती आपल्या स्थानाची. आपल्याला बदलत असलेल्या काळाची... तरीही ही घालमेल कशाला? उमजत असूनही होणारी ही घालमेल आणि कापूर उडून जाण्याची शाश्वती काणाडोळा करून निसटणारे क्षण मुठीत पकडण्याचा आपला अट्टाहास... कशाला ही घालमेल? अट्टाहास?... आजवर आपला हा स्वभाव नव्हता. कार्यकारण, तर्कसंगती, इच्छा, आकांक्षा, अपेक्षा, दिवाकरने केलेली उपेक्षा, त्यातून आलेले वैफल्य, धग या साऱ्याच खिडक्या जखडबंद केल्या आपण. मनाची अंधारकोठडी उभारली. पक्की चिरेबंदी. मग कधी सुखाची, चैतन्याची झुळूक आली नाही, याचीही खंत वाटली नाही. वास्तव वा अवास्तव स्वप्नांचे प्रासाद उभारले नाहीत, म्हणून



अनुक्रमणिका

ढासळलेहीह नाहीत... जे प्राप्त झाले, स्वीकारावे लागले, त्या साऱ्याचे कार्यकारण लावले, ते एकच:

'नशीब आपले!'

नकळत तिचा टेबलावरचा हात पेपरवेटशी गेला. सवयीने पेपरवेट गरगरला... मग त्याच्या अंतरंगाकडे नजर गेली. आरपार...

आरस्पानी गोल घुमटातला एक चकचकीत आकार. कधी वेलांट्या, उकारांच्या साखळीचा वाटणारा कधी एखाद्या उन्नत रोपट्याचा, नाजूक कोवळ्या फुलांचा, तर कधी दारूकामाच्या तेजस्वी ठिणग्यांचा वाटणारा...

किती वर्षांपासून हे अमूर्त आकार आपल्याला गूढ राहिले आहेत. आजतागायत तसेच. जहांगीरमधल्या कित्येक पोर्ट्रेसुसारखे ...

मिटलेली झाडे, एकटी झोपडी. नदी असेल, तर पैलतीर रिकामा. ऐलतीरावर बोडकी नाव. नांगरलेली नाही. पण नावाडीही नाही. शेत हिरवेगार, तरी सळसळ नाही. देखाव्याच्या रेषेरेषेत जिवंतपणाचा आभास आहे, पण जगण्याची ओढ नाही. रहस्य नाही. पण पूर्ण निरासक्तीही नाही. उमेद नाही, तरी वीट, नाउमेदही नाही.. प्रकाशही फिक्या सोनेरी छटेचा, की हा मंगलाचा भूप गाणारा रुणझुणा आहे, की सांजेचा विराणा आळविणारा आर्त संधिप्रकाश आहे, हे गूढच राहावे. किंवा पाहणाऱ्याला, त्याच्या दृष्टीला रुचेल, तेच वाटावे...

अशा कित्येक गूढांची आपल्याला भीती वाटायची, पण अनावर ओढही... नवे प्रदर्शन लागायचा अवकाश, मग ती दुपार रणरणणारी, उन्हाने भाजणारा असो, वा संततधारेने, झडीने वाहून गेलेली, निर्जीव असो; आर्ट गॅलरीत लंच टाईममध्ये जाणे हे अटळ. अपरिहार्य.

'आसरा' पुढून जाताना क्षणभर वाटायचे, इथे दिवाकर असेल बसलेला. पूर्वीसारखा वाट पाहत, आणि उशीर होताच चिडणारा. जळफळणारा....

भराभर पावले उचलून पुढे गेलो, की 'जहांगीर' ची घोटीव, शुभ्र इमारत. ताजमहालसारखी वाटणारी... तिच्यात शिरताना वाटायचे,

'कुणाच्या अनुरागांचे चिरप्रतीक असेल हे?'

तशी ती असेल, वा नसेल.. कदाचित फार जुना नसला, तरी गॅलरीचा इतिहास आपल्याला अज्ञात होता. पण आतल्या दालनांत मांडलेली विषण्ण चित्रे, त्यांच्यातले अज्ञात गूढ, हा आपल्या जीवनातला वास्तव इतिहास होता...

'पण अनुराग?'

'आपल्याला ज्ञात असलेल्या, आपल्याच इतिहासातले चिरप्रतीक कोणते?'

'एकटी झोपडी? तिच्याकडे, पैलतीरी घेऊन जाणारा; पण आता अनुपस्थित असलेला नावाडी? आपल्या असफल, उभारताच न आलेल्या संसाराचे प्रतीक?'

'कुणाबरोबरचा संसार? आणि अनुराग?'

'दिवाकरबरोबरचा?'

स्वत:च्या मनाने विचारलेले प्रश्न, मांडलेले संवाद आनंदीचे त्वेरेने मिटवून टाकले. एखाद्या किचकट फायलीसारखे... आतल्या चिवट ताळेबंदाने, चुकलेल्या हिशेबाने पुन्हा शीण नको. वेदना नको... आनंदीने डोळे मिटून घेतले...

''किती वर्षे झाली, हो सर्व्हिस तुमची?'' कुणीतरी विचारले.



*सुमेध वडावाला (रिसबूड)*

***प्रकाशित पुस्तके :***
*धर्मयुद्ध (कादंबरी):*
*पहिली आवृत्ती संपली.*
*सांजवा (कथासंग्रह) :*
*दुसरी आवृत्ती उपलब्ध.*
*चांदणफुला (कथासंग्रह) :*
*पहिली आवृत्ती संपली.*
*ब्रह्मकमळ (कादंबरी)*

***पुरस्कार :***
*महाराष्ट्र साहित्य परिषद, महाराष्ट्र शासन, नगरवाचन मंदिर, 'सृजन साहित्य', 'शांताराम' डॉ. अ. वा. वर्टी असे आठ-दहा पुरस्कार आजवर प्राप्त झाले आहेत.*
*वर्षापूर्वी प्रकाशित झालेल्या 'ब्रह्मकमळ'ला 'ललित' मासिकाच्या चोखंदळ वाचक योजनेत वाचकांची १९९७ मधील पुस्तकासाठी सर्वाधिक मते मिळाली.*

***आगामी :***
*'अंत गोकुळाचा' हा कथासंग्रह.*

''छत्तीस.'' आनंदीने डोळे उघडले आणि उत्तर दिले.

बोथटलेल्या प्रश्नाचे अर्थशून्य उत्तर...

'छत्तीस निष्फळ वर्षे!'

''याच टेबलावर?''

''हो. याच.''

जोशी उगाच आर्द्रपणे, ओढल्या चेहऱ्याने पुढे उभे होते. पण तेवढेच... पुढे आणखी चार शब्द बोलायला, काही विचारायला यांच्यापाशी विषय नाही.

तसा ऑफिसातल्या कोणाजवळच आपल्यापाशी, वा आपल्याला त्यांच्यापाशी बोलायला विषय नाही. यापूर्वी नव्हता. छत्तीस वर्षांत... रेगेबाई आणि कालिंदी यांच्यातल्या 'छानछोकी'च्या गप्पा... स्त्रीदाक्षिण्याच्या अवास्तव अपेक्षेतून केल्या जाणाऱ्या 'कामाच्या टाळाटाळी'च्या गप्पा...जोशी आणि देसाई यांच्यातल्या 'वाढत्या महागाई'च्या, 'सांसारिक अडचणीं'च्या गप्पा.. बलसाराच्या 'नव्या सिनेमा'च्या गप्पा. हीरोंच्या डायलॉग्जची स्वगते. वाद्यांचे, म्युझिकचे सूर. नक्कल... नानाविध गप्पांच्या अनंत आवर्तांतली एकही लाट आपल्यापर्यंत येत नाही. या वा अन्य विषयावर बोलावे असा एकही सामायिक विषय नाही. इच्छा नाही... मग उपजली आणि वर्षांच्या ओझ्यांनी मुरत, वाढत गेली, ती अलिप्तता; आणि मॅक्सन् कन्सल्टन्सीतल्या उरलेल्या साऱ्यांना एकच सामायिक विषय मिळाला. तो आपला... 'आनंदी', 'मिस् आनंदी'... 'ती'... तिचा विषय. तिच्याविषयीच्या गप्पा, कुचाळक्या, थट्टा आणि बोचरे विनोद...

आयुष्याचे निवडुंग झाले, तसा भोवतालही बदलला. रखरखीत वाळवंट झाला. प्रत्येक



अनुक्रमणिका

दिवस हा ग्रीष्म. आजवरचा प्रत्येक दिवस...

आज मात्र प्रत्येकजण आनंदीच्या टेबलापाशी आला. उपचारार्थ, घडीभर उभा राहिला. दुखवट्यासारखा गंभीर चेहरा, मग चार शब्द... आजवरच्या कुचेष्टांचे बोचरे बाण आज मोरपिसे झाली. कुशल पुसणारी. काही कौतुके करणारी...

''आगटेबाई, एवढ्या वर्षांत तुम्ही कुणाच्या अध्यात नाही, की मध्यात. खरंच...''

पण या दुधारी बोलण्याची जाण केव्हापासूनच मेंदूत भिनल्याने ती या मोरपिसांनी फुलली नाही. त्या स्पर्शावर भुलली नाही... उलट, कुणी पुढ्यात उभे राहावे, तेव्हा तिने टेबलावरच्या रजिस्टर, पेनस्टँड, फाईल्स या निर्जीवांकडे पाहावे, पुतळ्याच्या शून्य, अचेतन नजरेने...

कालिंदी आली, तेव्हाही तसेच...

''मिस् आगटे, वुई ऑल वूड हॅव बीन हॅपी, इफ युअर सिन्सीअर सर्व्हिस वुड हॅव गॉट ॲन एक्स्टेन्शन. एक्स्टेन्शन ऑफ ॲन इयर ॲट लीस्ट, ऑर मोअर....''

लाडिक, कृत्रिम आवाजात कालिंदी म्हणाली, तेव्हा आनंदीने जांभई दिली. पंख्याच्या घरघर फिरतीकडे टक लावली... दखलही न घेतल्यासारख्या या त्रयस्थपणाने कालिंदी अपमानित झाली... टाईपरायटर पुढ्यात जाण्यापूर्वी रेगेजवळ थांबली. पाठमोरी उभी राहिली, आणि काहीतरी पुटपुटलीही..

'काय आखडू आहे, हो! अगदी माणूसघाणी...वाटलं होतं निदान आज तरी..'

'अग म्हणूनच 'अशी' राहिली, कोण पत्करणार 'असल्या' बाईला?...'असली'शी संसार, उभा जन्म काढायचा, म्हणजे हौशी गायकाला बहिऱ्यापुढे गायची शिक्षा!'

दोघींच्यातला हाच संवाद असणार, हे आनंदीने ओळखले.

क्षणभर वाटले, यांना सांगावे का?

'दुबळेपणा आणि उपेक्षा यांची पुटे आयुष्यभर चढत गेली, की सर्वात वर कवच धरते, ते माणूसघाणेपणाचे. वज्रकठीण कवच. एकदा ते धरले, की आतला पिडित जीव त्यातून बाहेर पडू शकत नाही, की जगाचे कोणतेच व्यापार त्याला भेदून आतल्या जिवाला, आणि त्याच्या एकाकीपणाला भिडू शकत नाहीत...'

पण कुणी सांगावी आपली कैफियत यांना?

आर्तपणे गाऊन दाखविली, तरी आपल्याभोवतीचे सारे जग तृप्तीने आत्ममग्न झाले आहे. परिपूर्तीने बधिर, बहिरे झाले आहे.

'टण्ण्..' घडाळ्याने एक ठोका दिला. साडेबाराचा...

'मॅक्सन कन्सलटंसी'त खडबडाट झाला. ड्रॉवर्स धडधडले. कुणीतरी खर्रकन खिडकीवरचा पडदा ओढला. जुनाट ऑफिसातली एकमेव खिडकी..मग तत्परतेने ट्यूब्स घालवल्या. एक अंधार त्या चौकोनी जगात भरून गेला.

आनंदीला ते ओंगळवाणा वाटला..

आता दोन टेबले जोडली जातील..भोवती सारा स्टाफ. उणापुरा अर्ध्या डझनाचा...

एकमेकांच्या भाज्याचटण्यांची अदलाबदली. रेगेबाईंच्या सुग्रणपणाची कौतुके. बलसाराच्या 'डाळमेथीया'ची वाढती मागणी.. जोशींच्या गुळचट, भेंडीच्या बुळबुळीत भाजीला सामुदायिक नाकमुरडणी.

जोशींच्या 'वेगळ्या सुभ्या'ची धमकी... कुणाची तरी रदबदली...'आधुनिक आचारां'च्या प्रदर्शनार्थ उष्टी बोटे कुणीही डब्यात घालावी. चोखावी...

नकोच. ते पाहणेही नको... न पाहता टेबलावर, डोळे मिटून बसलो, तरी आज या पंगतीचे 'शुभेच्छा निमंत्रण' येईल कदाचित... नकोच त्यापेक्षा...

लिफ्टने उतरून आनंदी खाली, मग रस्त्यावर आली. उभी राहिली....

पण जायचे कुठे? कुठे जायचे आता? .....जहांगीर?....तिथले प्रदर्शन तर परवाच पाहिले आपण. तेही तिसऱ्यांदा. मग कुठे? ..पुन्हा लिफ्टने वर जावे का? वर? तिसऱ्या माळ्यावर?... लिफ्टमधून, त्या बोगद्यातून वर जाताना बाहेर, तिसऱ्या माळ्यावर दिवाकर दिसला होता, भास झाला होता, म्हणून? म्हणून त्या माळ्यावर?... की रस्त्याने सरळ, बाहेर?... बाहेर 'आसरा' उडप्याकडे?... 'तिसरा माळा' वा 'आसरा'? दिवाकरचा वेध घ्यायला? वेध, की माग?'... इतकी चिवट कशी अजून आपली आशा? जवळजवळ छत्तीस वर्षांनीही?... या छत्तीस वर्षांनी आपल्याला एकही ठिकाण दिले नाही. हक्काने केव्हाही जावे, अशी एकही जागा नाही. मनातल्या व्यथा भडभडून ओकाव्या, असे एकही माणूस आपल्यापाशी नाही... निवडुंगच. निवडुंगच. निवडुंग आणि भोवतालचे रखरखीत वाळवंट...

आभाळ आताच भरून आले होते, आणि केव्हाही कोसळणार होते... दुपार. जशी काही निर्वाणीची दुपार, आपले घायाळ, जखमी पंख प्राणपणाने फडफडवीत होती. आणि त्यांच्या सावल्या सुतकासारख्या पसरल्या होत्या...

ती रस्त्यावरून भिरभिरली. आडव्या उभ्या आणि पुन्हा त्याच पथावर. कॅनॉन पथ..

पाहणाऱ्यांनी वेड्यात काढले, तर या भरकटण्याला? पुन्हा ती मुंबईच्या फोर्टमधली भ्रमंती...

जगाच्या नजरा आपल्यावर रोखल्या आहेत. हावरट, बुभुक्षित आणि किळसवाण्या. संशयी..

भासाने तिला दरदरून घाम फुटला... ती माघारी वळली.

सकाळपासूनच्या रहदारीचा धबधबा ओसरल्याने बेफिकीरपणे, थोडासा सुस्तावून अंग टाकलेला रस्ता आणि चिंच. गुलमोहोरांच्या विस्ताराखालची थंड जाळीदार दुपार... तिच्या पंखांनी, अस्तित्त्वासाठी निकराने केलेल्या फडफडण्याने झाडावरून गळलेल्या लाल पाकळ्यांची, पिवळ्या हिरव्या पानांची टिकल्यांची पखरण, पायघड्यांसारखी... त्या आपल्यासाठीच आहेत, असे समजून राजाच्या थाटात वावरणारी माणसे. प्रत्येकाचे भिन्न भिन्न साम्राज्य .. लाल राजछत्राखाली चकचकीत डब्यांच्या सिंहासनात बसलेला दिमाखदार पानवाला...पोटावर धुराड्यांच्या राज्यांची धुरा वाहणारे, फूटपाथवर भटकणारे चणेवाले...पलिकडचा, जगज्जेत्याच्या थाटात काऊंटरवर बसलेला 'आसरा' उडिपी...काहीसे काळोखी कोपरे. माणसांची तेज वर्दळ. भावगीताची थंड धून... या साऱ्यावर नियंत्रण करणारा, नोटा सरकवणारा, काऊन्टरवर हात ठोकून पैसे घेणारा जाडगेला उडिपी...आसरा...

आसऱ्याच्या त्या व्यवहाराकडे आनंदी



अनुक्रमणिका







क्षणभर पाहत राहिली, जगाचे भान हरविल्यासारखी...

'अनू, मला फक्त तू हवीस. फक्त तू...फक्त तू!'

कुठल्या स्मृतींचे भांडार हिंदकळले. खोलवर गाडलेले. आणि तो 'आसरा' तला काळोखी कोपरा...दिवाकर?

'कर्रर्ऽऽकच्' पाठीमागे टॅक्सीवाल्याने करकचून ब्रेक दिला. हॉर्न. लांबलचक हॉर्न.

आनंदी ओशाळली. रस्त्याच्या कडेला झाली.

काचेपलीकडे ड्रायव्हरचा रागीट, नाखूश चेहरा. ओबडधोबड. टाकीच्या ठोक्यांचा...

'बाईऽऽ'

आनंदी वरमली. मेल्याहून मेल्यासारखी.

हे आपले अनवधान कुणी टिपले तर नाही ना? कुणी परिचिताने? मॅक्सन कन्सल्टन्सीतल्या एखाद्याने?...

आनंदीने सर्रकन भोवताली पाहिले.

पुढे एक चांभार. दुमडलेल्या आडव्या-उभ्या पायांचा काटकोन. त्यात झुकलेली मान. डोईवर तसबिरींचे कोंडाळे. आयुधांचा संसार...लगतच्या कट्ट्यावरचे लाल मुंडासेवाले. हातांत कानकोरणी, कमरेवर टिनाच्या चौकोनी पेट्या... बाजूला, रस्त्यावर पसरलेल्या चित्रांचे विक्रेते. काही देवांची, काही मांजरांची, वासलेल्या जवड्याच्या सिंहाची, उंचावलेल्या जिराफाची चित्रे... गोंडस, निरागस मुलांची, मुतणाऱ्या बालकाची आणि काही भडक, उत्तान रंगीत चित्रे. गिटार वाजवणाऱ्या, उघड्या, बलदंड, छातीवरचे कट्स दाखविणाऱ्या तरुणाचे आणि जख्खड म्हाताऱ्याचे...फूटपाथ संपेपर्यंत पसरलेली चित्रे. पुढे चौक. डोळ्यांची उघडझाप करणारे सिग्नलपोल्स. आणि मध्यावर फाऊंटन. अर्धअनावृत बाईचा पांढरा पुतळा. कमनीय बांधा. एक हात उंचावलेला आणि दुसरा वस्त्रे सांभाळणारा, छातीशी...निर्विकार चेहरा. त्यावरचे निर्जीव डोळे, गुढ पाहणारे, स्तिमित नजरेचे...

पण याचे एक बरे आहे. वर्तमानाचे क्षण भूताच्या खाती जमा करताना काळाने थकावे, पण पुतळा तसाच. कधी तारुण्याची नव्हाळी नाही, वृद्धत्वाची अवकळा नाही. स्त्रीसौंदर्याचा हा आदर्शवत पुतळा आणि उघड्या छातीवरचे कमावलेले स्नायू दाखवीत गिटार वाजविणारा तरुण... त्या गिटारवरून बारीक, मंजुळ स्वर निघू लागले. तर ह्या पुतळ्याची पावले लयबध्दपणे मागेपुढे होऊ लागतील का? उंचावलेल्या हातात मद्याचा चषक भरेल का?.. पण हे होणे, संगती जमणे कठीण आहे. केवळ कल्पनेतले आहे हे !

दिवाकरने हातात अनुनयाची गिटार घेतली होती, पण स्वर छेडलेच नाहीत. आपलीही पावले खिळल्या जागेवरून सुटलीच नाहीत. जागेवरच खिळलेला पुतळा. एका हाताने संयमाची वस्त्रे सावरत दुसरा हात उंचावलेला. जगण्याची -- फक्त जगण्याची धडपड आणि साक्षीभावाने आपलेच जगणे त्रयस्थपणे पाहणारे भावहीन डोळे...

चणेवाल्याकडून आनंदीने शेंगदाणे घेतले. खारेपणा जिभेवर मुरवत, घोळवत राहिली...हातात त्या सुरनळीचा शंकू आणि मुठीत घामेजून बोळा झालेला रुमाल.

दारे खडखडीत उघडमीट करणाऱ्या लिफ्टने ती ऑफिसात, पाचव्या मजल्यावर आली, तेव्हा एकच वाजला होता...

तंबाखू मळणारा रामशे. टेबलांना शरण गेल्यासारखी माणसे, त्यांवर डोकी टेकवून, शांत, स्तब्ध आणि कोपऱ्यातल्या जोशी, देसाई, बलसाराचा गंभीर रमी डाव...

आपण खेळतो एवढ्या गंभीरपणे? एकट्याच, प्रतिस्पर्धी नसलेला डाव, सारी आपलीच पाने. हार आणि जीतही.

आनंदीने टेबलावरून हलकेच हात फिरवला. खुर्चीत स्वत:ला झोकून दिले, तेव्हा वाटले:

आता फक्त तीन, साडेतीन तास. तेवढेच उरले इथले. यापूर्वीचा, केवढा, किती वर्षांचा ऋणानुबंध. इथल्या माणसांशी नाही, तरी या खुर्चीशी, टेबलाशी, मांडण्यांशी, खिडकीशी, आणि या कामाशी. तो एक क्षुल्लक, अल्पजीवी क्षणाने खळकन् तुटून जाणार. थोडक्या अवधीनंतर...

टेबलावरची रजिस्टर्स, काचेचे पेपरवेट्स, डेस्क कॅलेंडर, पिनकुशन, क्लिप्सचा कागदी खोका, पेन स्टँड, फाईलपंच, हे सगळे जपले आजवर. छातीवरचे वस्त्र सावरणाऱ्या पुतळ्यासारखे, त्या भावनेने जपले. रोज घरी जाताना, ऑफिस सोडण्यापूर्वी सारे टेबलाच्या लॉकर्समधे टाकून...वर, कागदांवर राहायची, ती पेपरवेट्स फक्त... ही दिवाकरची सवय. कित्येक वर्षांपूर्वीची. स्वत:ला आणि स्वत:चे जपण्याची सवय... त्याच्या टेबलावर पेपरवेट्सबरोबर आणखीही एक वस्तू राहत असे. ॲशट्रे...आता उद्यापासून हे इथंच, टेबलावरच राहणार सगळे. सुरक्षितता संपून गेल्यासारखे... अशी काही भावना मनात आली असती, तर दिवाकरने सिगारेट शिलगावली असती... ताबडतोब... आणि तोंडातून तिचा धूर सोडताना बुलगॅनिन दाढीतून बोटे फिरवीत राहिला असता...

बदलला असेल दिवाकर आता? त्याच्या सवयी? सिगारेट शिलगावणे, दाढीतून बोटे फिरविणे, आणि सर्वप्रथम जपणे, स्वत:ला आणि स्वत:चे सर्वकाही...

आनंदीच्या कपाळावर आठी उमटली..टेबलावर डोके ठेवून तीही बसून राहिली.

''आगटेबाई, सायबांनी वोलिवलंय्..'' रामशेने मऊ आवाजात सांगितले. थोड्या नम्रतेने. थोडे हसून..एरवीचा याचा उर्मट, कंटाळवाणा आवाज. आज बदललेला. अदबशीर..

आनंदी उठली.. शंकरन्च्या बोलावण्याने आज छातीतली धडधड वाढलीच नाही..

एरवी केबिनमध्ये प्रोक्यूअरमेंट ॲप्रूव्हलच्या सहीसाठी क्षणभर जायचे, पूर्ण तयारीनिशी जायचे, तरी ती धडधड आणि जडावणारा श्वास...

एखादा संदर्भ बदलला, की जगण्याचे सारेच अर्थ बदलून जातात. रामशेच्या बोलण्यातली अदब आणि आपल्याला वाटणारा मोकळेपणा.. निवृत्तीच्या, पुढ्यात येऊन ठेपलेल्या क्षणानें बदलले हे सारे...

आनंदी केबिनमध्ये आली, तेव्हा शंकरन् हसला. म्हणाला,

''हॅव अ सीट, मिस् आगटे...'' आणि चष्मा काढून ठेवला...

आनंदीला ते डोळे गहिरे वाटले. उगीचच.

रामशेने चहाचे दोन कप आणून ठेवले. न सांगता.

शंकरन् पाहतच राहिला.

आजवर हा माणूस हसला नव्हता. कधीही... आणि चष्म्याखालचे साहेबी डोळे

अगम्य राहिले होते. इतक्या वर्षांच्या सहवासानंतरही त्यातून ओळखीची छटा कधी पाझरली नव्हती.. पण ही अलिप्तताच बरी होती. बाहेरच्या सहकाऱ्यांच्या चौकसखोरीतून नेहमीच जन्माला येणाऱ्या थट्टामस्करीपेक्षा, तिचेच आपण भक्ष्य होण्यापेक्षा शंकरन्‌ची अलिप्तताच चांगली होती.

''हॅव इट!'' कप पुढे सरकावीत शंकरन् म्हणाला.

आनंदीच्या मनात ऊनपाऊस. थोडा ऑकवर्डनेस. थोडी आत्मतृप्त, सन्मान-भावना...

केबिनमधली शांत, किरमिजी, काळोखी, प्रशस्त जागा आणि सुखद गारवा..

शंकरन्‌ने खुर्ची फिरवली. ड्रॉवरमधून पाकीट बाहेर काढले. म्हणाला,

''ऑल युवर फंड्स, ड्यूज एटसेट्रा...''

आनंदीचा हात थरथरला, चेक घेताना..उठताना म्हणाली,

''थँक्यू, सर. थँक्यू व्हेरी मच!''

तोही खुर्चीतून उठला. तिच्यापाठोपाठ... म्हणाला,

''ॲन्ड विश् यू ऑल दि हॅपी फ्यूचर लाईफ!''

आनंदी गलबलली. काहीतरी तुटल्यासारखे, वर्षावर्षांचे बुरूज कोसळल्यासारखे वाटले.

केबिनबाहेर आली. पिलरच्या आडोशाला उभी राहिली... सर्वांगाला सुटलेला कंप आणि हातात चेक. 'ड्यूज, फंडस्, एटसेट्रा'..

पोकळी..आता उरलेल्या आयुष्याची पोकळी.. गिटारचे मोहक स्वर कधी कानावर पडले नाहीत. यापुढेही पडणार नाहीत. उंचावलेल्या एका हाताचा आता अर्थ बदलला आहे. इथली निवृत्ती झाली, आता आयुष्याच्या निवृत्तीच्या क्षणाला केलेले ते आवाहन आहे. तो लवकर यावा, अतृप्तीचे रिक्त चषक त्याने नेणिवांनी भरून टाकावे, यासाठी केलेले...

जड पावलांनी आनंदी खुर्चीजवळ आली. शंकरन्‌च्या केबिनमधली काळोखी अजूनही तिला वेढून होती... आणि बसलेल्या खुर्चीभोवती 'आसरा'चा कोपरा..

आसराचा काळोखी कोपरा. पुढ्यात दिवाकर. हातात सिगारेट. डोळे अहंकारी आणि व्यवहाराचे भान, तोच स्थायिभाव असलेले. धूर्त नजर..

फोर्टमधल्या रस्त्यावरून पाणी वाहत आहे, आणि दुतर्फा चिंचेवर गुलमोहोरांवर पावसाचे मंद ठोके पडत आहेत... आपण तर ओल्याचिंब आहोत. केसांतून पाणी ठिबकते आहे. दिवाकर मात्र कोरडा ठणठणीत... एकाच आपल्या लेडीज छत्रीतून येताना आपणच ती धरली होती. पावसाच्या दिशेला आपण, आणि तरीही छत्री त्याच्या अंगाकडे झुकवलेली होती, तो भिजू नये, म्हणून. आणि बोटातली सिगारेट विझू नये, म्हणूनही... तरीही एका अवखळ, टपोऱ्या, वर्मी घाव घातल्यासारख्या थेंबाने विझली होती, तेव्हा आपण हळहळलो होतो... दिवाकर मोजकेच हसला होता. कुठेतरी आतवर साकळून राहिलेला धूर ओढून बाहेर काढीत तोंडातून आपल्यावर फुंकीत सिगारेट पायाकडे टाकताना म्हणाला होता,

''फक्त तू हवीस, ग.. यांना काय जपायचं? कितीतरी मिळतील. विकत घेतल्या, की जाळायची अलिखित परमिशन मिळते आपल्याला...'' आणि खांद्याभोवती हात टाकून, आपल्याला वेढून, अबोल होऊन तसाच उभा राहिला होता. रस्त्यातच...

गिटारचे स्वर, तारांवर चुकून फिरलेल्या बोटांनी वाजले असतील, नसतील.. पण त्या क्षणभरातच पुतळ्याची पावले आसुसून लयबद्धपणे पुढेमागे पडली होती... आजपर्यंत, एवढ्या गाठीभेटीत एवढा, असा निकटचा स्पर्श, त्याच्या छातीचा कणखरपणा जाणवून देणारी समीपता नव्हतीच कधीही. होते, ते व्यवहारीपणे हातात हात घेणे. क्षणभरच...

प्रलयाची नांदी असल्यासारखे गडगडून, पाऊस विजेच्या पोटातून, तिच्याच चपळाईने कोसळू लागला होता. तेव्हा दिवाकरने खांद्यावरचा हात काढून घेतला होता. छत्री आणखीनच स्वत:कडे झुकवली होती... पळत म्हणाला होता,

''चल भरभर... अशी काय ब्लॅन्क होऊन उभी राहतेस कुठेही? वेंधळीच आहेस!''

— आणि 'आसरा'त शिरल्यावर त्वरेने बसून रुमालाने स्वत:चे केस पुसू लागला होता. बाकी तर कोरडा ठणठणीतच... आपण मात्र चिंब भिजलेल्या... केसांतूनही पागोळ्या लागल्या आहेत.

''सांग ना, रे, कॉफी...''

''काही नको कॉफी वगैरे...''

''मग काय हवं, रे?''

''सांगू?... फक्त तू हवीयस् मला, अनू. फक्त तू!''

पुतळ्याला पुन्हा लयीत पावले टाकावीत, असे वाटू लागले होते, आणि उंचावलेल्या हातात कल्पवृक्षाचे छत्र धरल्यासारखे... दिवाकरने आज प्रथमच स्पष्ट सांगितले आहे. मागणी घातली आहे...

तशाच, डोळे मिटून काही वेळ टेबलापुढे बसून होतो, तेव्हा भविष्याचे सोनेरी स्वप्न पडले होते...

डोळे उघडले होते, तेव्हा रस्त्यावरून पाण्याचे गढूळ लोट वाहत होते आणि दुतर्फा चिंचेवर, गुलमोहोरांवर पावसाचे रोगट ठोके कण्हल्यासारखे पडत होते...

दिवाकरने नवी सिगारेट पेटवली होती.

''रजिस्टर करायचं काय, रे? म्हणजे मुहूर्त नको पाहायला...''

खर्चाचा मुद्दा परस्पर निकालात काढण्यासाठी आपण स्वत:च्या, पण अंगभूत नसलेल्या, त्या क्षणाच्या अवचितच्या मुत्सद्दीपणाने खूश होऊन म्हणालो होतो, तेव्हा दिवाकरची बोटे त्याच्या बुल्गॅनिन दाढीतून अस्वस्थपणे फिरू लागली होती...

''मला कसंही चालेल. लग्नापेक्षाही मला तू हवीयस. अनू. फक्त तू!''

''म्हणजे, रे, काय?''

''फक्त तू. म्हणजे तुझी आई आणि भावंडे सोडून...''

न वाजलेल्या गिटाराच्या ताराही तुटल्या होत्या आणि पुतळ्याची पावले दगडाची...

'अन्ये, तू आमच्यात गुंतू नकोस, आमचे दशावतार सदाचे!'

माईने निर्विकारपणे सांगितले होते, तरी त्या वेळचे तिचे पांढरे कपाळ आणि शाळकरी सावत्र भावंडांच्या डोळ्यांतली अनिश्चितता, करुणा हेच उरात भिनले होते...

वास्तव सोसण्याची, दुसऱ्यावर छत्री धरण्यासाठीची आपली धडपड, कर्तव्यभावना; आणि दिवाकरची निर्दय, अप्पलपोटी अपेक्षा, कर्तव्याकडे पाठ फिरवणारी स्वार्थसंमुख वृत्ती, यांत आपण त्रिशंकू झालो, ते आजवर. त्रिशंकूच...

'टण्ण् टण्ण्' घड्याळ्याने लागोपाठ दोन



अनुक्रमणिका






ठोके दिले.

आता फक्त तीन तास. तीन तपांच्या या जागेवरचे शेवटचे तीन तास...

आनंदीने टेबलावरचे रजिस्टर उघडले. फाईलमधल्या एस्टिमेटस्च्या एन्ट्रीज करायच्या होत्या. जाण्यापूर्वी हे बाकी राहायला नको...

तिने रजिस्टरमधे नजर वळवली, तेव्हा कालिंदीने पलिकडच्या रेगेशी नेत्रपल्लवी केल्याचे तिला जाणवले... 'शेवटच्या दिवशीही कामातल्या सिन्सिॲरिटीचा शो कशाला?' अशा अर्थाने...

हे रजिस्टर रेगेच्या टाळक्यावर आदळावे. सांगावे,

'बाई ग, आजवर मी इथे कधी लोकरगुंडा, सुया आणल्या नाहीत...' आणि कालिंदीच्या पिवळ्या नव्हाळीवर टिच्चून ओरडावे, 'परवापरवापर्यंत कुठल्याही ऑफिसातल्या मिळेल त्याला 'बकरा' बनवून तू तीन तीन वाजेपर्यंत पंजाबी डिशेस् चरत होतीस. असला छचोरपणा तर नाहीच जमला. पण दीडच्या ठोक्याला या फायलींच्या संसारात गुरफटून घेत असे, ती इथे, टेबलावरच डबा खाऊन....'

आज सारे हे ऐकवावे, ओकून टाकावे, आनंदीला वाटले. पण बोलली मात्र काहीच नाही... जे आजवर जमले नाही... रेगेसारखी, निथळणाऱ्या शुभ्रकेशरी संसार — पारिजातकाची सोज्ज्वळ तृप्त धुंदी आपण कधी चाखू शकलो नाही, की कालिंदीसारखी ओरबाडून घेऊ शकलो नाहा... रेगेचा बँक ऑफिसर नवरा, उच्च शिक्षण घेणारी, त्यात चमकणारी मुले, यांची मनाच्या गाभ्यात जशी सूक्ष्म कळ उठत असे, तशीच चार महिन्यांपूर्वीही उठली होती. सूक्ष्म कळ. हळदीचे, सिंदूरबिंदीचे वेगळेच तेज घेऊन कालिंदी आली होती, तेव्हा. टाईपरायटरवर तिचे मंगळसूत्र घळकन् ओघळले होते, म्हणून ते गळ्याशी दडपून तिने पदर लपेटला होता, तेव्हा... दोन वर्षांपूर्वी ही 'मॅक्सन' मध्ये आली, तेव्हा लाजाळू होती, उमद्या बलसाराच्या नजरेनेही मिटून जाणारी पण नंतरच्या सहाच महिन्यांत सूर्यफूल झाली होती, कुठल्याही नजरेची धग अंगावर घेऊन पचविणारी, आणि आता तर सूर्यानेही लाजून, मिटून जावे, असे बदल झाले आहेत... दिवसभरात बलसारा बोलला नाही, तर डोळा मिचकावून ती बिनदिक्कतपणे विचारते,

"कल रात भाभीजीके साथ कुछ डिसपुट् हुआ क्या?"

फोर्टमधल्याच, फूटपाथवरच्या सेन्ट, परफ्यूमूजच्या स्टॉलवाल्या सिंध्याशी केव्हा सूत जमविले होते, आणि एका दिवसाच्या रजेनंतर मंगळसूत्र, बांगड्यांच्या लेण्यांनिशा आली होती, तेव्हा ऑफिस कुजबुजले होते... रेगेही थोडी फटकून राहिली होती... पण कालिंदीने त्या साऱ्यांना 'दिल्ली दरबार' मध्ये समिष मेजवानी दिली होती, तेव्हा सगळे शुद्ध, शुचिर्भूत झाल्यासारखे बदलले होते... कालिंदीने 'मासा' कसा गळाला लावला,' याची कौतुके झाली होती, किनाऱ्यावरच्या माणसावर भरतीच्या लाटांचे काही तुषार उडावेत, तसे आपल्या कानांवर यातले काही तरी पडत राहिले, तेव्हा आपण आत्मपरीक्षणात गुरफटलो होतो...

जबाबदाऱ्यांचा काळा बुक्का नशिबाने आयुष्याच्या दारी उधळला नसता, तर असे एक तोरण आपणही लावले असते, पिवळ्या झालो असतो... पण नव्हते आपल्या नशिबात ते... त्यालाच दोष देत, स्वत:ला धिक्कारत,

मनाला दटावत दिवाकरच्या लग्नात रिसेप्शन् स्टेजवर अवजड आहेर घेऊन पाऊल ठेवले होते...

मखमली शामियाना. फुलांच्या माळा. झगझगीत प्रकाशझोत.. फोटोफ्लॅशेस्‌चा चकचकाट... या वैभवात दिवाकर एखाद्या सम्राटाच्या थाटात. सफारी सूट. फक्त हनुवटीवर दाट काळी दाढी...

वाटले होते :

याच्याशेजारी आज आपणच उभ्या असतो. असायला हव्या होतो...

क्षणभर हिंदकळला होतो. दटावलेल्या मनाने आक्रोश केला होता, तेव्हा हसलो होतो. विफलतेने...

दिवाकरही हसला होता. उपचाराने... हात जोडत म्हणाला होता,

''नमंस्काऽऽऽर...''

''नमस्कार...''

''या आमच्या ऑफिसातल्या. आनंदी आगटे...''

पाय लटपटले होते...

कुणी कुणाची ओळख करून दिली आज?...

पुढ्यात मांडलेले आईस्क्रीम घेण्याचेही भान उरले नव्हते. मेंदू गोठलेला...

तोरण न लागलेले आयुष्य तिथेच सोडून, रिक्त मनाने, हॉलच्या कमानीखालून बाहेर पडलो होतो. तेव्हा डोळ्यांच्या खाचा झाल्या होत्या. अश्रू आटून गेलेल्या... दृष्टीपुढे वाळवंटाचे भविष्य पसरलेले होते, तरी मनाच्या लोचट चक्षूंनी पाठी पाहिले होते...

लॉनवरच्या टेबलाभोवती उत्सवप्रिय माणसे. झडणारी मेजवानी... त्यात 'मॅक्सन' मधल्या माणसाचेही एक कोंडाळे. त्यांतले कुणी थट्टेने क्रूर हसणारे. कुणी कोरडेपणाने औपचारिक हळहळणारे... युगायुगांच्या सहवास-शपथा, दाट ओळखी क्षणात लुळ्यापांगळ्या पडून त्रयस्थपणे करून दिलेली ओळख, काळीज चिरीत गेली होती.

'या आमच्या ऑफिसातल्या...'

ऑफिसातल्या... ऑफिसातल्या...

पुढे आयुष्यभर तीच ओळख गाढ राहिली होती... दिवाकरने मोठ्या हुद्द्यासाठी व्यवहारीपणे 'मॅक्सन' सोडल्यावरही...

'ऑफिसातल्या ऑफिसातल्या...'

घर आणि ऑफिस हे दोन महासागर. लोकलच्या पुलाने जोडलेले...

भाऊ मोठे झाले. शिकले. संसारी झाले. 'आनंदीताई' या नामाभिधानाने कान सुखावले. वाटले, पूर्ती झाली. साऱ्याचे सार्थक झाले... पण..

'नणंदच आमची. पण सावत्र...' भावजयीने कुणाला तरी सांगितले. आडून ऐकले, आणि पाहिले... त्या वेळी देव्हाऱ्याच्या पुढ्यात थिजलेली माई. हातात जपमाळ, आणि खुदकन् हसली...

पण खरी ओळख पटली, इतक्या उशिरा का होईना, पण आज पटली, हे बरे झाले... यांचे जीवन फुलविण्यासाठी आपल्या जीवनाच्या होम केला, आणि...

पुन्हा दुबळा रंग सर्रकन् मनाच्या आभाळावर पसरला. असहायतेचा पाऊस कोसळला. तापलेल्या मेंदूतून एकाच शब्दाची लाही तडतडून फुटली. परवलीच्या शब्दाची.

'नशीऽऽब आपले!'

काय दिले या त्रयस्थपणाने आपल्याला?

सहनशक्तीचा स्रोत? की दुबळेपणाचे डबके?...

आनंदी नकळत हसली. स्वत:शीच... मग दचकली.

एकटीनेच आपल्याशी हसण्याला जग 'वेडी' म्हणेल. 'आगटेबाई अठ्ठावन्नीत चळली', असे म्हणेल...

आनंदीने चोरट्या नजरेने ऑफिसभर पाहिले...

रेगेने लोकरगुंडा टेबलावर ठेवला होता. बोटांना सुयांची भ्रमणसमाधी लागली होती, डोळ्यांना विणपटाची तल्लीनता... टाईपरायटरवरच्या पांढऱ्या फडफडत्या कागदावर कालिंदी मधेच स्ट्रोक्स मारीत होती. त्या वेळी तिच्या मनगटभरल्या बांगड्यांची किणकिण होत होती आणि तर्जनीतली अंगठी पिवळ्या सुखाने चमकत होती... मधूनच ती ड्रॉवरमधल्या उघड्या पुस्तकात पाहत होती, आणि तिच्या हावभावांवर, प्रतिक्रियांवर वलसारा कोपऱ्यावर नजर ठेवीत होता. वेगळ्याच नजरेने...

कसले पुस्तक असेल ते?... बलसारा हल्ली वरचेवर तिला 'त्यातली' पुस्तके देतो..

आनंदीला अगदी किळस वाटली.

शीऽऽ... श्लील अश्लीलाच्या सीमेवरील या हीन अभिरुचीपेक्षा आपले वाळवंटी आयुष्य चांगले. कितीतरी चांगले..

जोशी आणि देसाई कामांत गढले होते. त्यांना आपल्या पांढऱ्या केसांची थोडी तरी जाणीव होती. महिनाअखेरी मिळणाऱ्या 'मॅक्सन'च्या तनख्याशी थोडीशी निष्ठा होती...

आताच उठावे देसायांपुढे खुर्चीवर जाऊन बसावे. काही तरी बोलावे. तेही सुचले नाही, तर नि:शब्दपणे, खाली मान घालून बसावे. शेवटच्या दिवसाची आपली मुकी घालमेल कदाचित त्यांना समजेल. छे: नकोच पण. आजवर आपण असे कधीच कुणापुढे बसलो नव्हतो. कशाला जाता जाता आणखी हा विषय द्यायचा चघळायला?

...फार वेळ आपण देसायांकडे पाहत होतो, की काय?...

आनंदीने चपापून नजर वळवली. ऑफिसभर फिरवली...

पोपडे सुटलेल्या, तरीही चिरेबंदी असलेल्या आपल्या आयुष्यासारख्या चार भिंती. त्यांतली बंदिस्त जागा. आठदहा टेबल्स. खुर्च्या. कोपऱ्यातली शंकरन्‌ची केबिन. बाहेर स्टुलावरचा रामशे. भिंतीना चिकटवलेल्या मांडण्या. आडव्याउभ्या फायलींनी खचाखच भरलेल्या. आपल्याच नादात भटकणारे, उंचावरून काळाच्या डोळ्यांनी पाहणारे घड्याळ. थडथड आवाजात घुमणारा पंखा. धुळीच्या किनारींची जुनाट पाती. स्टेशनरीचे गोदरेजचे अर्धे कपाट. फायलिंग कॅबिनेटस्. त्यांच्यापाठची एकुलती एक खिडकी. सकाळी उगवत्या सूर्याकडे पाठ करून संध्याकाळी अस्ताचलाला बोलावणारी. त्याच्या मऊ किरणांना आपल्या हृदयात साठविणारी, आणि अस्ताच्या आवेगाने असाह्यपणे स्वत:ला मिटून घेणारी... इथल्या पहिल्या दिवसापासून, छत्तीस वर्षांपूर्वीपासून आनंदीला ती आवडायची. एखाद्या अबोल सखीसारखी. दिवसाभराच्या आकडेमोडीने थकल्यावर क्षणभर रंगहीन, पिवळसर सागर दाखविणारी, कधी शिडे उभारलेल्या जहाजांचा एखादा तांडा दाखविणारी...

आनंदीला वाटले:

उठावे. क्षणभर या खिडकीत तरी उभे

राहावे. ओठंगावे. खाली, या पाच मजली इमारतींचे मूळ पाहावे. उलटे वळून आकाशाकडे पाहावे... उद्यापासून आपल्याला हे काहीही दिसणार नाही. आजच डोळे भरून या स्मृती साठवून घ्याव्या. मॅक्सन कन्सल्टन्सी...

आनंदी निश्चयाने उठली, तेव्हा रेगेने विणकाम थांबविले आण खलनायिकेच्या नजरेने तिच्याकडे पाहिले. खोल जांभई दिली, तेव्हा तर राक्षसी चेहऱ्यावर ते डोळे भयानक दिसले... खिडकीकडे जाणारी तिची पावले नकळत दाराकडे वळली. आता?...

आनंदी टॉयलेटकडे जाऊ लागली. दाराबाहेर जाताच सुटका झाल्यासारखी. पुढे... पुढे टॉयलेटकडे...

लांबलचक अरुंद पॅसेज. त्याच्या दुतर्फा छोटीछोटी ऑफिसेस्. काही सताड उघडी. काही वातानुकूलित. काचेच्या बुरख्यांतली. त्यांतल्या टंच, बिनधास्त मुली... टाईपरायटर्स. कॉम्पुटर्स... एखाद्या ऑफिसबाहेरचा कडक, पुतळी दरवान.... लिफ्टचा जाळी दरवाजा. त्यातून खाली उतरलेला हाच, असाच काळोखी पॅसेज. आतून येणारे धडधडीचे आवाज. मरणासन्न माणसाच्या क्षीण वेदनाहुंकारांसारखे... लिफ्टलगतचा मजल्याच्या मध्यातला आळशी, रिकामा जिना... जिन्याच्या अक्षाभोवतीचे मजल्याचे तेच प्रतिरूप. आणि शेवटी एक टॉयलेट...

आनंदी टॉयलेटमध्ये आली. उभी राहिली... पिवळट पडलेल्या टाईल्स. नळ उघडताना डुगडुगणारी बेसिन. तिच्यावर बसवलेला, आता पारा उडून निस्तेज झालेला आरसा.. तिने प्रतिबिंब पाहिले.

जे आता दिसत होते ते वैभवशाली नगरीच्या पुराणअवशेषांसारखे. भग्नवत... भुरकटलेला, निस्तेज चेहरा. जवळपास त्याच रंगच्छटेचे कुरळे केस. ज्यांचे एकेकाळी गर्दबन होते. आणि त्यातच फुलल्यासारखा एक गुलाब. टपोरा गुलाब असे...

दिवाकरने कधीही दिला नाही, तरी आपला गुलाब चुकला नाही. स्टेशनबाहेरचा फुलवालाही ठरलेला...

आता ओस पडल्यासारखे हे डोक्याचे केस, आणि कपाळाखालचे आर्त, व्याकूळ डोळे, ज्यांनी कधीही स्वप्ने पाहिली नाहीत. सदैव सशाचे राहिले.

ती टॉयलेटमधून बाहेर आली... पुन्हा तेच, अंधारा पॅसेज, दुतर्फा तोच देखावा... पण या साऱ्यात एक जिवंतपणा आहे. व्यापार चालले आहेत, तेही कित्येकांचे जीवन जगते ठेवण्यासाठी...

या बिल्डिंगला आपल्यासारखी 'उद्या'ची भ्रांत नाही... अशी किती नवी माणसे आली, कडेवर घेतली. ऋणानुबंध जोडला. वर्षानुवर्ष जपला. या सगळ्यानंतर एक दिवस आला, शेवटचा ताटातुटीच, आपल्या आजच्या दिवसासारखा. तोही या इमारतीने हसल्या निरोपाने साजरा केला. 'शुभास्ते पंथान: संन्तु:' कोणाला तोडले नाही, पण कुणात गुंतलीही नाही. निष्काम कर्मयोग...

आनंदी ऑफिसात आली, तेव्हा खिडकीतून पिवळी तिरीप मुक्तपणे खाली लोळत होती. ऑफिस किती प्रकाशमय झाले होते. ती अस्वस्थ झाली.

उद्यापासून कोणत्याच दिवसात ही खिडकी नाही. तिरीप नाही. या जीर्णजुन्या चौफेर भिंती नाहीत, हे टेबल नाही. सकाळ-संध्याकाळची











लोकल नाही... आयुष्याची गतीच हरवून जाईल आणि रिक्तपणा अंगावर येईल, तो प्लॅटफॉर्मवर धडधडत येऊन पुढे निघून जाण्याऱ्या मस्तवाल मेल-एक्सप्रेससारखा... त्या कल्पनेने आनंदीचे डोळे मिटले... छातीत धडधडले... ती खुर्चीत रेलून बसली. पाणी प्यायली. ग्लास ठेवले, तेव्हा घड्याळ्याने ठोके दिले.

'टण्ण्...टण्ण्...'

घड्याळ्याने पाच आवर्तने दिली. पाचाचा विशालकोन साधला.

आनंदीने तो आवाज कानांत साठवून घेतला. ज्याने तीन तपे आपल्या येण्या-जाण्यावर सत्ता गाजवली, त्याच्या नात्याचीही नाळ तुटली. त्याचे हे ठोके...

रेगे किंवा कालिंदी बोलल्याच नाहीत. त्या स्तब्ध होत्या. वलसारा आपल्याच नादात होता. रामशे मात्र हसला. देसायांनी हात उंचावला. जोशी पुढे आले. थांबले घोटाळून भावुकपणे म्हणाले,

"ओळख ठेवा..."

आनंदी कसेनुसे हसली, आतून कोसळून, उन्मळून...

तिने खुर्चीची पर्स काढली. एकदाच खुर्चीच्या हाताला गच्च धरले. टेबलाच्या पाठीवर दुसरा हात ठेवला. शरीर थरथरले... मग जडावलेले पाऊल संथपणे पुढे पडले पॅसेजकडे.

मागे वळून पाहण्याची दुर्दम्य इच्छा झाली, पण डोळ्यांनी अटकाव केला.

बाजूची बरीचशी ऑफिसेस बंद झाली होती आणि मधला अंधारी पॅसेज बावरून, हिरमुष्टा होऊन केविलवाणा पसरला होता.

लिफ्टने खाली आली, तेव्हा खालच्या कार्स, टू व्हीलर्सच्या गराड्यात कचकड्याच्या चकचकीत खेळण्यांसारखी माणसे मिसळून गेली होती...

बरे झाले, आता आपण या दिखाऊपणात अगदीच विजोड दिसू लागलो आहोत, पांढऱ्या शुभ्र थव्यात एखादेच काळे, गावठी कबुतर असावे, तशा...

रस्ता पुन्हा गजबजला होता. कडांच्या फूटपाथ्सना माणसांची गती मिळाली होती आणि मधल्या चौपदरी पन्हाळीतून वाहने सुळकन वाहत होती. या जगाला एक वेग आहे, प्रवाह आहे, आनंदीला वाटले.

तिने क्षणभर थांबून पाहिले...

साऱ्याच अजस्र इमारती आता पोरक्या झाल्यासारख्या रिकाम्या उभ्या होत्या... दिवसभर या कशा शूर, योद्ध्यासारख्या वाटतात. पण आता या पिंजऱ्यातल्या बंदिवान श्वापदांसारख्या असहाय वाटत आहेत, आणि आभाळातल्या काळ्या ढगांचे झोळणे रिंगमास्टरसारखे गडगडाटाचे चाबूक फटकावीत आहेत... गुलमोहोर, चिंचेचे झिपरे गोल आता उदासपणे सांजप्रतीक्षा करीत आहेत, आणि पांढऱ्या फटफटीत सायंदैनिकांचे अभद्र गठ्ठे माणसे वाहत आहेत... चांभाराची टपरी बंद झाली आहे आणि फाऊन्टनमधला, आता शोकाकुल वाटणारा पुतळा शिक्षा दिल्यासारखा हात उंचावून उभा आहे. फूटपाथवरची चित्रे आता निर्जीव वाटत आहेत. त्यांत गिटार घेतलेल्या बलदंड तरुणाचे चित्र दिसेनासे झाले आहे.

कुठे दडले ते? की विकत घेतले कुणी ते?...

आनंदीला उगीचच हळहळ वाटली... वळली, तेव्हा समोर 'आसरा' उडिपी दिसला...

ही भरलेली संध्याकाळ आणि तो काळोखी कोपरा... आनंदी पाहत राहिली. मग जड पावलांनी आत शिरली...

कशाला शिरलो आपण आत? त्या काळोखी कोपऱ्यासाठी?...

छत्तीस वर्षांत हॉटेल दोन-तीन वेळा नव्याने सजवले गेले आहे, तरी आतले कोपरे आणि बसण्याची व्यवस्था तशीच ठेवली आहे...

आनंदीची पावले त्या कोपऱ्याकडे वळली, आणि थबकली. कोपऱ्यातल्या त्याच बाकावर!

होय ! दिवाकरच आहे हा !

आनंदी माघारी वळली. बाहेर जाण्यासाठी...

हॉटेल काठाकाठांनी भरत चालले होते, आणि रसना चाळविणारे खमंग वास, स्वाद पसरत होते...

कॅशियरच्या डोईवर देव्हारा होता, आणि काचेच्या विद्युत निरांजनातली ज्योत उसळी मारून फडफडत होती...

सरावलेले, बिनचेहऱ्यांचे वेटर्स ग्लासांची झुंबरे टेबलांवर अलगद ठेवत होते आणि पैशाचे व्यवहार सुरळीतपणे चालले होते...

सारे पैशाचे व्यवहार!

आनंदीच्या खाली झुकलेल्या नजरेला यांतले काही दिसले नाही...

छातीतली धडधड. लटपटणारे पाय. हृदयाच्या निरांजनात अस्वस्थपणे उसळी मारणारी, फडफडणारी श्वासाची ज्योत...

आनंदीने धिक्कार केला... स्वतःच्या दुबळेपणाचा आणि कुत्र्याच्या चिवट लोचट आशेचा... स्मृतींचा शिळा तुकडा आज आपल्याला मिळेल, म्हणून आपण इथे आलो...

आनंदी वळली. वळताना तिची नजर समोर गेली. दूरवर 'ती' वृद्ध इमारत दिसत होती. पाच मजल्यांची, 'मॅक्सन कन्सल्टन्सी' असलेली इमारत, आणि ऑफिसची आता बंद झालेली एकाकी खिडकी...

"कम् ऑन. असं जायचं नाही. तू इथे येशील. आजच्या तुझ्या शेवटच्या दिवशी तरी 'आसरा'त येशील, ही खात्री होती मला. कशावरून... माहीत आहे?"

दिवाकरने वाट अडवली.

"......"

"एकदा जोडलेले भाववंध काळाच्या ओझ्यानेही तुटत नसतात, अनू. स्मृतींइतकेच चिवट असतात ते!"

आनंदीने चमकून पाहिले, हा इतका 'इमोशनल' कसा झाला?

"बैस, अनू..."

आनंदी अवघडून तशीच उभी आहे, हे पाहून, हसून म्हणाला,

"इज इट सरप्रायझिंग, अनू?... माहीत नसेल तुला, पण आपल्याच बिल्डिंगमधे मी जॉब घेतला आहे, तिसऱ्या माळ्यावर. आफ्टर रिटायरमेन्ट... तुझ्या रिटायरमेन्टचा हा आजचा दिवस पक्का लक्षात होता माझ्या. आय् हॅव नोटेड युअर डेट ऑफ बर्थ इन माय् डायरी..."

आपला जन्मदिवस माहीत होता याला?... त्या वेळी आपण किती अपेक्षा धरत होतो, हा आपल्या हातात काही तरी ठेवून सरप्राईज करेल, म्हणून. साडी, स्वीट बॉक्स निदान एखादे फूल तरी... आणि आपण त्याच्या प्रत्येक वाढदिवसाला ठरवून, योजून देत होतो. घड्याळ, सिगारेटची किमती केस. टायची जोडी आणि रुमालाच्या डझनचा सेट...

शेवटी चवथ्या वर्षी म्हणाला होता,

"व्हाय टु वेस्ट मनी?"










''प्रिय व्यक्तीला काही देणे म्हणजे वाया जाणं का रे?''

''पण असलेल्याच वस्तू पुन्हा घेण्यात काय पॉईन्ट?''

''ओके. मग तूच सांग काय घेऊ तुला या वर्षी?''

''शूज नवे घ्यायलाच झाले आहेत...''

मग आपण शूज् घेतले होते, आणि आधीच मनाशी ठरविलेले सफारीसाठी कापडही... ती चार वर्षे देणे असल्यासारखे काहीबाही देतच राहिलो आपण... पण परिणती?

नकळत आनंदी स्वत:शी खिन्नपणे हसली... दिवाकरला ते आपल्यासाठीच वाटले, आणि तोही हसला, प्रतिसादाचे...

तेच सतेज दात, दाढा सोन्याने मढविलेल्या. घोटलेल्या एकाच गालावर हसताना पडणारी खळी, हनुवटीवर कोरलेली लहानशी दाढी...

आनंदी त्याच्याकडे पाहत राहिली. 'जहांगीर' मधले अनाकलनीय, गूढ पोर्ट्रेट असल्यासारखी...

''आनंदी, अनू...''

''.....''

''बोल ना, ग, नाही तरी. आयुष्यातले व्यवहार कसे कठपुतळ्यासारखे साजरे करायचे? सूत्रे हलविणारा कुणी निराळा. आपण एकच भान ठेवायचे. बदललेल्या सिच्युएशनशी जमवून घ्यायचे. ॲडजस्टमेन्ट...तडजोड, तडजोड...पटतंय् ना, अनू?''

''....''

''बोल ना, अनू, बोल काही तरी...''

''कशाला आलास तू इथे?''

''म्हणजे?... ऑफकोर्स, तुलाच भेटायला !''

''का?''

''येऊ नये?''

'आला नसतास, तर बरे झाले असते', हे याला सांगायला हवे, आनंदीला वाटले... पुढ्यातल्या वेटरकडे पाहून दिवाकरने विचारले,

''काय घेशील अनू?''

''छे! काहीच नाही...''

''मग?... मग कशाला आली होतीस इथे?''

''....''

''काही घ्यायला, खायला - प्यायला नाही, म्हणजे... म्हणजे मलाच भेटायला आली होतीस ना, अनू?'' दिवाकर म्हणाला, हसला. चकचकीत दातांनी. सोनेरी दाढांवर. गालावरच्या एकाच खळीने...

ते पाहून आनंदीला वाटले:

खाडकन् ठेवून द्यावी याच्या.

आणि पुढच्या क्षणी आश्चर्य वाटले. स्वत:चे... इतकी वर्षे अंधारकोठडीत कोंडलेले दुबळे मन जागृत, चैतन्यमय आहे वाटते अजून?

आनंदी सावरून बसली. ताठ. आत्मविश्वासाचा कणा लाभल्याप्रमाणे आणि पुढ्यातल्या वेटरला भरदार आवाजात म्हणाली,

''दो कॉफी, नेस्कॉफी...''

कॉफीची ऑर्डर देतानाही हा 'फिल्टर कॉफी'च सांगत असे. स्वस्त असते, म्हणून.

दिवाकर चक्रावला. पाहत राहिला... मधल्या आयुष्याने हिला 'सीझन्ड' केले, की काय?

आनंदीने समोर त्याच्याकडे पाहिले. नजरेला नजर देऊन. मग टेबलाकडे.

कोपऱ्यात एक टपोरा गुलाब होता.

तीन वाळवंटी तपांच्या सरणावर फुलला

आहे का आता हा?

"इट् इज युअर चॉईस. आय रिमेम्बर्ड इट् थ्रूआऊट माय् लाईफ..." आवाजात उत्साह आणून तो म्हणाला.

"थँक्यू, दिवाकर. बट इट्स यूसलेस् नाऊ."

"का? का, अनू?"

"ते दिवस गेले आता."

"म्हणजे?"

"आता मी गुलाब वापरीत नाही, घातलीत, तर घाणेरी, कुणाच्याही नजरेत न भरणारी." आनंदी म्हणाली.

गच्च बांधलेल्या शेपट्याचे थोटूक खांद्यावरून तिने पुढे घेतले. काळ्यापांढऱ्या, कुरळ्या केसांचे. काथ्याच्या दोरखंडासारखे.

"आता याला घाणेरीच शोभते, दिवाकर..."

"ओके. ॲग्रीड.. बट् व्हॉटस् अ चार्मफुल ॲन्ड इन्टेलक्चुअल कॉन्व्हर्सेशन, अनू?... अनू, यू जस्ट लाईक अ... त्या वेळी एक्सटर्नली बी.ए. केलं होतंच तू अनू. नाही का?"

... बी.ए.च काय? एल्एल्.बी. चा फर्स्ट पार्टही सोडवला होता आपण... किती कौतुकाने बी.ए.च्या रिझल्टनंतर पेढे दिले होते याला? याच्यासाठी सोनेरी कागदातून बांधून... पण म्हणाला होता,

"ठीक. पण वेळ आणि पुस्तकांतला पैसा हे वेस्टेज नाही वाटत तुला? काय मिळवलंस बी.ए. करून? इथे 'मॅक्सन'मधे इन्क्रीमेंट तरी मिळतं का ग्रॅजुएशनचं?... सांग बरं, हे वेस्टेज नाही का ते?"

मग त्यानंतर एल्एल्.बी. ला नाव एनरोल केल्याचे आपण बोललो नाही, की फर्स्ट पार्ट क्लिअर झाल्याचेही...

वेटरने कॉफी आणून ठेवली.. तिकडे नजर लावून दिवाकर म्हणाला,

"अनू, लेट अस् टर्न टू अवर पॉईंट."

"आय् डोन्ट हॅव एनी पॉईन्ट. इफ यू हॅव..."

तिच्या बोलण्याकडे दिवाकरने जाणूनबुजून दुर्लक्ष केले. त्याच गंभीरपणे पुढे म्हणाला,

"आता उद्यापासून काय करणार आहेस, अनू?"

"ठरविले नाही काहीच. पऽऽऽण..."

"बोल ना. थांबलीस का?"

"काही नाही."

"कोण कोण आहे घरी?"

"समजले नाही, वाटते? की लक्षातही आले नाही?"

"ते लक्षात आलं, गं..." तिच्या मोकळ्या गळ्याकडे पाहत तो पुढे म्हणाला, "बिल्डिंगमधे, तिसऱ्या मजल्यावरून एकदा पाचव्या मजल्यावर 'मॅक्सन'मधे तुला पाहिलं, तशीच कायमची राहिली आहेस, समजलं, म्हणूनच तर आज आलो इथे."

"मग?"

"मी विचारलं, तुझ्या भावंडांचं. माईंच..."

"त्यांची जबाबदारी माझ्यावर नाही केव्हाच संपली ती." आनंदी कडवटपणे म्हणाली.... या जबाबदाऱ्यांमुळेच तर दिवाकरने त्याचा मार्ग पत्करला होता.

"कुठे असतात?"

"माई तर हयातच नाही. भाऊ त्यांच्या संसारात. मी वेगळी. एकटीच..."

"मग काय करतेस 'मॅक्सन'मधून गेल्यावर?" कप उचलत तो पुढे म्हणाला, "घे. थंड होईल."

''काय करणार घरी गेल्यावर? स्वयंपाक. दुसरं काय?'' कॉफीचा घोट घेत ती म्हणाली.

''पण रविवारी? शनिवारी? सुट्टीच्या दिवशी? रजेवर असताना काय करतेस? म्हणजे काय करायचीस?.... आता कायमचीच रजा.''

''बसायचे पत्ते घेऊन.....''

''कोणाबरोबर?''

''एकटीच... बसते पेन्शनचा डाव मांडून. हवं ते, लागणारं पान येईपर्यंत हातातलं थडगं खोदत राहायचं. हवं ते पान वेळेवर मिळत नाही. डाव लवकर संपत नाही.''

दिवाकर चपापला. शब्द अडखळले. तिच्या शब्दांची धार त्याला अनपेक्षित होती.

''का? का भांबवलास?''

''नाही. म्हणजे...'' ओढून हसत दाढीतून बोटे फिरवित तो म्हणाला.

आनंदी आता निरखून पाहत होती.

त्याचे भव्य कपाळ, सोनेरी फ्रेमचा चष्मा, त्यातले पिंगट डोळे... डोक्यावर केस नाहीत आणि, विग आहे. पण तो मूळ केसांसारखाच आहे... हनुवटीवर कोरलेली दाढी. चकचकीत दात. सोनेरी दात आणि खळीची जागा....

कॉफी घ्यायचा तो थांबला होता, ते पाहत ती म्हणाली,

''घे ना, रे थंड होईल, थंड झाली की चव उरत नाही, बघ.''

''कॉफी घ्यायची एवढी घाई का? आता जायची घाई तर तुला नाही. नाही ना?'' हसून त्याने विचारले.

''होय. घाईच आहे. युनिव्हर्सिटी बंद होण्याआधी तिकडे जाईन, म्हणते.''

''कशासाठी?''

''एलूएल्.बी.च्या सेकंड पार्टची चौकशी करायला.''

''म्हणजे फर्स्ट झाला होता?''

''बी.ए. नंतर लगेचच केला होता.''

''वेल... म्हणजे यंग एज् मधले बॅकलॉग भरून काढणार आता. असेच ना?'' दिवाकरने विनोदाचा प्रयत्न केला.

पण आनंदी हसली नाही. गंभीरपणे म्हणाली,

''होय. तसेच.''

''मग असाच एक बॅकलॉग मी प्रपोज केला, तर?'' कपात तोंड लपवीत त्याने विचारले. तरी कपाच्या तळातून दाढी चोरून बाहेर आली.

''कोणता असा बॅकलॉग, की जो प्रपोज करणेही बॅकलॉगमध्ये राहून गेले होते?''

''आताच वकिलासारखं बोलायला लागलीस.''

''तसं नाही, रे...'' आनंदी म्हणाली. ओठांवरचे हसू तिला आवरता आले नाही. ते पाहून दिवाकर म्हणाला,

''अजूनही तशीच हसतेस.''

''तोही एक बॅकलॉग समज. एलूएल्.बी. सारखा. मधल्या वर्षात विसरून गेलेला...''पुन्हा गंभीर होऊन आनंदी म्हणाली.

''टेक इट सिरियसली, अनू.''

''येस. गो अहेड.''

दिवाकर सावरून बसला. सिगारेट काढली. ओठांत धरली आणि काडी ओढून ज्योतीवर झुकला. हाताच्या ओंजळीत...

साऱ्या त्याच लकबी आणि कोपरात दुमडलेल्या हातांचे तसेच फुगलेले दंड... अजून अंतर्बाह्य तसाच आहे हा..

''अनू, कॅनॉट वुई कम टुगेदर अगेन?''



अनुक्रमणिका

''अगेन? यापूर्वी आपण एकत्र नव्हतोच कधी, दिवाकर...''

''से 'नाऊ' देन... टु कम टुगेदर नाऊ.'' धुराच्या पडद्याआडून दिवाकर ओझे उतरल्यासारखा म्हणाला. पण मनात तिच्या होकाराचे मंद वारे वाहू लागले...

नाही तरी हिचेही पुढचे आयुष्य एकलेपणाचे आहे, ही अटकळ होती.

आनंदी गप्प राहिली,

हा एवढ्या वर्षांनी आला आहे... पूर्वी आपण त्याला हव्या होतो, त्या 'फक्त तू' अशा. आणि आज?... कसे, का परिवर्तन झाले हे?

दिवाकरच्या छातीवरचा, अजून तसाच भडक रंगाचा, वरच्या सोनेरी क्लिपचा टाय् हातात पकडावा, आणि त्याला गळ्यापाशी हिसडे देऊन मधल्या वर्षांचे, तेव्हाचे हिशोब विचारावे, आनंदीला वाटले.

''अनू...''

''...''

''से 'येस,' माय डार्लिंग.''

''या, आजच्या प्रपोजलचे कारण?''

''उघड आहे.''

''मी अजून एकटी आहे, आणि आता 'फक्त मी' मिळू शकते, म्हणून?''

''फर्गेट दि ओल्ड थिंग्ज्, अनू... मी मघाशी म्हणालो ना, आपण साऱ्या कठपुतळ्या फक्त तडजोडीचे भान ठेवायचे, म्हणून?''

''मला आता सर्व्हिस नाही, दिवाकर.''

''गरजही नाही. खूप सेव्हिंग आहे. दीप्तीच्या आजारपणातही खर्च झाला नाही फार... अॅन्ड स्टिल आय् अॅम यंग. आय् हॅव अॅक्सेप्टेड दि जॉब आफ्टर रिटायरमेन्ट.''

''दीप्ति? तुझ्या मिसेस्?''

''होय, गेल्या वर्षी गेली ती. डॉक्टरना, किडनी फेल्युअर होणार, असे वाटत होते, पण थँक गॉड, साधी जॉन्डीस झाली आणि गेली ती. कुणाला कष्ट न देता आणि मनी वेस्ट न होता.'' दिवाकर कोरडेपणी म्हणाला.

खराच. अगदी तसाच राहिला आहे अजून हा, आनंदीला वाटले.

''पण पुढे तुझी मुले? नातवंडे?'' तिने विचारले.

''कोण कुणाला हयातभर पुरतं? सगळेच विभक्त. वेगवेगळल्या विश्वांचे.''

''सगळी विभक्त असतील. पण तेच बरे नाही का?.... तुही विभक्त असल्याने कुणाच्या जबाबदारीचे ओझे तरी असणार नाहा तुझ्यावर, दिवाकर...'' आनंदीने वर्मावर घाव घातला.

''अनू, डोन्ट पझल मी, प्लीज डोन्ट!'' निराशोने किंचित हळवा होऊन तो म्हणाला.

''... ...''

''या समोरच्या अवाढव्या इमारती पाहिल्यास? कसा महाराणीचा थाट आहे. बागांची सिंहासने आहेत. गळ्यातल्या अलंकारांसारखे भोवतीचे रस्ते... पण या संध्याकाळी कशा एकाकी वाटतात, बघ. आपल्या उर्वरित आयुष्यांसारख्या.''

''करेक्ट, दिवाकर, करेक्ट, अॅज यू से...''

''वाटते ना तुलाही तसेच?''

''दिवसभराच्या या महाराणी, गजबजाटाचे वैभव ओसरल्यावर तिन्हीसांजेच्या कातरवेळी, आणि पुढल्या प्रलयंकारी काळरात्री काय करीत असतील, रे?''

''अनू, आनंदी...''

''त्यांचे मुके हुंदके, घुसमट. निशेच्या पदरात लुप्त होणाऱ्या अश्रुधारा, कुणाला तरी दिसतात का, रे? वर्षानुवर्ष चाललेली त्यांची

ही परवड एखाद्याच्या तरी ध्यान्यात येता का, रे?''

''आनंदी, कम टु दि ओरिजिनल पॉईन्ट. माय प्रपोजल.''

''सारीच आपल्यांत गुरफटलेली. कशाला ध्यानात यावेत ह्यांचे ते दुबळे चीत्कार, उसासे?... आपल्याच रित्या, उद्ध्वस्त मनाचे प्रतिबिंब केव्हा तरी यांच्यात उमटते, दिसते, तेव्हाच त्यांचे दु:ख जाणवते. दिवाकर, असा एखादाच दिवस आजचा येतो तो.''

''आय् वॉन्ट युअर डिसिजन. आय् ॲम होपफुल. आय् वॉन्ट पॉझिटिव्ह रिप्लाय फ्रॉम यू. आनंदी.'' दिवाकर रागाने म्हणाला. टेबलावर मूठ आदळली. धुराचा भपकन् भपकारा सोडला.

पण आनंदी निर्विकार राहिली. किंचित हसून निर्भीडपणे म्हणाली,

''दिवाकर, आय् फील, यू आर वाईज इनफ टु अंडरस्टँड माय डिसिजन.''

दिवाकर चरफडला. पराभव आणि त्वेषाने पिंगे डोळे पेटल्यासारखे वाटू लागले. सिगारेटचे थोटूक त्याने खाली फेकले. बुटाखाली चिरडले... कपाळावरची शीर फुलवली. चकचकीत दात काळसर ओठांत लपले...दुसरी सिगारेट काढून तो पुन्हा ओंजळीत झुकला, तेव्हा आनंदी उठली पर्स खांद्याला अडकवीत म्हणाली.

''ओके...गुडबाय्.''

काऊन्टरवर पैसे दिले, आणि बाहेर पडली.

उडप्याकडून एकटीच रस्त्यावर आली, तेव्हा सांज दर्दभरी होऊन आभाळभर भिनली होती... त्या रस्त्याने सरळ पुढे आल्यावर एक कोपरा लागला. थोडासा एकाकी, सामसूम आणि तिथे वळण, काटकोनाचे...

आनंदीने घड्याळ्यात पाहिले.

आता उशीर झाला. पण उद्या युनिव्हर्सिटीत जायचे. जायचे हे नक्की...

बरे झाले!... पाण्याची भीती असलेल्या मुलाला अचानक डोहात ढकलून देतात, तेव्हा ते हातपाय झाडू लागते. कदाचित पोहायलाही... बरे झाले, आज दिवाकर येऊन गेला, ते. आता डोहाची भीती उरली नाही...'उद्या'चे कोडेही उकलले...

आनंदीने क्षणभर डोळे मिटून घेतले, तेव्हा एक मंद आवाज तिला ऐकू आला. घनगंभीर, पण निरपेक्षपणे निमंत्रण दिल्यासारखा... पुन्हा तीच सागरगाज ऐकू आली...

झपझप पावले टाकीत आनंदी समुद्राकडे जाऊ लागली.

चौपाटीचा किनारा आज रिकामा होता. काही कोळ्यांची वर्दळ तेवढी होती. बाकी कट्टाही जवळजवळ रिकामा...

समुद्रकिनारा सोडीत नाही, भरती आली, तरी तटाचे बंधन तोडत नाही, हेच आजवर भावले होते. 'त्या' खिडकीने हेच दाखविले होते. कट्ट्यापाशी आल्यावर लाटा त्याला वेढून टाकतात, उंच उसळ्या मारून झगडतात, हे दिसलेच नव्हते आजवर. त्यासाठी 'ती' खिडकी सोडावी लागली. या उघड्या, मोकळ्या आकाशाखाली यावे लागले...

फेसाळणाऱ्या तुषारांकडे, फुटणाऱ्या लाटांकडे आनंदी पाहत राहिली... पाठीमागून एक अस्पष्ट स्पर्श जाणवला. पुन्हा जाणवला... असेल कुणी भिकारी... आनंदीने दुर्लक्ष केले.

पुन्हा तोच स्पर्श झाला.

आनंदीने वळून पाहिले...दहा वर्षांचा पोर हातात इवली टोपली घेऊन आर्द्र नजरेने पाहत

होता.

ती क्षणभर बावरली, विचलित झाली. मग मनाशी म्हणाली,

'काय हरकत आहे?'

——आणि पर्स उघडून तिने रुपाया काढला. म्हणाली,

'दे दो...''

मुलाने आनंदाने टोपलीतून गजरा ओढला.. कृतज्ञतेने पाहत, तिच्या हातात देताना म्हणाला,

''पहेलाही है. बोहनीका.''

पर्सच्या तळात कुठेतरी गाडली गेलेली पिन आनंदीने शोधून काढली.. गजरा वेणीत गुंफला...

मोगऱ्याच्या एक नवा ओजस स्पर्श, आशादायी, चेतक गंध तिचा भोवताल उल्हसित करीत राहिला. .

तिने श्वास घेतला. पुन्हा भरभरून... आश्चर्याने आजूबाजूला पाहिले. नंतर आभाळाकडेही...

कुठून तरी ओल्या मातीचाही प्रसन्न वास येत होता. मंद हलका, पण अस्तित्त्वाची जाणीव करून देणारा...

'नक्कीच कुठे तरी पहिल्या मृगाचा शिडकावा झाला आहे...'' ती स्वत:शीच म्हणाली.

□

सुमेध वडावाला (रिसबूड)
द्वारा अ. पु. साठे, 'सहजीवन' टॉप
फ्लोअर, विजय स्टोअर्सच्यावर,
मार्केट एरिया, विलेपार्ले (पूर्व),
मुंबई ४०० ०५७.

## स्वागत

- ❑ **सुमनस :** नरेन्द्र बोडके, गोमंतक मराठी अकादमी गोवा, पृष्ठे १०६
- ❑ **काचकांगऱ्या :** डॉ. राजीव उन्हाळे, भूमिका प्रकाशन, पृष्ठे १५५
- ❑ **ज्ञानेश्वर पंचक :** प्र.न.जोशी, स्नेहवर्धन पब्लिशिंग, पुणे, पृष्ठे १५०
- ❑ **घुंगुरवाळा :** इंदिरा संत, स्नेहवर्धन पब्लिशिंग, पुणे, पृष्ठे १५२
- ❑ **अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास :** प्र.न.जोशी, स्नेहवर्धन पब्लिशिंग, पुणे, पृष्ठे २२०
- ❑ **मराठी कादंबरीतील प्रादेशिकता :** डॉ.भास्कर शेळके, स्नेहवर्धन पब्लिशिंग, पुणे, पृष्ठे १३२
- ❑ **ब्रह्मविद्या शास्त्र :** डॉ.अण्णासाहेब अडसूळ, स्नेहवर्धन पब्लिशिंग, पुणे. पृष्ठे १८८

### श्रीविद्या प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने

- ❑ **पाच तपांची पत्रकारिता :** विश्वनाथ वाबळे, पुणे. पृष्ठे १७९
- ❑ **रामायण एका माणसाची कथा :** सदाशिव आठवले, पुणे. पृष्ठे १९४
- ❑ **ना चिरा ना पणती :** रा.सो.सराफ, पृष्ठे ७०
- ❑ **कर्मयोगी :** जानकीबाई आपटे, प्रकाशक भा.प.आपटे, पृष्ठे १०९
- ❑ **वेड्या मना तळमळसी :** वामनराव कुलकर्णी, पुणे. पृष्ठे २५३

# बदलती भूमिका / सुमेध वडावाला-रिसबूड

*मनात अेक प्रेमकथा होती. अेक साधी सोपी अयशस्वी प्रेमाची कथा. प्रेम यशस्वी झालं असं केव्हा म्हणता येईल, हा प्रश्न होताच. त्याची काही शक्य अुत्तरेही मनात धूसरपणे होती. काही आनुषंगिक प्रश्नही!*

*रक्ताचे नाते नसणाऱ्या स्त्री-पुरुषातल्या प्रेमाची परिणती लग्नात झाली, तरच ते प्रेम यशस्वी झाले म्हणायचे काय? लग्नानंतर 'न पटणे' सुरू झाले तर लग्नपूर्व प्रेम 'बेगडी' अथवा शारीर आकर्षणापुरते मानायचे काय? प्रेम रूजून ते वाढताना अपेक्षांचा प्रवास कसा होतो आहे, त्यावर त्याची यशस्वीता अवलंबून आहे, हे एकूणच सार! पण या अपेक्षाच भिन्नमार्गी असतील तर?..... म्हणजे, दोघांपैकी एकाला 'प्रेम' या पायावर आधारित संसार, शारीर आकर्षण, अपेक्षा असली, तरी अतूट, अखंड सहवास अपेक्षित असेल; आणि दुसऱ्याला 'भौतिक' सुखासाठी, 'केवळ आपल्या दोघांचा' असा स्वार्थी संसार अपेक्षित असेल तर?*

*तर 'व्यवहार'सारखी चुकलेल्या, कदाचित संधी मिळाल्यावर सुधारून घेतलेल्या व्यवहाराची कहाणी जन्माला येते.*

*मला आनंदी दिसत होती. मला दिवाकर दिसत होता. दिवाकर पुरुष आहे म्हणून कोणताही पूर्वग्रह नव्हता. किंवा आनंदी स्त्री आहे, म्हणून 'झुकते' माप नव्हते. लेखनात समाजाचे प्रतिबिंब उमटते, हे सत्य (खरे म्हणजे ते परिपूर्ण नसलेले सत्य आहे. सिद्धता शब्दमर्यादांमुळे अशक्य!) मानले, तर समाजव्यवहार काय सांगतो? (अॅज ऑन टुडे) दगाबाजीच्या घटना पुरुषांकडून अधिक होतात हेच ना? प्रेमविवाहांचे सोडाच. 'प्रपोज्ड मॅरेज' निश्चित केल्यानंतर अपघाताने मृत्यू पावलेल्या आपल्या न झालेल्या नवऱ्यासाठी अविवाहित राहिलेल्या प्रौढ स्त्रिया मला माहीत आहेत. पण लग्नापूर्वी स्त्रीच्या मृत्यूनंतर अविवाहित राहिलेला पुरुष माझ्यातरी पाहण्यात नाही. दारूड्या, विकलांग, अक्षम नवऱ्याला त्याच्या रागलोभांसह पोसणारी बायको हे एक नित्यवास्तव आहे. आणि अपघाताने अपंग, विकलांग झालेल्या, आजवर 'लग्नदृष्टी'ने प्रेम करीत असलेल्या अभिनेत्रीला झिडकारून दुसऱ्या नटीशी बिनदिक्कतपणे लग्न, संसार करणारा अभिनेता हे आणखी एक वास्तव आहे. पूर्वग्रह नसतानाही; 'पुरुष' म्हणून नाही; तर 'अधिक्या'ने सिद्ध झालेली स्थिती म्हणून दिवाकर 'खलवृत्ती'चा दाखविला गेला.*

*दिवाकर आणि आनंदी यांच्यातले प्रेम आणि प्रतारणा एवढाच ऐवज मुळात मनात लख्ख उभा होता. त्याला शब्द, घटना यांचा नेटका, सुयोग्य साज उपलब्ध होत नव्हता. पण एका संध्याकाळी 'फोर्ट' मध्ये फिरताना एका देखण्या इमारतीकडे नजर गेली. उतरलेल्या उन्हात किती वेगळी आणि उदास वाटत होती ती! मी तिच्यात कामानिमित्त अनेकवेळा गेलो होतो. अंतर्बाह्य गजबज आणि दरवाजापासून साऱ्याच 'पॉश,' देखण्या माणसांचा तिच्यातला राबता. अशा वैभवी इमारतीचे; छायाही सोबतीला नसलेले असे विदीर्ण रूप पाहताना मला वाटले;*

आता दिवाकर आणि आनंदी यांच्यातली कथा व्यक्त होऊ शकेल.

आता माणसांची सोबत नसलेली ही फक्त उदास संध्याकाळ आहे. इमारती भोवतीच्या रस्त्यावर थोडी अजून वर्दळ आहे. पण निर्मनुष्य रस्त्यांच्या सुतकगराड्यातली निर्घृण रात्र अजून यायचीच आहे. त्यावेळच्या जरठशांतीत सौम्य, पुसट गाज तिला ऐकू येईल. मात्र ती देणारा समुद्रही तिच्या कक्षेबाहेरच असणार आहे. तिला अदृष्यच राहाणार आहे.

आणि तरीही, या इमारतीला 'उद्या'ची पहाट एका नव्या उमेदीने साजरी करायला सिद्ध व्हायचे आहे.

सोबत्यांनी दिलेला प्रतारणेचा, नकाराचा, अपमानाचा जहरी अनुभव!

त्यानंतरच्या त्याच त्या अदिम जीवनेच्छा! उमेद आणि आशेच्या!

आनंदी, दिवाकर, प्रतारणा, इमारत, संध्याकाळ, रात्र, समुद्र, उमेद अशी साखळी मनात जडत, घडत गेली. आणि आजूबाजूच्या पात्रांचे (जसे आनंदीचे ऑफिस. जीवनेच्छांनी सळसळणारे जग. तिचे सावत्र आईसहचे कुटुंब), काही घटनांचे पीळ देऊन ती अधिक पीळदार, जोरकस केली गेली.

जसे; निवृत्तीच्या दिवशी तिची दिवाकरशी झालेली पुनर्भेट! शेवटपर्यंत त्याच्यातला अतिव्यवहारी, महास्वार्थी माणूस जागा आहे. मुळातली सौम्य स्वभावाची मात्र आता त्याला धडा शिकवायला सिद्ध झालेली आनंदी. तिच्या तिथवरचा मनोबदलांचा प्रवास. ती इमारत. इमारतीचे तिच्या मनात जागे झालेले, नव्हेच तिने बोलून दाखविलेले रूपक. आणि गाज ऐकवणाऱ्या समुद्राकडे तिचे जाणे. वाऱ्याच्या थंड झुळुकेसाठी नाही तर आजवर न माळलेला गजरा आपणच आपल्याला माळून घेण्यासाठीही!

का आपण पारखे व्हायचे सुगंधाला?

सावत्र काय आणि सख्खे काय? सावत्र आई; भावंडांनी स्वार्थाचा जो हिडीस अनुभव आपल्याला दिला, होऊ घातलेल्या, अजूनही तशी तयारी दाखविणाऱ्या संभाव्य सख्ख्या नवऱ्याने जो अनुभव दिला, त्या सर्वांची प्रातिनिधिक परतफेड करून शेवटच्या बिंदूवर 'व्यवहार' जिंकून सुफळ, संपूर्ण आयुष्याची धनी ठरलेली निवृत्त, तरीही नव्या आयुष्याची उमेद बाळगणारी आनंदी नावाची माझी मानसकन्या हे माझ्या दुर्बळ मनाचे स्वप्नरंजन आहे.

हे फक्त 'व्यवहार' पुरतेच खरे आहे.

असे 'स्वप्नरंजन' हा काही अन्य कथांच्या लेखनाचा 'फॉर्म्यूला' ठरू शकत नाही. जे वास्तवात आहे, म्हणजे माझे मन, मी जसा आहे, माझ्या नजरेतून माझा भोवताल मला जसा प्रतीत होतो त्यांच्याही कथा होतात. मी जसा नाही, मी जसा असायला हवा होतो, भोवताल जसा नाही, जसा तो असायला हवा होता, यांच्या स्वप्नांच्याही कथा होतात. अनेकदा ती संमिश्र स्वरूपाचीही असते. म्हणूनच लिहिलेली कथा सर्वच वाचकांना एकाच तऱ्हेने, एकाच प्रमाणात 'अपील' होत नाही.

लेखकाला जशी त्या आकृतीपुरती एक भूमिका असते, तशी वाचकालाही त्याच्या अनुभूतींतून सिद्ध झालेली भूमिका असते. आकृतीगणिक लेखकाची भूमिका थोडीफार बदलणे










*शक्य असते. तिला 'फ्लेक्झिबिलिटी' असते. त्या तुलनेत वाचकाची भूमिका मात्र 'स्टॅटिक' स्वरूपाची! त्या दोन्ही भूमिकांची 'फ्रीकेन्सी' जुळली की प्रतिक्रिया येते, 'भिडणारं लिहिलंय याने. आवडलं!'*

*पुनर्लेखनाने सिद्ध झालेल्या या 'व्यवहार'ला ही प्रतिक्रिया थोड्या जास्त प्रमाणात मिळाली, हे तिचे सद्‌भाग्यच!*

❑

---

## स्वागत

- ❑ **साधना :** सुरेश हरी थत्ते, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे. पृष्ठे ९६
- ❑ **उखाणे आणि स्त्रियांची गाणी :** अनुराधा तांबोळकर, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६४
- ❑ **आपली त्वचा :** डॉ.किशोर पै, शिव पब्लिकेशन्स, पुणे, पृष्ठे ३२
- ❑ **भारताचे पंतप्रधान लालबहादूर शास्त्री** म.श्री.दीक्षित, पृष्ठे ३२
- ❑ **दक्षिण भारतातील मराठी वाङ्मयाचा इतिहास :** डॉ.माणिक धनपलवार, राज्य मराठी विकास संस्था, मुंवई. पृष्ठे ३६२
- ❑ **तंजावर सूचि सहावा खंड :** टी.आर.भीमराव - केसकर. राज्य मराठी विकास संस्था, मुंबई. पृष्ठे १९६
- ❑ **भोगी :** कचरू भालेराव, अनिक प्रकाशन, संगमनेर, पृष्ठे ६६
- ❑ **लोकनाट्य उद्‌गम आणि विकास :** डॉ.पु.मा.कालभूत, विजय प्रकाशन, नागपूर. पृष्ठे ११९
- ❑ **डॉ. आनंदीबाई जोशी :** अंजली कीर्तने, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ५०९
- ❑ **सत्य :** सौ. अनुताई व्यं. मोडगी, पृथ्वीराज प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६४
- ❑ **पहाटवारा :** वि.वि.देऊळगावकर, नीहारा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ४८
- ❑ **शब्द माझे :** उमाकांत बुट, मृदगंधा प्रकाशन, भोसरी, पुणे. पृष्ठे ५७

**प्रतिमा प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने**

- ❑ **साहित्य समीक्षा आणि आस्वाद :** डॉ. दादा गोरे, पृष्ठे १३४
- ❑ **म. फुले यांची कविता :** डॉ. दादा गोरे, पृष्ठे ६०
- ❑ **साहित्य विचार :** द.वा.कुलकर्णी पृष्ठे १२०

**उत्कर्ष प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने**

- ❑ **सकलते मधील आनंद :** अनुवाद - अशोक पाध्ये, पृष्ठे २२०
- ❑ **वाघाच्या मागावर :** व्यंकटेश माडगुळकर, पृष्ठे १९१
- ❑ **छत्रपती शिवाजी (मराठी व इंग्रजी) :** रमेश मुधोळकर, पृष्ठे ३२
- ❑ **नव्या वाटा :** वायू. पी. नाईक, प्रकाशक - स्वतः लेखक, पृष्ठे ६४



अनुक्रमणिका

# उदकाचिया आर्ती



मिलिंद बोकील



आपली आई ह्या दूर डोंगराळ प्रदेशात कधी येईल अशी रोहिणीने कल्पनाही केली नव्हती. पण गेले चार दिवस आई तिच्यासोबत होती. तिकडे यायचे यायचे असे तिचे बरेच दिवस चालले होते. पण कधी जमून आले नाही. रोहिणीने खरे तर ते कधी गंभीरपणे घेतले नव्हते. आपण काय काम करतो हे आईला माहीत जरी असले तरी प्रत्यक्ष इथं येऊन ती राहील अशी तिने अपेक्षा केली नव्हती.

पण आई इथे होती. नदीकाठच्या या खेडेगावात तिने चार दिवस घालवले होते आणि आता संध्याकाळच्या गाडीने ती परतही जाणार होती. तिने अजून काही दिवस रहावे असे रोहिणीला फार वाटत होते. चार दिवस फार झरझर निघून गेले. आणि भोवताली माणसांचा सारखा गराडा होता. त्यामुळे आई आली पण आपण पुरेसा वेळ तिच्यासाठी देऊ शकलो नाही अशी तिला काहीशी रूखरूख लागून राहिली होती.

पारावर बसल्या बसल्या रोहिणीने आईकडे वळून पाहिले. झाड पिंपळाचे होते आणि त्याभोवती प्रशस्त पार बांधलेला होता. एका बाजूला नदी आणि दुसऱ्या बाजूला गाव. नदीकडे तोंड करून आई वाचत बसलेली होती. नेहमीसारखीच ज्ञानेश्वरी. उजवा पाय मांडी घालून आणि पाय गुडघ्यापाशी मोडून जवळ घेतलेला. पांढऱ्या, बारीक फुलांच्या नऊवारी साडीचा पदर अंगावरून लपेटून घेऊन. तिची ती बसण्याची नेहमीची ढब होती. ती मनातल्या मनात कधीच वाचत नसे. ऐकू येईल न येईल अशा आवाजात ओव्या म्हणत राही. नीट कान देऊन ऐकले तरच शब्द ऐकू येत. एरवी मधमाश्यांच्या गुंजारवासारखा एक हलका ध्वनी.

तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे बघताना रोहिणीला वाटले : आपल्या मनात आईची जी प्रतिमा आहे ती अशीच आहे. पाठमोरी बसलेली. अंगावर असाच पांढऱ्या धुवट पातळाचा पदर. काळ्या-पांढऱ्या केसांची गाठ. आणि गुणगुणल्याचा नाद. घरात, शेजारी, लग्नसमारंभात आणि आता इथंही. कुठंही पाहिलं तरी आईची हीच आकृती मनात येते. मधूनच एखादी ओवी वाचली की ती वळून सांगते. आणि बऱ्याच वेळा तर मनाशीच बोलत बसते. मग कुणी शेजारी असो वा नसो.

रोहिणीला त्याचे किंचित हसू आले. मग बुंध्याला पाठ टेकवून तिने पाय लांबवले. उन्हे वरती आली होती तरी हवेत काहीसा गारवा होता. तिच्या एका हाताला नदी होती आणि

दुसऱ्या हाताला चाळीस-पन्नास घरांचे ते लहानसे गाव. नदीला वाळवंट असे नव्हतेच. नुसताच दगडांचा पसारा. दोन-दोन पुरुष उंचीचे अवाढव्य खडक. त्यातून जोराने वाट काढत घुसणारे करडे-पिवळे पाणी. गावाकडे चढत जाणारी जमीन. आणि त्यानंतर गवताने शाकारलेली मातीची घरे. काहीशी इतस्तत: बांधलेली. बहुतेक भिंतींवर गोवऱ्या थापलेल्या. दारात बैल नाही तर शेळ्या बांधलेल्या. कुठे कुठे मोकळ्या सोडून ठेवलेल्या बैलगाड्या. डोक्यावर पितळेच्या कळशा घेऊन लगबगीने चालणाऱ्या बायका आणि गावच्या वेशीवरच्या देवळात चाललेली पालखीची तयारी.

रोहिणीच्या मांडीवर आणि आजूबाजूला कागदपत्रांचा पसारा होता. त्यावर वजन म्हणून दगड ठेवलेले. खूप दिवसांची पत्रे साचून राहिली होती. दिवस इतके धावपळीचे होते की काही लिफाफे उघडून वाचायलाही फुरसद झाली नव्हती. रोज निरनिराळ्या गावांमधे वैठका, चर्चा, लोकांना एकत्र आणण्याची लगबग. थोडीशी उसंत खाऊन पुन्हा एकदा जोरात लढाई सुरू करायची तयारी. कार्यकर्ते तर रात्रंदिवस भोवताली होते. आसपासच्या गावातूनही माणसं सारखी भेटायला येत. दोन दिवसांपासून एका इंग्रजी मासिकाचा पत्रकार गावात मुक्कामाला होता.

''ऐक ग! ज्ञानोबा काय म्हणतो,'' आई मध्येच वळून म्हणाली. मग तिने ओवी ऐकवली :

*जैसे विरजणियाचेनि संगे*
*दूधच आटेजों लागे*
*तैशी प्रकृती आंगा रिगे*
*सृष्टीपणाचिया*

''काय कसा आहे दृष्टान्त?'' ती म्हणाली.

रोहिणी न बोलता फक्त हसली. तिला माहीत होते, आपण काही बोलण्याची आवश्यकता नाही आहे. आईला उत्तर हवंच असतं असं नाही. नेहमी असेच व्हायचे. वाचता वाचता एखादी ओवी मनाला पटली की ती मग जवळ कोणी असेल त्याला सांगे. मग ते कुणीही असो. रोहिणी, तिची बहीण नलिनी, शेजारच्या बायका, मोलकरीण, धोबी आला असला तर त्यालासुद्धा. आणि एकदा तर तिची तंद्री लागली होती तेव्हा, 'काळी' मांजरीलाही तिने थोपटत ओवी सांगितली होती.

आपल्या आईचे त्या पोथीवर किती प्रेम आहे ते रोहिणीला माहीत होते. दिवसातून कधीही फुरसद मिळाली तर ती पुस्तक उघडून वाचत बसे. ओव्या तर तिला पाठच होत्या, पण कित्येकदा अवघड वाटणाऱ्या ओळींचा अर्थही ती सोपा करून सांगे आणि शेंगेतल्या दाण्यासारखा सारांश सोलून हातावर ठेवी. मुली तिची कधी कधी फार चेष्टा करत. मुख्यत: ती ज्ञानेश्वराचा ज्ञानबा, ज्ञानू, ज्ञान्या अशा लडिवाळ नावांनी उल्लेख करी तेव्हा 'तो तुझा मित्र आहे का ग?' रोहिणीची बहीण नेहमी विचारी. 'तो आता असता ना, तर बागेत घेऊन फिरायला गेली असतीस त्याला.'

रोहिणीला वाटले, आपल्या आईच्या आयुष्याला त्या लहानशा ग्रंथानं फार मोठा आधार दिला आहे. आणि ज्ञानेश्वरीचं जेवढं महत्त्व तिच्या आयुष्यात आहे तेवढं तर नानांचंही नव्हतं. नाना गेल्यावर त्यांच्या फार आठवणी काढल्या नाहीत तिनं. आणि आता



मिलिंद बोकील

*इंजिनियरिंगमधील पदविका, एम्.ए., पीएच्. डी. (समाजशास्त्र)*
*'पश्चिम महाराष्ट्रातील पाणी प्रश्न' हा विषय.*
*व्यवसाय : 'डेव्हलपमेंट सपोर्ट टीम' या संस्थेत संशोधन अधिकारी.*
*आदिवासी मानवसमूह, स्वयंसेवी चळवळी, स्त्रियांचे प्रश्न आणि पर्यावरणजवळ इत्यादी विषयांवर संशोधन केलेले आहे.*

***पारितोषिके :***
*'उदकाचिया आर्ती' ह्या संग्रहास पुढील पारितोषिके मिळाली.*
*(१) महाराष्ट्र साहित्य परिषदेचा दि. बा. मोकाशी पुरस्कार*
*(२) श्री. दा. पानवलकर कथा पुरस्कार*
*(३) नासिकचा अ. वा. वर्टी पुरस्कार*
*(४) कऱ्हाड पुरस्कार*
*(५) महाराष्ट्र फाऊंडेशन पुरस्कार*
*'उदकाचिया आर्ती' ही कथा 'कथा - प्राईझ स्टोरीज' या पुस्तकाच्या दुसऱ्या खंडात इंग्रजीत भाषान्तरित करून प्रसिद्ध झाली आहे.*

***आगामी लेखन प्रकल्प :***
*(१) दोन लघु कादंबऱ्या आणि एक मोठी कादंबरी.*
*(२) Development socilogy वर मराठी पुस्तक.*
*(३) स्त्रियांच्या प्रश्नांची भारतीय परंपरेत कशी मांडणी झाली आहे याविषयी लेखन.*

तर नाहीच नाही. रोहिणीला ती नेहमी सांगत असे, 'बये, तू वाचत जा हा ग्रंथ. कसली कसली काळजी उरणार नाही तुला. कसलेही प्रश्न पडणार नाहीत.'

पण रोहिणीला ते कधी जमले नाही. तिला माहीत होते, आपली मनोवृत्ती आईसारखी नाही. आणि प्रश्न नसतील तर नव्यानं निर्माण करण्यात रस असतो आपल्याला. लोक तर म्हणतातच, की हा धरणात बुडणाऱ्या लोकांचा प्रश्न तुम्हीच निर्माण केला. नाहीतर नेहमी धरणं बांधली जात होती. गावं बुडतच होती. लोक देशोधडीला लागतच होते. इथंही तसंच झालं असतं, दुसरं काय? अर्थात प्रश्न उभा करूनही तो सुटला नाहीच. उलट, त्यातून आणखी प्रश्न तयारं झाले. मोठी धरणं बांधावीत की नाहीत इथपासून जगात चांगलं काय आणि वाईट काय इथपर्यंत. आणि तिला माहीत होते, की त्यांतले कित्येक प्रश्न तर आपल्या आयुष्यातही न सुटणारे आहेत. आणि दिवसेंदिवस काही उलगडा होण्याऐवजी आपण त्या जाळ्यात अधिकाधिक गुंतत चाललो आहोत.

''दिदी,'' मणिरामने जवळ येऊन हाक










मारली.

तिने वळून पाहिले. पिवळेधमक पागोटे घातलेल्या एका म्हाताऱ्या माणसाला घेऊन तो जवळ उभा होता.

"आप है गंगावती गाँव के प्रधान," तो म्हणाला. "आजकी मीटिंग के लिये अपने गाँवसे आये है."

"गंगावती?" रोहिणी आश्चर्याने म्हणाली. "वो गाँव तो बहोत दूर है."

"हां जी. करीब बीस मील."

"आपके गाँवपर तो कोई संकट नही आनेवाला है."

"नही जी," म्हातारा प्रधान म्हणाला, "हमारा गाँव तो बच गया. लेकिन यहाँके लोग भी हमारे ही है, उनका संकट हमारा ही संकट है. आप चलती है तो हम भी आपके साथ चलेंगे."

"दो मण गेंहू लायें है साथ." मणिराम म्हणाला.

रोहिणी किंचित हसली. प्रधानाला नमस्कार करत म्हणाली, "अगर आप साथ चलते है तो इससे अच्छा और क्या होगा? संघर्ष तो आपही लोगोंका है. जितने लोक साथ आये, हौसला और बढ जायेगा."

ते लोक नमस्कार करून परत गेले आणि रोहिणीचे मन नेहमीसारखे भरून आले. तिला कळत होते, मासिकांतून आणि पेपरांतून आपले फोटो येत असले आणि सर्वदूर आपल्या नावाची चर्चा होत असली तरी खरा लढा लोक चालवत आहेत — हे डोंगरात राहणारे येडेबागडे भिल्ल. म्हातारे, तरुण, बायका, मुलं. आपण नुसतं निमित्त आहोत. सुरुवातीला कळलं नव्हतं आपल्याला ते. तेव्हा तर हा जणू आपला एकटीचाच खाजगी प्रश्न आहे असं आपण वागायचो. आईच एक दिवशी म्हणाली,

"बये, फार अहंकार ठेवू नकोस बरं. कर्ताकरविता तू नाही आहेस. लोक चालवतायेत तुला. ती माणसं आहेत म्हणून तू आहेस. विसरू नको कधी."

"आईनं ती जाणीव करून दिली ते फार बरं झालं. पूर्वीही ती असं सांगायचीच. पण आपल्याला त्याचं महत्त्व कधी वाटलं नाही. जसजसे आपण मोठे होत गेलो तसतसं थोडं थोडं समजू लागलं. आईला एखाद्या परिस्थितीचं जसं चट्कन आकलन होई तसं आपल्याला कधी जमलं नाही. आणि तिच्या बोलण्यात घुळघुळपणा नसतो. शब्दांच्या फापटपसाऱ्यात अडकत नाही ती. पूर्वी सगळ्या विचारांचं ओझं आपण स्वतःच अंगावर घ्यायचो. आता वाटतं, आईला सांगावं, आणि तिच्याकडून पट्कन उत्तर मिळवावं.

मणिराम परत जवळ आला.

"दिदी, तैयारी तो सब हो गयी है. कैसे करेंगे?"

"तुम क्या सोचते हो?"

"पहले मंदिर जाकर आयेंगे. फिर मीटिंग करेंगे."

"ठीक है. वैसेही करते है." तिने सांगितले. मग आईकडे वळून म्हणाली,

"आटपतेस ना ग? तयारी झाली पालखीची."

आईने आधी तिला 'थांब' असा हातानेच इशारा केला. मग ओवी पूर्ण करून पुस्तक मिटत ती म्हणाली, "झालंच. आटपायचंय काय त्यात? खुणेचा कागद घालून पुस्तक मिटायचं की आटपलं."

मग ती रोहिणीशेजारी येऊन बसली. तिथून पालखीभोवती चाललेला गलबला स्पष्ट दिसत होता. लाल - पिवळी पागोटी आणि पूर्ण बाह्यांचे पांढरे सदरे घातलेले पुरुष. रंगीबेरंगी ओढण्यांतल्या स्त्रिया. एका बाजूला ढोल-झांजांचा संच घेऊन बसलेले वाद्यकरी. पोराबाळांची गर्दी. त्यातच पालखीभोवती गोंडे बांधायचे काम चालू होते. बाकी सरंजामही मांडून तयार होता. आता देवळातल्या देवीचा मुखवटा घेऊन पालखीत ठेवायचा आणि डोंगरातल्या तिच्या बहिणीला भेटवून आणायचा.

तेवढ्यात मग गौसवाड्याहून साडेदहाला येणारी बस आली. फरफर आवाज करीत आली. धुळीचे लाल लोट उडवत ती गावाकडेने फिरली आणि देवळासमोरच्या पटांगणात येऊन थांबली. इंजिनाच्या दमदार आवाजाने सगळे आसमंत भरून गेलं. बसमधून आणखी काही लोक उतरले आणि देवळाभोवतीच्या जमावात मिसळून गेले.

त्या बसल्या होत्या तिथे थोड्या वेळाने जानकी दोघा जणांना घेऊन आली. ते उंच आणि अंगाने भरलेले होते. केस बारीक कापलेले. पायांत जाड वहाणा आणि हातांत कातड्याच्या बॅगा.

''हमारे दोस्त लोक आये है,'' जानकी रोहिणीकडे डोळे मिचकावून बघत म्हणाली.

''आईये शौकतभाई,'' रोहिणी हसून म्हणाली, ''आज बहोत दिनके बाद आपसे मिलनेका मौका मिला.''

''क्या करते बहेनजी, यहाँकी डीइटी मिलतीही नही.'' तो जवळ येऊन म्हणाला. मग आईला नमस्कार करून त्याने विचारले, ''माँजी कब आयी?''

''तुम्हें तो सब मालूमात होगी शौकतभाई. फिर क्यूं पूछते हो?''

त्यावर ते दोघे जण न बोलता नुसते हसले.

''यादवजी, तुम्हारी बहेन कैसी है अब?''

''आपकी दुवा है बहेनजी. आपने वो बंबईवाले डागदर का पता दिलवाया इसलिये बहूत सुविधा रही. अब अच्छी है.''

''चलो, अच्छा हुआ. उसकी जान बच गयी.'' रोहिणी भोवतालचे कागद आवरत म्हणाली.''

''आज किस चीजकी तैयारी है?'' शौकतने विचारले.

''पहले तो छोटे पहाडपर जाना है. दर्शनं के लिये. बादमें खाना खायेंगे. फिर मीटिंग होगी. बाहरगाँवके लोग आनेवाले है. शामतक वोही चलेगी. शामको माँ वापस जा रही है.''

ते दोघे काही वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा करत राहिले. मग शौकत जानकीला म्हणाला, ''जानकी बहेन, चाय तो आप दोगी नही. थोडासा जलपान तो करवाईये.''

ती निघून गेल्यावर आजूबाजूचा कानोसा घेत तो म्हणाला,

''एक खबर है. ध्यानमें रखियेगा. एस.आर.पी. की और एक कंपनी आ रही है. पडोस के गाँवमे मुक्काम रहेगा. हो सके तो परसों का कार्यक्रम दूसरे गाँव लेना.''

रोहिणी क्षणभर गंभीर झाली. मग दुसऱ्या क्षणी नेहमीच्या आवाजात म्हणाली, ''शुक्रिया, शौकतभाई. अच्छा हुआ आपने बताया.''

''बस्स! और कुछ नही. हम चलते है.











आप पहाडपर जाकर आईयेगा. बादमें आपकी बातें सुनेंगे.''

ते गेल्यावर आईने विचारले, ''कोण ग होते ते? मेले गुंडांसारखे दिसत होते.''

''अगं, गुंड नाहीत. पोलीस होते ते. साध्या कपड्यांतले. एल. आय.बी. वाले म्हणतात. त्यांना.''

''म्हणजे तुझ्यामागं आता पोलीस-पहाराही आहे की काय?''

''पहारा नाही ग! माहिती जम्वत असतात ते. माणसं बिचारी फार चांगली आहेत. जमेल तेवढी मदतच करत असतात.''

आईने त्यावर पुढे काही विचारले नाही. रोहिणीच्या मनात आले. एस.आर.पी.ची गोष्ट तिला कळली नसेल तरं बर आहे. नाहीतर ती उगाचच काळजी करत राहील. आपलं आयुष्य धावपळीचं आणि कष्टाचं आहे हे तिला माहिती आहे; पण त्यातले धोके अजून पूर्णपणं तिला कळलेले नाहीत. अजून एक कंपनी येणार म्हणाला शौकत. सरकार तयारी करतंय तर! त्यात आश्चर्य वाटण्यासारखं काही नाही म्हणा. तशा बातम्या आधीपासून येत आहेत. ह्या शौकतनंच सांगितलंय, प्रत्यक्ष आंदोलनाच्या अगोदर आठदहा दिवस तुम्हाला अटक करून कुठंतरी लांब नेऊन ठेवतील म्हणून. तसं ते करतील यात शंका नाही. पण आता ह्या गोष्टींनी काही फरक पडणार नाही. लोक फार पुढं आले आहेत आता.

मग आईला घेऊन ती पारावरून उतरली आणि समोर देवळापाशी आली. देवीचे देऊळ लहानसेच होते आणि खूप जुने. पण भिंती चुन्याने रंगवलेल्या होत्या. कळसालाही रंग दिलेला. सगळे आवार झाडून स्वच्छ केलेले आणि आता लोकांच्या कलकलाटाने भरून गेलेले.

त्या जवळ आलेल्या पाहून मणिराम म्हणाला,

''माँजी, आपके लिये डोली बनवाते है. पहाडीपर जाना है ना!''

''वेडा की खुळा तू?'' आई म्हणाली, ''पालखी देवीला करतात. आणि मला काय धाड भरली आहे? अगदी टाकोटाक चालत जाईन मी.''

''आई, खरंच जमेल का तुला? टेकडी लहान वाटली तरी उंच आहे. गुडघे दुखतात तुझे आधीच.''

''काही होत नाही ग! आणि गुडघे दुखले तर दुखोत बापडे. दोन दिवस शेकून घेईन लक्ष्मीबाईकडून. चला तुम्ही. तुमच्या आधी मी पोहोतचे की नाही ते बघा.''

मग तिला कोणी आग्रह केला नाही. सगळी तयारी झाल्यावर पुजाऱ्याने इशारा केला आणि मग एकदम ढोल-ताशांचा तडतडात सुरू झाला. झांजा वाजू लागल्या. वाद्यकऱ्यांपैकी एकाने गाल फुंकून पिपाणीचा तीव्र सूर काढला. मग देवीचा मुखवटा आणून पालखीत ठेवला गेला. चारसहा जण पालखीला भिडले. ते आता पालखी उचलणार एवढ्यात मणिरामने थांबायचा इशारा केला.

''बोलो.'' तो हात उंचावून म्हणाला, ''न कोई बांध बनेगा...''

''न कोई गाँव उठेगा.'' लोक एका सुरात गरजले.

आई पालखीमागोमाग टेकडी चढू

लागली. सोबत गावातल्या बायका होत्या. चार दिवसांतच बहुतेक जणी तिच्या माहितीच्या झाल्या होत्या. आणि काही जणींशी तर तिचे चांगलेच मेतकूट जमले होते. तिच्या वयाच्या काही बायकाही घाट चढत होत्या आणि म्हणून सावकाश गुडघ्यांवर हात ठेवत ती एकेक पाऊल टाकत होती.

रोहिणी सगळ्यांत शेवटी चालली होती. भराभर पावले टाकत पत्रकार तरुण मागून आला. इतर बायकांसमवेत घाटी चढत असलेल्या आईचा त्याने पाठमोरा फोटो घेतला. मग केसांच्या झिपऱ्या मागे सारत रोहिणीकडे बघून हसला.

''इतर कुणापेक्षा तुमच्या आईचेच जास्त फोटो घेतले मी.'' तो म्हणाला.

''त्या सगळ्या कॉपीज मला पाठवायला विसरू नका. माझ्याजवळ तिचा ह्या वयातला एकही फोटो नाही.''

''जरूर, जरूर.'' तो म्हणाला. ''कसं काय सांगता येत नाही पण तुमच्या आईची आणि माझी चांगली मैत्री जुळली. आता आमच्या वयांत एवढा फरक. व्यवसाय वेगवेगळे. पण काही नाही. तुमची आई अगदी ग्रेट बाई आहे.''

रोहिणी हसली. तिला माहीत होते, आपल्या आईजवळ कुणाच्याही पोटात शिरण्याची कला आहे; आणि तिची माणसांशीच काय, पण कुत्र्या-मांजरांशाही जवळीक होऊ शकते. दोन दिवसांपूर्वी हा तरुण माणूस गावात आला तेव्हा रोहिणीने खरे तर त्याला झटकूनच टाकले होते. त्याचा अवतार हिप्पीसारखा होता म्हणूनच केवळ नाही, तर चमकदार चित्रांच्या इंग्रजी मासिकांचा तिला तिटकारा होता म्हणूनही. त्याला तिच्यासोबत दोन दिवस घालवायचे होते आणि एक विशेष लेख लिहायचा होता. तो आता गावात बॅग घेऊनच आला म्हणून तिने त्याला हाकलून दिले नव्हते. पण सुरवातीला ती त्याच्याशी एक शब्दही बोलली नव्हती. बोलता बोलता तो म्हणाला होता, ''मलासुद्धा अशा कामासाठी एकदोन वर्षं द्यायची फार इच्छा होती.''

तेव्हा फटकाऱ्याने तिने म्हटले होते, ''इथं आल्यावर सगळे असंच म्हणतात हो; पण मुंबईला गेले परत की सगळं विसरून जातात. तुम्हां लोकांना चविष्ट बातम्या लागतात नेहमी; अमक्या नटीनं कुठं लफडं केलं — तमका मंत्री कुठं सापडला — क्रिकेटवाल्यांनी दारू कशी प्यायली. बस्स, दुसरं काय?''

त्यावर त्याचा चेहरा एकदम पडला होता.

''प्रत्येकाच्या अडचणी असतात.'' तो फक्त एवढेच म्हणाला.

''ते नुसतं सांगायला हो. मुळात इच्छाच नसते मुळी. सगळं वरवरचं, दिखाऊ. आम्हांला असल्या प्रसिद्धीची काही गरज नाही.''

आई तिथे जवळच होती. तेव्हा ती काही बोलली नाही, पण रात्री त्या दोघी अंथरुणावर पडल्या तेव्हा ती म्हणाली,

''बेबे, तू त्या पत्रकाराला फटकारून बोललीस ते काही फार शहाणपणाचं नव्हतं बरं का.''

''का, काय झालं?''

''दुपारी बराच वेळ माझ्याबरोबर होता तो. अवतार कसाही असू दे त्याचा, पण माणूस अगदी नेक आहे बघ. 'माझी अडचण आहे' असं तो म्हणाल्यावर तू हसलीस. पण खरोखरीच मोठी अडचण आहे. एकच मुलगा आहे त्याला, पण तो आहे डोक्यानं कमी. सात

वर्षांचा आहे पण वर्षाच्या मुलाइतकीही समज नाही त्याला. नुसता हाडामांसाचा गोळा आहे म्हणे. सारखी लाळ गळत असते तोंडातून. बायको शाळेत शिक्षिका आहे. 'फार काही करायची इच्छा होती' म्हणाला. पण आता त्या पोराला सांभाळणं हाच एक कलमी कार्यक्रम झाला आहे त्याचा.''

''कशानं झालं असं?''

''बाळंतपणात काहीतरी चुकीचं औषध दिलं गेलं म्हणे. नाव सांगितलं त्यानं औषधाचं. म्हणाला, 'त्या औषधाशी मी नंतर लढाईच सुरू केली. पेपरांतून सारखे लेख लिहिले. जागोजागी भाषणं केली. कंपनीवर खटला भरला. अगदी एकांडी लढाई. शेवटी औषधं बंद केलं कंपनीनं.' असं असतं बये! दिसतं तसं नसतं, बरं का!''

मग रोहिणीने पूर्वी कोणाला दिली नव्हती अशी सविस्तर मुलाखत त्याला दिली.

आता चालता चालता तो म्हणाला, ''राग येणार नसेल तर एक गोष्ट सांगू का?''

''सांगा ना.''

''तुम्ही तुमच्या लढ्याची सगळी पार्श्वभूमी मला समजावून सांगितलीत. मोठी धरणं का नकोत ते सविस्तर सांगितलंत. आकडेवारी दिलीत. पण तुमच्या सगळ्या बोलण्यानंतरही मला जे पटलं नाही ते तुमच्या आईच्या एका वाक्यानं पटलं.''

''काय म्हणाली ती?''

''मी त्यांना विचारलं, की 'तुमचा ह्या धरणाला विरोध का आहे?' तर म्हणाल्या, 'काही जणांच्या सुखासाठी बाकीच्यांनी मरायचं हा अधर्म आहे.' बस्स, एका वाक्यात पटलं आपल्याला.''

रोहिणीने मान डोलावली. पत्रकार आला तसाच घाईघाईने पुढे निघून गेला. स्वतःच्या मनाशी विचार करताना तिला वाटले: आईला अशा बाबतीत कधी संदेह पडलेला नाही. योग्य काय आणि अयोग्य काय, चांगलं काय आणि वाईट काय ह्यांबाबतची तिची जाण अगदी काचेसारखी लख्ख आहे. अरुणशी पटत नाहीसं झाल्यावर आणि त्याचा आपल्याला त्रास होतो आहे हे लक्षात आल्यावरही आपण वेगळे होण्याचा निर्णय चट्कन घेत नव्हतो. तेव्हा तिनंच आपल्याला सुनावलं होतं, ''हे बघ बेबे, तो आता अप्रामाणिक झाला आहे. आता त्याच्याबरोबर राहू नकोस. तुझं अकल्याण होईल.'' त्यावेळी तिनं जसा धीर दिला तसा कुणीच दिला नाही. नाना नव्हते त्या वेळी. पण असते तरी त्यांचा काही उपयोग झाला नसता. दिवसभर बुद्धिबळं खेळण्यात वेळ घालवत. पण असल्या परिस्थितीत काय करावं हे त्यांना कधीच कळलं नसतं. आणि नंतर ह्या कामात पडायचं ठरवलं तेव्हाही तिनं असंच सांगितलं, ''तुला श्रेयस्कर वाटतंय ना हे? मग तेच कर. दुसरं काही करू नकोस तू.''

आईला त्या वेळी हा प्रश्न काय, धरण बांधणं चुकीचं कसं हे काही समजावून सांगावं लागलं नाही. तिला ते चटकन उमजलं. एरवी मोठमोठ्या लोकांनाही समजत नाही ते. त्यामुळं आपण करतोय तो वेडेपणा वाटतो सगळ्यांना. बाकीच्यांना ठीक आहे पण जवळच्यांनासुद्धा. नलिनी कॉलेजमध्ये समाजशास्त्र शिकवते पण तिला अजूनही पटत नाही. आणि शिवाय आपण आपलं आयुष्य करपवून घेत आहोत असं वाटतं तिला.

त्यांच्या लेखी हा सगळा व्यर्थ खटाटोप आहे. आपलं आयुष्य उजाड करून टाकण्याचा.

मग तिला आठवले : अरुणचं जे पत्र आलंय त्यातही हेच लिहिलंय. घरी आलेलं सगळं टपाल आई सोबत घेऊन आली. बाकीची पत्रं तिनं सगळ्यांसमोर दिली पण अरुणचं पत्र मात्र एकटं असतानाच दिलं. म्हणाली, ''बये, आता नीट मन घट्ट करून वाच. अरुणचं पत्र आहे. पत्र कसलं, पत्रिकाच आहे. मी फोडलेलं नाही पाकीट पण वर लिहिलं आहे ते वाचलं. लग्न करतोय तो!''

मोठा लिफाफा होता. आतले गुळगुळीत, कडक कार्ड हाताला लागत होतं. वर पाकिटावर लिहिले होते : 'अरुण वेड्स सुप्रिया'. स्थळाचे नाव होते. तारीख आणि वेळ होती. लग्न अर्थातच उरकून गेले होते. पाकिटाकडे बघितल्यावर खरं तर उघडून बघायची गरज नव्हती. पण आई बाजूला झाल्यावर तिने ते उघडले होते. पत्रिका नेहमीसारखी होती. वर गणपतीचे चित्र. पांढऱ्या स्वच्छ कागदावर लाल शाईत इंग्रजी मजकूर. सोनेरी कडा. सोबत एक छोटीशी, दोन ओळींची चिठ्ठी : 'रोहिणी, सोबत पत्रिका पाठवत आहे. तुला वाईट वाटेल पण माझा नाइलाज आहे. वठलेल्या झाडासारखं आयुष्य घालवण्यात मला रस नाही. — 'अरुण'.

ती चिठ्ठी वाचून रोहिणीला हसू आले होते. पत्रिकेचे आश्चर्य वाटले नव्हते, कारण कधी तरी तो हे करणार हे अपेक्षितच होते. किंबहुना त्यानं फारच वेळ घेतला. वेगळे झाल्यापासून दोनचार महिन्यांतच तो दुसरं लग्न करील असं वाटलं होतं. पण चिठ्ठीतली वाक्यं विलक्षणच होती. आपल्याला वाईट वाटेल असं त्यानं जणू गृहीतच धरलं होतं. का ती एक सूचना होती? लीडिंग सजेशन? आपल्याला मुद्दाम वाईट वाटावं म्हणून केलेली? 'वठलेल्या झाडासारखं आयुष्य घालवण्यात मला रस नाही.' ते वाक्य आठवून तिला परत हसू आले.

ती जसजशी डोंगर चढू लागली तसतशी भोवतालची झाडी दाट होऊ लागली. रस्त्याच्या मधोमध गाडीवाटेची चकारी पडली होती आणि तेवढी सोडली तर बाकी सगळी जमीन हरळीच्या पुंजक्यांनी भरून गेलेली. काही वेळा दोन्ही बाजूंची झुडपे इतकी वाटेवर येत की त्यांना वारूनच पुढे जावे लागे. जिथे सावली होती तिथल्या गवतावरचे दव अजूनही ताजे होते आणि मातीचा ओलसर हिरवा वास येत होता. लोक पालखीच्या नादात झरझर पुढे निघून गेले होते आणि ढोल-झांजांचा आवाज पार दूरवरून येत होता.

आपल्या खांद्यावरच्या पिशवीतले अरुणचे ते पत्र तिने पुन्हा बाहेर काढले. क्षणभर पत्रिकेवरून आणि चिठ्ठीवरून नजर फिरवली आणि ते पुन्हा आत ठेवून दिले. तिला वाटले, त्याच्या कल्पनेप्रमाणं आपल्याला वाईट काही वाटलं नाही. बाजूला व्हायचं ठरवलं त्याच क्षणी त्या संबंधांबाबत एक प्रकारची उदासीनता आली. मग वाईट वाटायचं काय कारण? पण तसं लिहिणं हे अरुणच्या स्वभावाला धरूनच आहे. नेहमी असंच काहीतरी तिरकस, खोचक बोलणार, दुसऱ्याला लागेल असं. एरवी चेहरा अगदी हसतमुख. वागायला दिलखुलास. चार जणांबरोबर कुठं गेला तर दुसऱ्या कुणाला खिशातून पाकीट बाहेर काढू देणार नाही. पण ते सगळं वरवरचं. बाहेरच्या लोकांसाठी. त्याचा

आतला चेहरा कसा आहे ते जवळच्याच लोकांना कळणार. तरी त्याची बहीण लग्नाच्या वेळी आपल्याला म्हणाली होती, ''रोहिणी तू माझ्या भावाला पुरतं ओळखलंयस ना? तुला वाटतो तसा नाही आहे तो. बाकीच्यांना समजत नसेल पण मी लहानपणापासून पाहतेय ना!''

पण आपण त्याच्यावर प्रेम करून लग्न केलं. प्रेमानं आंधळे नव्हतो झालो आपण. त्याचे गुणदोष समजत होते. पण मनापासून प्रेम होतं त्याच्यावर. तसा तो गुणी होता. स्वतःचा तो लहान कारखाना सांभाळायची कुवत होतीच त्याच्यात. हार्मोनियम सुरेख वाजवी. लाकूड कोरून तऱ्हेतऱ्हेच्या वस्तू बनवी. आवश्यक तेवढा विचारानंही मोकळा होताच. तसं बघायला गेलं तर वाईट काहीच नव्हतं त्याच्यात. आईची बुद्धी इतकी काटेकोर पण तिलाही तेव्हा त्याच्यात काही वावगं आढळलं नाही.

पण मग कुठं खटकत गेलं? तिच्या मनानं पूर्वी हजार वेळा विचारलेला प्रश्नच पुन्हा विचारला. आणि तिच्या डोळ्यांसमोर तो तीनचार वर्षांचा काळ झरझरत निगून गेला. निरनिराळ्या घटना घडल्या. निरनिराळे प्रसंग. लहानमोठे. कधी क्षुल्लक. कधी महत्त्वाचे. थोडीशी गैरसमजूत. थोडासा संशय स्वभावताला काटेकोरपणा. बराचसा अट्टाहास आणि बराचसा विसंवादसुद्धा. सुरवातीची दोन वर्षं ठीक होती म्हणा. कुरबुरी होत्या पण आटोक्यातल्या होत्या. पण नंतर मात्र सगळंच बिनसू लागलं.

रोहिणीला वाटले : बाकी सगळं आपण सहन करून घेतलं असतं. त्याचं उच्छृंखल वागणं. कारखान्याच्या कामातलं खोटनाटं. आपण करत असलेल्या कामाबद्दलची अढी. त्यातून येणारा संशयीपणा. कसंही करून पैसा मिळवायचा, मोठं व्हायचं अशी वृत्ती. त्यातून येणारी थोडीशी विधिनिषेधांबद्दलची तुच्छता. हे सगळं आपण चालवून घेतलं असतं. पण नंतर तो अप्रामाणिक झाला आणि तो अप्रामाणिकपणा आपल्याला सहन झाला नाही. पैशाचे व्यवहार तो सांगत नव्हताच. पण मग इतर स्त्रियांशीसुद्धा संबंध येऊ लागले त्याचे. आणि दिलेला शब्द पाळेनासा झाला तो.

ते सगळे आठवून रोहिणीने एक शुष्क सुस्कारा सोडला. तिला माहीत होते, की वेगळे झाल्यापासून आणि त्याच्या आधीही असे लक्षावधी सुस्कारे सोडले आहेत आपण. प्रत्येक वेळी विचार करकरून डोकं भणाणून जातं. प्रत्येक वेळी तळ सापडावा म्हणून खोल खोल बुडी मारतो आपण. पण तरीही हातात निश्चित असं काही लागत नाही. कळतं ते एवढंच की तो आपल्याला साजेसा नव्हता. आपल्याला पुरा पडला नाही तो. सगळे गुण जमेस धरूनही लक्षात एवढंच येतं, की मुळात तो एक सामान्य वकुबाचाच माणूस होता. मीडिऑकर. आणि त्याचे सगळे दोष त्याच्या त्या अपुरेपणातून जन्माला आले. आणि नंतर त्यानं आपला केलेला छळवाद. तोसुद्धा. जागेवरून केलेलं भांडण. आईला दिलेली उर्मट उत्तरं. त्या वकिलामार्फत पाठवलेल्या नोटिसा. सगळं सगळं त्याच्या त्या सामान्यपणातून आलं. त्याच्याशी लग्न केलं ही एक नमुनेदार चूक होती आपली. नलिनी म्हणते तसं : 'ए क्लासिक एक्झांपल ऑफ बॅड चॉईस.'

रोहिणीला त्या साऱ्या आठवणी नकोशा झाल्या. तिला वाटले : अरुणच्या त्या चिठ्ठीचा उद्देश सफल होतो आहे की काय? आपल्याला वाईट जरी वाटलं नाही तरी त्या सगळ्या काटेरी

आठवणी आल्याच ना बोचकारत? त्याच्यासोबत आयुष्यातली तीन चार वर्षं वाया गेली आपली. नाहीतर आपण त्याच वेळी ह्या लढ्यात उतरलो असतो. लोक आता विचारतातच, की ज्या वेळी धरणाचं बांधकाम फारसं झालं नव्हतं त्या वेळी तुम्ही का नाही पुढं झालात? तेव्हा विरोध झाला असता तर हे कुठलेच प्रश्न निर्माण झाले नसते. एवढा पैसाही वाया गेला नसता आणि सरकारही हट्टाला पेटलं नसतं.

रोहिणीला त्या नेहमी होणाऱ्या वादविवादांचे हसू आले. एरवी ती असल्या प्रश्नांना अगदी चपखलपणे उत्तर देई. पण आता तिला वाटले : शेवटी हे सगळे जर - तरचे प्रश्न आहेत आणि त्यांना उत्तरं असू शकत नाहीत. आपल्याला त्या वेळी तरी काय स्वप्न पडलं होतं, की अरुणबरोबरचा आपला संसार टिकणार नाही म्हणून? ती पहिली दोन वर्षं तर आपण आपल्याला अगदी सुखी समजत होतो. लगेच मुलाबाळांचा ताप डोक्याला लावून घ्यायचा नाही असं ठरवलं होतं आणि दोघं मिळून सुखाचा मन:पुत अनुभव घेत होतो. तेव्हा जर कोणी आपल्याला सांगितलं असतं, की असा असा प्रश्न आहे आणि असा असा लोकांवर अन्याय होतो आहे तर आपण काही त्यासाठी घरदार सोडून गेलो नसतो. अरुण जर तसा वागला नसता तर सुखानं घरसंसार करत राहिलो असतो आपण.

अरुण जर तसा वागला नसता तर! तिचे मन परत त्या शब्दांपाशी अडले. तिला वाटले, आपण फार सोईस्करीत्या प्रश्न सोडवतोय का? आपला काहीच हिस्सा नव्हता त्याच्याच-त्याची वागणूक अशी बदलून जाण्यात? तो सामान्य होता कदाचित पण जसा होता तसा होता. आणि बहुतेक सगळे लोक तसेच असतात. आपण चेपत गेलो का त्याला? त्याच्या सामान्यपणाची आठवण करून देत? त्याला समाजकार्याविषयी काही कळत नव्हतं म्हणून? राजकारणात त्याला रस नव्हता म्हणून? इंग्रजीच्या ढोबळ चुका तो करायचा म्हणून? की वादविवादात आपण त्याला नेहमीच भारी ठरायचो म्हणून? त्याच्या वागण्यावर निर्बंध घालता येत नव्हते म्हणून त्याचा मानभंग करत गेलो का आपण? कधी नकळत. कधी मुद्दाम. आणि मग आपल्यावर उलटण्याखेरीच दुसरा मार्गच उरला नाही त्याला?

रोहिणीचे मन सैरभैर होऊन गेले. ती एकटीच वेड्यासारखी डोंगराच्या वाटेने चालत होती. लोक कुठल्या कुठे निघून गेले होते आणि तिला एकटीला राहायला आवडते म्हणून कोणी मागे राहिले नव्हते. तिला वाटले : आपलं चुकलं. आपण लोकांसमवेत राहायला पाहिजे होतं म्हणजे एरवीसारखं त्यांच्या बोलण्यात आणि सहवासात आपलं मन गुंतून राहिलं असतं आणि ह्या सगळ्या आठवणी घोंगावत अंगावर आल्या नसत्या. आपण एकटे असलो की वावटळ उठते अशी. हाताला काहीच लागत नाही. डोकं मात्र हलूक होऊन जातं.

मग तो ढोल-ताशांचा कडकडाट हवाहवासा वाटून ती झपाझपा पावले टाकू लागली.

ती मध्यावर आली तेव्हा पालखी अगोदरच येऊन पोहोचली होती आणि तिला आश्चर्याचा धक्का देत आई देवळाच्या पडक्या कट्ट्यावर मोठ्याने श्वास घेत बसली होती. तिच्या कपाळावर घामाचे थेंब होते पण चेहरा फुललेला होता.

"बघ, आले की नाही!" ती उल्हासाने

म्हणाली, "तुला उगाचच काळजी वाटत होती."

देऊळ लहानसेच होते. पुष्कळ जुने आणि दगडी. बरीचशी पडझड झालेली पण ओवरीवरचे खांब मात्र अजून तग धरून उभे असलेले. कळसाची डागडुजी नव्याने केलेली. गाभारा लहानसाच होता. काहीसा काळोखी. पण निरांजने पेटलेली होती आणि धूप-उदबत्त्यांचा उबदार, सुवासिक वास येत होता. देवीचा मुखवटा पितळी होता. भोवताली सगळ्या बाजूंनी हिरव्या खणांनी लपेटलेला. डोळे उग्र. बाहेर आलेले. त्यांच्या भोवती काजळाच्या उठावदार रेषा. कपाळावर हळदकुंकवाचा ठसठसीश मळवट. ओठावर उग्र, अस्फुट, गंभीर हसू.

"अगदी माझ्या माहेरच्या यमाईसारखी आहे हो!" आई देवीकडे डोळे भरून पाहत म्हणाली, "बये, कशी ग इतक्या लांब येऊन बसलीस? माहेराला कुणी नाही म्हणून इथं बोलावून दर्शन दिलंस? धन्य आहे बये तुझी. केवढी कृपा केलीस."

मग तिने हळदकुंकू वाहिले. कानांच्या पाळ्या ओढल्या. हलकेच दोन्हीकडे तोंडात मारून घेतले आणि मग काही वेळ देवीच्या पायापाशी डोके टेकून ती स्तब्ध बसून राहिली.

रोहिणीने पाहिले, की देवी खरोखरच आजोळच्या देवीसारखी होती. तिथं अर्थात असं देऊळ नव्हतं. एका मोठ्या पिंपळाच्या खोडातच जुजबी छप्पर उभारून आडोसा केलेला होता. लहानपणी तिच्या कठोर चेहऱ्याची भीती वाटायची. पण तिच्या दर्शनाला जावं अशी एक अनावर ओढही. मग आई हळदकुंकू वाहून तिची पूजा करत असताना आपण तिच्या पदराला धरून भीत भीत पाहत राहायचो. देवांच्या तसबिरी तर आपण कितीतरी पाहतो आणि देवळातल्या मूर्तीसुद्धा. आपले हात जोडले जात नाहीत कधी. पण देवीच्या ह्या चेहऱ्यात मोहवणारं काय आहे ते आपल्याला समजत नाही.

मग काही न बोलता त्या दोघी जणी बाहेर आल्या आणि सावलीत येऊन बसल्या. आता लोकांचे सोपस्कार सुरू झाले. एकामागून एक बायका आणि पुरुष दर्शनाला जाऊ लागले. येताजाता त्यांच्या कपाळांवर हळद-कुंकवाची बोटे टेकवत. बघता बघता तो लहानसा डोंगरमाथा वर्दळीने गजबजून गेला.

"आता हे लौकर आटपतील तर बरं." काही वेळाने रोहिणी म्हणाली.

"का ग बाई? चालू देत की सावकाश." आई म्हणाली. "वर्षातून एक दिवस पालखी आणायची. लागला वेळ तर काय झालं?"

"मला भूक लागली आहे ग," ती म्हणाली, "तुला तर माहिती आहे, सकाळी नाश्ता नाही केला तर मला चैन पडत नाही. इथं खेडेगावात कसं जमणार ते? हे लोक सकाळी जेवणच करतात, न्याहारी म्हणून. तेव्हा मला जमत नाही. चहा होतो दोनचारदा पण त्यानं भूक कशी थांबणार?"

"तुला मी किती वेळा सांगितलं बेबे, आपल्या पिशवीत काहीतरी ठेवत जा म्हणून. खारीक, खोबरं, शेंगदाणे नाहीतर चुरमुरे, फुटाणे असं काहीतरी ठेवावं जवळ. भूक लागली तर मूठभर तोंडात टाकावं. तेवढाच पोटाला आधार. तुला माहीत नाही का? आपला सांभाळ आपणच करायचा असतो म्हणून? दुसरं कुणी करत नाही आपली काळजी."

रोहिणी त्यावर मूक राहिली. तिला माहीत

होते ते. तसंच तर चाललं होतं आयुष्य. सभोवताली लोकांची गजबज असली तरी एकटीनंच. आणि आत्ताच नाही, पूर्वीही तसंच होतं. शाळेत असताना मैत्रिणी खूप होत्या आपल्याला आणि सगळ्यांच्या लाडक्या होतो आपण; पण तरीही एकटं असताना जास्त आनंद व्हायचा आपल्याला. कुठंतरी आतल्या आत बरं वाटत राहायचं. आणि आता तर काय? एकटेपणाच आहे सोबतीला. आईशिवाय आपल्याला दुसरं कुणी नाही. पण ती तिकडं लांब आणि आपण इकडं. तीसुद्धा एकटीच असते पण स्वत:चा सांभाळ स्वत:च कसा करायचा हे समजतं तिला.

तिच्या सुदैवाने पालखी लवकर हलली. वैठक जेवण झाल्यावर होती. पण खाली आल्यावर लगेच जेवण तयार नव्हते. चुली पेटलेल्या होत्या पण पालखीबरोबरची माणसे परत आली तेव्हाच तयारीला वेग आला. आपले हक्काचे ठिकाण असल्यासारख्या त्या दोघी परत पारावर येऊन बसल्या.

आईने गुडघे पोटाशी घेतले आणि हातांनी पोटऱ्या चेपल्या.

''लागले ना पाय दुखायला?'' रोहिणी म्हणाली. ''तरी मी सांगत होते तुला.''

''अग, तेवढे दुखणारच. वय माहिती नाही का तुला माझं? साठी उलटून गेली. आकडेवारी सांग बघू. तुझ्या या देशात सरासरी किती वर्षं जगतो माणूस? पन्नास पंचावन्नच ना? मग? ही वरची सगळी वर्षं भेट म्हणूनच समजायची.''

त्यावर रोहिणी काही बोलली नाही. तिला वाटले: आपण ह्या गोष्टीचा कधी विचार केला नाही. लहानपणापासून आई समोर आहे आणि तिचं अस्तित्व आपण गृहीत धरलेलं आहे. पण दिवसेंदिवस ती म्हातारी होत चालली आहे आणि कधी ना कधी ती ह्या जगात असणार नाही हे जणू आपल्याला समजत नाही. दिवस कसे उलटतात ते खरं तर आपण पाहत नाही. पाय दुखतात असं ती म्हणते, पण ते पुष्कळ दिवसांपासून दुखत असतील. आणि ह्याशिवाय इतरही काही व्याधी असतील तिला. ती सांगत नाही सगळंच काही. नाना गेल्यापासून स्वत:च्या जगण्याची एक पद्धत ठरवून घेतली आहे तिनं. नलिनीकडं तरी ती कुठं नेहमी जाते? आपली एकटीच राहत असते. त्याच आपल्या जुन्या घरात. आणि आपलं जगणंही तिच्यासारखंच चाललं आहे. कारणं निरनिराळी असतील आणि दिसायलाही ते वेगळं दिसत असेल, पण शेवटी तिचा आणि आपला पिंड एकच.

''मी इतक्या नद्या पाहिल्या बेबे,'' आई तिची तंद्री मोडत म्हणाली, ''पण ह्या नदीसारखी वेडी नदी कुठं पाहिली नाही. अजून समुद्र कितीतरी लांब आहे पण तरी ही नुसती सुसाट धावत निघाली आहे. एखादी हुमदांडगी पोर असावी तशी. केवढाले दगड हे आणि केवढा उतार; पण ही निघाली वेड्यासारखी. नाहीतर आपली कृष्णाबाई बघ. डोंगरावरनं खाली उतरली की लागली रेंगाळायला. जायचंच आहे समुद्राकडं, जाऊ सावकाश अशा थाटात. पण हिच्याकडं बघ. धरण काय बांधतायत ते खुळे? धरण बांधून घेणारी नदी आहे का ही?''

रोहिणी न बोलता काही वेळ आईकडे आणि काही वेळ नदीकडे पाहत राहिली. तिला माहीत होते: आपण काही उत्तर द्यायची आवश्यकता नाही. आईचा आता सूर जुळला आहे, सभोवतालच्या कोणत्याही वस्तूशी जुळतो तसा.



अनुक्रमणिका






मग ते आपल्या अंगणातलं पेरूचं झाड असो, 'काळी' मांजरी असो, नाहीतर सुया-बिब्बे घेऊन येणाऱ्या कंजारभाटीचं लहान मूल असो. तिला कोणाविषयी कधी प्रेमाचा उमाळा येईल सांगता येत नाही. ह्या नदीशी तर आपलंही नातं जुळलं आहे आणि आपली मैत्रीण समजतोच आपण तिला; पण तिला 'वेडी पोर' म्हणणं मात्र फक्त आईलाच जमेल.

"तुला ते महादेवाचं देऊळ दाखवायचं राहून गेलं." काही वेळाने रोहिणी म्हणाली. "फार लांब नाही आहे इथून. पण ह्या धावपळीत वेळच नाही मिळाला. आणि तुला राहा म्हणतेय तर तू राहत नाहीस."

"असू दे ग. पुढच्या वेळी बघू. सध्या इथूनच नमस्कार करते." आणि मग रोहिणी त्यावर काही बोलणार एवढ्यात ती पुढे म्हणाली, "तुला सांगू का वेबे, आताशा ना मला ही देवळं आणि तीर्थं पाहायचा मोह नाही राहिला. पुष्कळ देवळं पाहिली. अगदी पिंपळाखालच्या उघड्या मारुतीपासून सोन्यानं मढवलेल्या देवापर्यंत. चार चार तास रांगेत उभं राहून दर्शन घेतलं. पण आता नको वाटतं काही. खाली एकटंच कुठं बसायचं. म्हणून मघाशी पालखीबरोबर गेले. एरवी काय, 'देवोदेवी मीचि पाहे,' असंच भगवंतानं म्हटलंय. मग आपण कशाला करा लसलस?"

रोहिणी त्यावर हलकेच हसली आणि गुडघ्यांवर डोके टेकवून आईकडे पाहत राहिली.

काही वेळातच मणिराम जेवायला बोलवायला आला.

देवळाच्या आवारातच सावली पाहून पंगती मांडलेल्या होत्या. जाजमे दुमडून बैठका घातलेल्या. दोघेतिघे जण पुढे उभे राहून प्रत्येकाच्या हातात पळसाची मोठाली पाने देत होते. रोहिणी आईसोबत एका कडेला बसली. त्या आधी बाहेरून आलेले सगळे पाहुणे बसले आहेत का ते तिने पाहिले. सगळे बसल्यावर भराभर वाढणी सुरू झाली. ज्वारीच्या भाकऱ्या आणि मटकीची उसळ. जेवण सुरू होण्यापूर्वी मणिरामने मध्ये उभे राहून हात उभारला आणि उंच स्वरात तो पुकारला,

"बोऽऽलो, जबतक हमारी सांसा चलेगी..."

"बहती नदी बहती रहेगी." लोक त्याच्या पाठोपाठ गरजले.

"बरं वाटतं ग, हे खेडेगावातलं जेवण जेवताना." आई भाकरीचा तुकडा मोडत म्हणाली,

"तू दोन दिवसांकरता आली आहेस म्हणून तुला बरं वाटतंय." रोहिणी म्हणाली, "मला खरं सांगू का, रोज ही भाकरी खायचा अगदी कंटाळा येतो. आणि भाज्या तर काही नसतातच ग. तुरीचा डाळ, नाहीतर मटकी, नाहीतर हुलगे. कुणी बाजाराला जाऊन आलं असलं तर बटाटे. कंटाळा येतो अगदी. मला तुझ्या हातचे ऊन ऊन फुलके आणि फ्लॉवरची भाजी खावीशी वाटते नेहमी. आणि सकाळी थोडंसं लोणी लावून पाव. आणि जेलीची चॉकलेटं तर कित्येक दिवसांत खाल्ली नाही आहेत मी."

आई काही वेळ मूक राहिली. मग तोंडातला घास संपताच मान हलवत म्हणाली, "त्या सगळ्या तूप-लोण्याच्या सुखांपासून तू फार लांब आलीस बये. आता त्याचा विचार करून काय

उपयोग?''

रोहिणीला त्यावर काही बोलता आले नाही. तिला माहीत होतं, तसं झालं आहे खरं. ती सगळी सुखं आता लांब लांब राहिली. ते सकाळी उशिरा उठण्याचं सुख. दिवसभरात हव्या तितक्या वेळा कॉफी पिण्याचं. अंघोळपांघोळ न करता पुस्तक वाचत बसण्याचं. मैत्रिणींबरोबर यथेच्छ भेळपुरी खाण्याचं. आईकडून चोळून चोळून न्हाऊ घालून घेण्याचं. नवऱ्याबरोबर सिनेमाला जाण्याचं आणि लहान बाळाला कुशीत घेण्याचंसुद्धा. ती सगळी सुखं आता दूर गेली.

मग तिला आठवले. पण कधी कधी डोळे मिचकावत ती आपल्याजवळ येत असतात खरी. जंगल पाण्याखाली जाणार म्हणून हळव्या झालेल्या, फॅशनेबल लोकांचा मुंबईत क्लब होता आणि त्यांनी तिला व्याख्यानाला बोलावले. एरवी ती गेली नसती; पण त्या लोकांनी मोठी देणगी दिली आणि त्यातून डझनभर कार्यकर्त्यांचा सहा महिन्यांचा प्रवासखर्च भागणार होता. व्याख्यान एका आलिशान बंगल्यात झालं. उंची कपडे घालून आणि सेंट फवारून लोक आले होते. व्याख्यान संपताच त्या क्लबचा सेक्रेटरी जवळ आला. आपल्या बोलण्यानं अगदी प्रभावित झाला होता तो. आणि त्या क्षणी आपल्यासाठी काय करू आणि काय नको असं त्याला झालं होतं. संध्याकाळी जेवायला बरोबर येता का, म्हणून विचारलं त्यानं. उंच, देखणा, जाहिरातीत दाखवतात तसल्या पुरूषांसारखा होता तो. हंसासारखी शुभ्र, डौलदार परदेशी मोटार होती. बोलणं अगदी मृदू होतं आणि नजर आर्जवी. तो जवळ आला त्या वेळी त्याच्या भोवतालच्या सुगंधी दरवळानं डोकं काही क्षण धुंदावल्यासारखं झालं. सुख अगदी समीप होतं. पुरुषाच्या उष्ण, सुगंधित आणि दमदार सहवासाचं सुख. आपण फक्त पापणीची हालचाल करायची होती. दोघे कार्यकर्ते सोबत होते. पाऊल पुढं पडलं नाही.

त्यांचे जेवण झाल्यावर लगेच मीटिंगला सुरुवात झाली नाही. मणिरामला आणि इतरांना आवराआवरीला वेळ लागणार होता. त्या पुन्हा पिंपळाच्या पारावर येऊन बसल्या. आईने हात उशाशी घेऊन पारावरच अंग पसरले. रोहिणी बुंध्याला टेकून बसली. क्षणभर तिलाही आडवे व्हावेसे वाटले, पण निजताना आणि उठताना पाठीतून असह्य कळ येई. तिला वाटले, त्यापेक्षा नकोच ते.

''अरुणनं त्या पत्रात कमीजास्त तर काही लिहिलेलं नाही ना?'' आईने विचारले.

''छे! कमीजास्त काय लिहिणार आता!'' ती म्हणाली. ''बोटभर चिठ्ठी आहे आत; 'सोबत पत्रिका पाठवतोय. तुला वाईट वाटेल पण नाइलाज आहे.''

''मग ठीक आहे. मला वाटलं, आता पुन्हा आणखी काय लिहितोय! नंतर नंतर कसा वागला ते लक्षात आहे माझ्या. आता लग्न करतोय. करतोय तर कर बापडा. ही मुलगी कोण आहे कुणास ठाऊक. माहितीची आहे का तुझ्या?''

''नाही,'' रोहिणी म्हणाली. ''माहितीची कशी असणार?''

''हं, तेही खरंच,'' आई म्हणाली. मग काही वेळ थांबून तिने म्हटले, ''हा माणूस असा कसा बदलला हे काही समजत नाही बघ. खरं तर सुरवातीला तो तसा नव्हता ग. चांगला नेक बाण्याचा तरुण होता. आणि लहानसहान गोष्टींचीही चाड होती त्याला. गोदावरीबाईंचा मुलगा होता ना तुमच्या कारखान्यात कामाला, तो एकदा सांगत होता. कुणीतरी सरकारी

अधिकारी लाच मागत होता म्हणे. तर अरुणनं जवळजवळ त्याला उचलून बाहेर फेकायचंच बाकी ठेवलं होतं. कारखाना बंद पडायची भीती होती म्हणे. पण म्हणाला, 'गेट आउट म्हणजे गेट आउट.' आता सांग! आणि नंतर? गेल्या जन्मीचा वैरी असल्यासारखा वागला!"

रोहिणी त्यावर काही बोलली नाही. आईला हे कोडे उलगडत नाही हे तिला माहीत होते. आता इतके दिवस झाले तरी तिच्या मनात थोडासा किंतू शिल्लक आहे आणि आपल्या लेकीचं काहीतरी चुकलं असेल असं तिला वाटतं. पूर्वी दोनचार वेळा सगळं सविस्तर सांगितलं; तरीही तिच्या मनातली रुखरुख अजून गेलेली नाही.

"आता पुन्हा ते सर्व उगाळण्यात अर्थ नाही म्हणा." आई पुढे म्हणाली. "कारण बेबे, आयुष्य खडतर जाणार असा योगच आहे तुझ्या भविष्यात. पूर्वी ह्यांनी एका ज्योतिषाकडून करून घेतली होती तुझी पत्रिका. तो म्हणाला, 'मुलगी यशवंत होईल, पण आयुष्य अति कष्टांत जाईल. इतरांना सुख देईल पण स्वतः सुखी होणार नाही."

रोहिणी त्यावर स्वतःशीच संथपणे हसली. तिला वाटले, आईला सांगावं, आयुष्य कष्टांचं आहेच माझं; आणि मी सुखी आहे की नाही ते सांगता येणार नाही, पण एक प्रकारची शांतता आली आहे माझ्या मनात. पूर्वी जशी तडफड तडफड व्हायची तशी नाही होत आता. लोकांना वाटतं, की मी फार अट्टाहास करते. पण तसं काही नाही. पूर्वीपेक्षा सगळं सोपं झालं आहे आता.

तिला वाटले, आईला आठवत असेल का ती ताऱ्याची गोष्ट? शाळेत असताना मुलींची ट्रिप गेली होती. नदीकाठचं एक जुनं देऊळ होतं. भोवती गर्द झाडांची राई. सगळ्या मुली पुढं गेल्या होत्या. आपल्या कानातलं पडलं म्हणून आपण मागं राहून दगडी चौथऱ्यावर शोधत होतो. तेवढ्यात धोतर-पंचा नेसलेला, हातात तांब्या-भांडं घेतलेला एक उंचच उंच, ओल्या उघड्या अंगाचा ब्राह्मण ताड ताड पावलं टाकत आला. "काय शोधतेस?" त्यानं काहीशा कर्कश्श आवाजात विचारलं. "कानातलं," आपण बावरून जाऊन म्हणालो. "ते काय शोधतेस?" तो तसाच चिरक्या आवाजात हात उंचावून म्हणाला, "स्वतःचा तारा शोध, तारा" आणि मग जसा आला तसाच तो ताड ताड टांगा टाकत निघून गेला. घरी आल्यावर आईला सांगितलं तर ती म्हणाली, "बेबे, तुला दृष्टांत झाला." मग तिनं एक गोष्ट सांगितली: आकाशात आपल्याला तारे दिसतात पण न दिसणारेही असंख्य तारे असतात. प्रत्येक माणसाचा म्हणे एकेक तारा असतो. तो नेहमी त्याच्या डोक्यावर असतो आणि सूर्यापेक्षा तेजस्वी असतो. तो कधी दिसत नाही पण दिसला तर माणूस सुखी होतो. तो तारा ज्या मार्गानं जातो त्याच मार्गानं जायचं असतं आपण.

त्या वेळी आपल्याला त्यातलं काहीच समजलं नाही. पण कानातलं सापडलं नाही म्हणून तो प्रसंग मात्र लक्षात राहिला. नंतर मग आपण अरुणपासून वेगळे होऊन राहत होतो तेव्हाची गोष्ट. दुसरं काही करायला नव्हतं म्हणून त्या मूक-बधिरांच्या शाळेत जात होतो. पुढं काय करावं ते समजत नव्हतं. बहिरेपणासंबंधीचा सर्व्हे होता म्हणून या भागात आलो. गाव असंच नदीच्या काठावर होतं. असंच एका बाजूला दगडांनी बांधलेलं महादेवाचं जुनं, काळंशार मंदिर. लोक म्हणाले, "मंदिर पाण्याखाली बुडणार आहे. गावसुध्दा बुडणार आहे. मागची ही टेकडी आणि जंगलसुध्दा. आणि कोणी दाद घेत नाही

आमची.'' गरीब लोक होते. अगदी दीनवाणे झालेले. टळटळीत दुपार होती आणि मंदिराच्या काळ्या चटचटत्या फरशीवर उभं राहून त्यांचं बोलणं ऐकत होतो आपण. आणि मग त्या उघड्या मोकळ्या परिसरात, गरम, रखरखीत उन्हात आपल्याला त्या ब्राह्मणाच्या बोलण्याचा अर्थ समजला: आपल्याला 'तारा' दिसला आपला. आई म्हणाली होती तसला तारा. सूर्याहूनही तेजस्वी.. सदैव आपल्या डोक्यावर असणारा. आपला स्वत:चा तारा.

मग ह्या कामात स्वत:ला झोकून दिलं आपण. नलिनी म्हणाली, ''संसारातलं अपयश झाकायचं होतं तुला.'' मैत्रिणी म्हणाल्या, ''उगाच नको तो वाद उकरून काढलास.'' वयस्कर स्नेही म्हणाले, ''दगडावर डोकं आपटून घेते आहेस तू.'' कुणी काही, कुणी काही. पण आपल्याला तारा दिसला असेल हे त्या कुणालाही कळलं नाही. आपण ते समजावून सांगायचा खटाटोपही केला नाही. तो फक्त आपला वैयक्तिक अनुभव होता. स्वत:च्याच मनात जपून ठेवण्याचा. आणि मग कळायला लागल्यापासून मनात सारखी जी एक असोशी होती ती दूर झाली. आयुष्य कसं भरल्यासारखं झालं. सुफळ नसेल पण संपूर्ण.

तिला वाटले, अरुणसारख्यांना, नलिनीसारख्यांना ही गोष्ट समजणार नाही. आपल्या विचारशक्तीवर फार विश्वास असतो त्यांचा. आपण केल्यानं गोष्टी होतात असं वाटतं त्यांना. आपल्यालाही पूर्वी तसंच वाटायचं. पण त्या मंदिराच्या चटचटत्या पायऱ्यांवर स्वत:हून नाही निर्णय घेतला आपण. आपल्या हातून घेतला गेला. सर्व्हेचं काम करून परत गेलो आणि लगेच दोनचार दिवसांत बॅग घेऊन हजर झालो. त्या क्षणी ते सगळं कसं झालं हे खरं तर समजलंच नाही. ऐकलं होतं की माणसाच्या आयुष्यात असे क्षण येतात आणि त्यांना सामोरं जायचं असतं. तो क्षण कसा आला ते कळलं नाही आणि आपण त्याला सामोरं कसं गेलो तेही नाही.

त्या मनोरम आठवणीने तिला अगदी भरून आले, रोमांचित झाल्यासारखे वाटले आणि म्हणून मग मीटिंग सुरू झाली त्या वेळी तिचे मन त्या विषयावर एकाग्र होते. मणिरामने तिला आधी बोलण्याचा आग्रह केला. तेव्हा ती निक्षून ''नाही'' म्हणाली. ''मीटिंग तुम्हा लोकांची आहे, तुम्ही बोललं पाहिजे.'' आणि मग लोक बोलत असताना शांतपणे ऐकतच राहिली. तिच्या डोळ्यांसमोर सगळे संदर्भ व्यवस्थित मांडले जाऊ लागले. तिला कळत होते, की आंदोलन हळूहळू निर्णायक टप्प्याकडं चाललं आहे, सरकार तर हट्टाला पेटलेलंच आहे. सरकारची कठोर लोखंडी भिंत लाठ्या परजत समोर उभी राहील आणि त्यांच्यासमोर पायांत वहाणा नसलेली अर्धपोटी माणसं असतील. पण खरी लढाई निश्चयाची असेल. आता डावपेच करण्याचे, एकमेकांवर कुरघोडी करण्याचे दिवस संपलेले आहेत. आता कुणाचा निश्चय खंबीर त्याची परीक्षा आहे. आपण फार टोकाला जातो असं लोक म्हणतात पण त्यांना निश्चयाचं सामर्थ्य काय ते कळत नाही.

आणि म्हणून मग ती बोलायला ऊठली तेव्हा तिचा स्वर स्थिर होता. तिच्यासमोर दूरवर नदीचे पात्र होते आणि पलिकडच्या घाटीचा अस्पष्ट विस्तार होता. नदीच्या वाहत्या पाण्याकडे पाहताना तिच्या मुखातून शब्द झरत राहिले. संथ, लयदार, अस्खलित.

''इस सरकार की नियत को समझो,'' ती म्हणाली. ''इनकी कथनी और करनी में फर्क है. और गरिबों का कल्याण इन्होंने किया ऐसा इतिहास नही. अब सवाल ये है की हम कितने



अनुक्रमणिका







अटल रहते है. अपने गाँवपर. अपनी धरतीपर. चाहे सरकार की फौज आये, चाहे नदी का पानी !''

सगळे आसमंत चित्रासारखे स्तब्ध होते. आणि ऊन हळूहळू सरत गेले. कुठलाही सायास न करता शब्द तिच्या मुखावाटे येत गेले. लोक निश्चल बसून ऐकत होते आणि त्यांच्या नजरा तिच्या चेहऱ्यावर खिळलेल्या होत्या. ती त्या सगळ्या चित्राचा केंद्रबिंदू होती, पण कुठेतरी आतल्या आत स्वत:तच मग्न झालेली. तिच्या समोरचे ते लोक, नदीच्या पात्रातला खडकांचा पसारा, फेसाळते पाणी, त्यामागचे पिवळे-करडे माळरान, आभाळाचा निळा विस्तार ह्या सगळ्याचा तिला जणू विसर पडलेला. तिच्या शब्दांचा नादही तिला ऐकू येत नव्हता. नजर कुठेतरी दूर स्थिर झालेली. फक्त पक्ष्याचा डोळा दिसत असल्यासारखी.

मीटिंग संपली तेव्हा दुपार पार ओसरून गेली होती. आईची झोप केव्हाच पूर्ण झाली होती. ती मागे येऊन कधी बसली ते मीटिंग चालू असताना रोहिणीला कळलेच नव्हते. सगळ्या सूचना देऊन आणि पुढे काय करायचे ते ठरवून ती जेव्हा मोकळी झाली तेव्हा आई तिला म्हणाली,

''बये, ऐकत होते ग तुझं बोलणं. कुठं शिकलीस तू? शाळा-कॉलेजात असताना भाषणं करायचीस. पण आताचं तुझं बोलणं अगदी मनाला भिडत होतं. लोक तुझ्याबरोबर येतील यात काय नवल?''

रोहिणी संथपणे हसली. पण म्हणाली,''प्रश्न खूप गंभीर आहे ग. आणि बाहेरचं कुणी येऊन तो सुटणार नाही. ह्या लोकांनी जर आता पावलं उचलली नाहीत तर देशोधडीला लागतील ते.''

''खरं आहे.'' आई म्हणाली. ''बेबे तुला सांगते. चार दिवस होते ना मी इथं, फार बरं वाटलं मला. पूर्वी मी नावं ठेवली असतील कदाचित पण आता नाही वाटत तसं. तुझं संसाराचं लोढणं सुटलं ते एका दृष्टीनं बरंच झालं. नाहीतरी ते सगळं करून काय झालं असतं? जे आमचं झालं तेच. इथं निदान चार माणसं तरी सुखी होतील.''

ती असे म्हणाली तेव्हा रोहिणीला एकदम गदमदून आले. असे तिने आईच्या तोंडून पूर्वी कधी ऐकले नव्हते. आता लोक आजूबाजूला पांगले होते आणि झाडाखाली त्या दोघी पुन्हा एकट्या होत्या.

''पण तुला नात हवी होती.'' रोहिणी म्हणाली. ''ती इच्छा काही पुरी झाली नाही माझ्याकडून.''

''हो तेवढं बरीक राहिलं'' आई स्वच्छ हसून म्हणाली. ''नलिनीला दोन्ही मुलगेच झाले आणि तिच्याकडून माझी अपेक्षाही नव्हती. तुला एखादी मुलगी असती तर बरं झालं असतं. दुसरे काही नाही गं, पण आपली साखळी चालू राहते.''

रोहिणी मूक राहिली. पण आई बोलत असताना तिच्या लक्षात आले, की संध्याकाळ होत आहे आणि आईची जायची वेळ जवळ येत आहे. त्या गोष्टीची आठवण येताच ती एकदम कासावीस झाली.

''आई तू थांब ना.'' आईच्या दंडाला धरत ती म्हणाली. ''इथंच राहा माझ्याजवळ. तिकडं नाहीतरी एकटीच राहणार ना! आपण एखाद्या मध्यवर्ती ठिकाणी खोली घेऊन राहू. तुला काही माझ्याबरोबर हिंडायची वेळ येणार नाही.''

आईने मान हलवली. मग अंगभर पदर घेत ती म्हणाली,

''तेवढं मात्र सांगू नकोस हां बये! तुझा मार्ग

निराळा, माझा मार्ग निराळा. तुझ्याबरोबर मी राहिले तर तुला अडचण होईल. आणि जिथे चाळीस वर्षे राहिले ती जागा सोडणं मला जमणार नाही. तू तर येत असतेसच घरी, पण जमलं तर मी पण दोनचार दिवसांकरता येत जाईन. घड्याळ बघ. संध्याकाळची बस आहे म्हणालीस ना!''

बस यायला थोडासा अवकाश होता पण जानकीला घरात ठेवलेले सामान गोळा करून घ्यायला तेवढा वेळ हवा होताच. रोहिणीचे मन एकदम विरजल्यासारखे झाले. आईबरोबरचे चार दिवस अगदी सुखात गेले. थंडी बेताचीच होती म्हणून रात्री त्या उघड्यावरच चारपाई टाकून झोपत. सभोवताली काळोख असे आणि वर चांदण्यांनी खचाखच भरलेले आकाश. त्या चांदण्याकडे बघून आईने कितीतरी गोष्टी सांगितल्या. मुख्यत: रोहिणीच्या लहानपणच्या. ती आणि तिची बहीण नलिनी यांच्या. आणि जेवढ्या आठवतील तेवढ्या आईच्या लहानपणच्या सुद्धा—ज्या रोहिणीने पूर्वी कधी ऐकल्या नव्हत्या. दुपारी चर्चा-बैठकांचा व्याप उरकून त्या इतर बायकांबरोबर नदीवर जात. आईला थंड पाणी सोसत नसे म्हणून ती काठावरच बसून गप्पा मारत राही. तिच्या भोवती कायम बायकांचा गराडा असे — आणि दोन दिवसांतच ती कामचलाऊ भिलोरी भाषा बोलायला शिकली होती. रोहिणी कार्यकर्त्यांसमवेत गुंतलेली असे तेव्हा ती ज्ञानेश्वरी वाची आणि एका रात्री तर मोडक्यातोडक्या हिंदीत तिचे प्रवचनही झाले.

बस वेळेवर आली. तोपर्यंत पार संध्याकाळ झाली होती. निरोप द्यायला शाळेपुढच्या पटांगणात सगळा गाव जमा झाला. पत्रकार त्याच गाडीने मुंबईला जाणार होता. आणि आईला पार घरापर्यंत नेऊन सोडण्याचे आश्वासन त्याने दिले असल्याने काळजी नव्हती.

आई बसमधे चढण्यापूर्वी रोहिणीने तिच्या पायाला हात लावला.

''बये, काय आशीर्वाद देऊ तुला?'' आई तिला जवळ घेत म्हणाली.

''काय देतेस? जिंकशील म्हण. नेहमी म्हणायचीस तशी.''

''जिंकशील ग बाई! जिंकशील तू!'' आई म्हणाली आणि तिने काही क्षण रोहिणीला कवेत घेऊन ठेवले.

बस निघून गेली तेव्हा रोहिणीला एकदम पोटात खड्डा पडल्यासारखे झाले. काय करावे ते सुचेना. सभोवताली काळोख भरून येत होता. बाकी लोक हळूहळू घरी गेले. कार्यकर्ते रेंगाळत होते. त्यांना तिथे थांबायला सांगितले आणि मग काही न कळल्यासारखी ती सावकाश नदीकडे चालत गेली.

आता नदीचे पात्र दिवसापेक्षा अगदी निराळे दिसत होते. पाण्याचा रंग जवळजवळ करडा. पलिकडच्या घाटीवरची झाडेझुडपे किरमिजी प्रकाशात अंधूक होऊ लागलेली. पात्रातला खडकांचा पसारा आता अधिकच भव्य आणि गंभीर. सर्वदूर शांततेचे पांघरुण हळूहळू पसरत असलेले. त्यातून खडकांवर आपटून उसळणाऱ्या पाण्याचा चुळबुळता आवाज. मधूनच पाण्यावरून झेपा घेत जाणारा एकलकोंडा पक्षी.

एका मोठ्या खडकाचा आधार घेत रोहिणी पाण्याकडे पहात उभी राहिली. तिच्या मनात आले : आई म्हणाली ते खरं आहे. नातीगोती असली मित्रपरिवार असला तरी आपण अगदी एकटे असतो. आपल्या मागे हे लहानसं खेडं आहे. त्यातल्या प्रत्येक घराचं दार आपल्यासाठी उघडं आहे. पण तरीही त्यातलं कोणतंच घर



अनुक्रमणिका






आपलं नाही. इथंच असं नाही तर इतर गावातसुद्धा. आपण जिथून आलो तिथंही. आपलं म्हणावं असं घर नाही. आणि हे आपल्याला कळलं ते बरं झालं; पाणी काय मृगजळ काय!

समोर नदीचे पात्र होते, कानावर पाण्याचा खळाळता नाद होता आणि शरीराला खडकाचा कठीण स्पर्श होता, तरीही भोवतालचे आसमंत एखाद्या पोकळीसारखे वाटले तिला. उद्या काय होणार ते माहीत नाही. सगळं विश्वच मुळी हवेत टांगल्यासारखं आहे आणि आपलं आयुष्यसुद्धा. कुठून आलो आणि कुठं जाणार हे माहीत नाही आपल्याला. पण ह्या अवाढव्य पोकळीत आपला म्हणून एक तारा आहे. आणि लोकांचा समुदाय आणि नदीचा प्रवाह. ते नेतील तिकडे जाऊ आपण.

तिच्या खांद्यावर पिशवी तशीच होती. त्यातून तिच्या नकळत तिने अरुणचे पत्र बाहेर काढले. तिची नजर त्या लाल अक्षरांवर रेंगाळली. तिच्या बोटांनी त्या शुभ्र, सोनेरी कडांच्या, गुळगुळीत पत्रिकेला कुरवाळले. आणि मग हात उंचावून तिने ते कागद वाऱ्यावर सोडून दिले. वाऱ्याच्या झुळकीबरोबर वेटोळ्या खात काही वेळ ते हवेत तरंगले आणि मग नदीच्या प्रवाहात पडून पाण्याबरोबर दिसेनासे झाले. रोहिणी काही क्षण त्या दिशेकडे एकटक पाहत राहिली.

ती परत फिरली त्यावेळी तिची पावले स्थिर होती. पण आपल्या पापण्यांच्या कडेला पाणी का जमले ते तिला कळले नाही.

□

मिलिंद बोकील
१२४/११, राजकमल नं. ३, एरंडवणे, पुणे ४

---



---










## *नेणिवेच्या पातळीवर ! / मिलिंद बोकील*

*कथालेखन हे मी वैयक्तिक आणि पवित्र मानतो. कथालेखनाची प्रक्रिया नेणिवेच्या पातळीवर घडते. त्यामुळे एका मर्यादेपलिकडे मला ती उलगडून सांगता येत नाही.*

*काही विषय, काही थिम्स मनामधे असतात. त्यावर सतत विचार आणि चिंतन चालू असते. त्यातून मला कथेचे विषय सुचतात.*

*माझी पहिली कथा १९८१ साली किर्लोस्कर मासिकात प्रसिद्ध झाली. 'पुन्हा सूर्य, पुन्हा प्रकाश' असे तिचे नाव होते. एक इंजिनियर रासायनिक द्रव्याच्या टाकीत अपघाताने सापडतो व त्यातून स्वत:ची कशी सुटका करून घेतो-असा या कथेचा विषय होता. तो मी प्रत्यक्ष बघितलेला होता.*

*त्यानंतर १९९१ साली 'उदकाचिया आर्ती' प्रसिद्ध झाली. मेधा पाटकर यांच्यावर ही कथा लिहिलेली आहे असा एक समज आहे. एक धरणग्रस्तांमध्ये काम करणारी तरुणी या कथेची नायिका एवढाच या कथेचा मेधा पाटकरांशी संबंध आहे, आणि हे साधर्म्य फारच ढोबळ आहे. बाकी कथेत जे आहे ती सारी नवनिर्मीत आहे. कथेतील नायिका आणि तिची आई यांचे संबंध कथेत फार महत्त्वाचे आहेत, आणि ते माझे सर्जन आहे.*

*'छात्र युवा संघर्षवाहिनी' मार्फत जयप्रकाशजींच्या चळवळीत मी भाग घेतला होता. पुढे 'युसुफ मेहेर अली सेंटर' तर्फे पेण-पनवेल भागात आदिवासींमध्ये काम केले. मी जे काम करतो किंवा जिथे-जिथे फिरतो, त्यातून कथेसाठी आवश्यक असलेले तपशील मला मिळतात. पण कथेतली माणसे आणि त्यांचे परस्परांशी असलेले संबंध ही माझी निर्मिती असते.*

*अमेरिकेत गेलो होतो. तिथल्या वातावरणाचा फील मला आला होता. तिथे गेलेल्या भारतीयांना केवढे 'एलिअनेशन' आणि देशापासून तुटल्याची भावना असते हे अनुभवलं होतं. त्यातून 'विदेश' कथेचा जन्म झाला. फिलिपाईन्सला गेलो नव्हतो. पण जेव्हा गेलो तेव्हा लक्षात आलं 'लेमन ट्री' या कथेत रंगवलेलं फिलिपाईन्सचं वातावरण जवळजवळ तसंच आहे.*

*मी पुरुष असल्यामुळे स्त्रियांना नेमकं कसं वाटतं याचा मला अनुभव येऊ शकत नाही. पण मी स्त्रियांच्या प्रश्नांवर जे काम केले आहे त्यातून आणि माझ्या समाजशास्त्राच्या अभ्यासातून माझ्या कथेतल्या स्त्रिया नीटपणे रंगवायला मला मदत होते, असं वाटतं.*

*काही लिहावंसं वाटत नाही तेव्हा थांबतो.*

□

---

### स्वागत

- **माझी चित्रफीत :** बाळ आपटे, शुभदा सारस्वत प्रकाशन, पुणे, पृष्ठे २१६
- **पुणे न. वा. मंदिर दीडशे वर्षांचा इतिहास :** म. श्री. दीक्षित, डॉ. पुष्पा लिमये, पृष्ठे १०४

---

# तद्भव

□

रवींद्र शोभणे

□

"नंदू, अजून आपल्याला तिथं पोहचायला किती वेळ आहे रे?" काहीसं कंटाळलेल्या सुरात बेलानं त्याला विचारलं.

"नागपूरपासून दीडशे किलोमीटर्सवर आहे म्हणतात ना ऽ आता एक माइलस्टोन गेला त्यावर शंभरच्या जवळपास कुठलातरी आकडा होता."

"आणि आता गेलं हे कोणतं गाव रे?"

"नरखेड आहे म्हणे. आपल्या प्रेसचा वार्ताहर इथेसुद्धा आहे."

"हंऽ आणि तरीही आपल्या त्या खत्रुट संपादकानं आपल्याला इथे पाठविलं. एवढ्या दूऽऽर."

"हा वार्ताहर बरोबर बातम्या देत नाही म्हणे. इतर वृत्तपत्रातल्या ग्रामीण बातम्या बघ या भागातल्या, अन् आपल्या वृत्तपत्रातल्या बातम्या बघ."

"हूंऽ शिवाय फोटोतरी काय पाठवितात! शिवाय बातमीचं इंपॉर्टन्स संपल्यावर हे फोटो येणार. एऽ नंद्या, समजाऽ माझ्याऐवजी कुणा दुसरीला पाठविलं असतं तर रे इथं रिपोर्टिंगला?"

"तर आपण तिथेही आपली गोटी फिट केली असती."

"एऽ चूप, नाऽलायकच आहेस!" त्याच्या खांद्याला चिमटा काढत ती दबत्या आवाजात म्हणाली.

तो खोटाखोटाच किंचाळला. मग हसला.

बसमध्ये दोन-अडीच तास बसून बसून बेलाचं अंग काहीसं आंबून गेलं होतं. हातपाय मोकळे करायलाही जागा नव्हती. तरीही तिनं समोरच्या सीटखाली पाय लांबवून शक्य तेवढं रिलॅक्स होण्याचा प्रयत्न केला.

"बेला, मी एक सिगारेट ओढू?" नेहमीच्या सवयीनं नंदूनं तिला विचारलं.

"ते बघ. ड्रायव्हरच्या पाठीमागे काय लिहिलं आहे. 'धूम्रपान करण्यास सक्त मनाई आहे.' ते वाच जरा."

"तरीसुद्धा ड्रायव्हर विडी ओढतोच ना?"

बेला त्याच्याकडे पाहत गंमतीनं हसली. तिला माहीत होतं, आपल्या 'हो' किंवा 'नाही' म्हणण्यानं नंदू आपला हेका सोडणार नाही, म्हणून; पण तरीसुद्धा त्याच्यावर असा अधिकार गाजवायला, एखाद्या गोष्टीसाठी मुद्दाम त्याला अडवायला तिला आवडत होतं. तशी तिला सवयच झाली होती.

"माझी ही कॅमेऱ्याची बॅग सांभाळ. मी सिगारेट शिलगावतो."

त्यानं आपली कॅमेऱ्याची बॅग तिच्या मांडीवर ठेवली. बॅग मांडीवर ठेवताना त्यानं जाणीवपूर्वक तिच्या मांडीला स्पर्श केला. लटक्या रागानं डोळ्यांच्या कोपऱ्यातून



डॉ. रवींद्र केशवराव शोभणे
जन्म : १५ मे १९५९ जन्मगाव : खरसोली
(ता. नरखेड; जि. नागपूर
शिक्षण : एम.ए. (मराठी बी.एड्. पीएच.डी.)
व्यवसाय : प्राध्यापक (मराठी विभाग प्रमुख)
धनवटे नॅशनल कॉलेज, काँग्रेसनगर,
नागपूर.

**प्रकाशित पुस्तके**

**कादंबऱ्या :**

प्रवाह / १९८३ (महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातर्फे प्रकाशित)
रक्तध्रुव / १९८९ (मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे)
कोंडी / १९९२ (मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे)
चिरेबंद/१९९५ (देशमुख आणि कं. पुणे)
सव्वीस दिवस / १९९६ (मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे)

**कथासंग्रह :**

वर्तमान / १९९१ (मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई)
कथांजली (संपादित / १९९१ (ऋचा प्रकाशन, नागपूर
दाहीदिशा / १९९४ (मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे)
शहामृग / १९९८ (मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई

**समीक्षा :**

कादंबरीकार श्री. ना. पेंडसे / १९९६ (ऋचा प्रकाशन, नागपूर

**आगामी पुस्तके :**

ताजा कलम (कथासंग्रह) / मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे
सत्त्वशोधाच्या दिशा (समीक्षा) / मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे
गांगेय (कादंबरी) / मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे

**पुरस्कार/सन्मान :**

तल्हार स्मृती पुरस्कार ('रक्तध्रुव'साठी)
लोकमत पुरस्कार (ललितलेखनासाठी)
'कोंडी'साठी म.सा.प. चा. ग. ल. ठोकळ पुरस्कार
रोहमारे पुरस्कार
नाथमाधव साहित्य पुरस्कार
महाराष्ट्र शासनाचा वाङ्मय पुरस्कार
साहित्य अकादमीची प्रवासवृत्ती
'चिंरेबंद'साठी ग्रंथोत्तेजक पुरस्कार (इचलकरंजी एज्युकेशनल अँड चॅरिटेबल ट्रस्ट)
रणजित देसाई कादंबरी पुरस्कार)
दूरदर्शन वरून प्रसारित नाटके
१. इतिहास बदलतो आहे (१९८७)
२. त्रिशंकू (१९९२)

**प्रसारित नभोनाट्ये :**

१. सूर्यविलाप २. कथा कथेची
३. खंदक ४. झुंबर ५. त्रिशंकू



अनुक्रमणिका

त्याच्याकडे पाहात तिनं स्मित केलं.

सिगारेट शिलगवून तो धूर सोडू लागला.

''धूर बाहेर सोड रे बाबा. मला ठसका बसतो.'' काहीसं खोकत ती म्हणाली.

नंदूनं तोंडाचा चंबू खिडकीच्या बाहेरच्या दिशेनं मोकळा केला.

महापुरात मोवाड वाहून गेल्याची बातमी काल सर्वच वृत्तपत्रांच्या कार्यालयात येऊन धडकली होती. तारा, फोन्स सतत दर अर्ध्या तासाने येत होते. स्थानीय वार्ताहरांचं म्हणणं होतं, असा महापूर गेल्या शंभर वर्षांत कधी आला नव्हता, म्हणून. दिल्ली दूरदर्शनच्या मुख्य बातम्यांमध्ये ही महापुराची बातमी ऐकून तमाम वृत्तपत्रवाल्यांना या अस्मानी संकटाचं महत्त्व कळलं होतं. सगळ्यांना खडबडून जाग आली. या परिसरातल्या साध्या वार्ताहरावर विसंबून राहण्याइतपत ही घटना नगण्य नाही, याची जाणीव राष्ट्रीय प्रसारणातल्या बातमीनं बहुतेक वृत्तपत्रवाल्यांना झाली आणि त्यांनी तिथल्या विशेष वृत्तसेवेसाठी आपापले प्रतिनिधी छायाचित्रकारांसह रवाना केले. बेला आणि नंदू हे दोघेही त्यापैकीच. एका आघाडीच्या वृत्तपत्राचे प्रतिनिधी म्हणून घटनास्थळी जायला निघाले होते.

''नंदू, खरं म्हणजे यावेळेस माझा इकडे यायचा मूड नव्हता.'' संवादाचा तुटलेला धागा पुन्हा जुळवत बेला म्हणाली.

''का ग?''

''घरी ताई आली आहे बाळंतपणाला. ती धावपळ. तिच्यासोबतही जावं लागतं ना?''

''तुझ्या ताईचं लग्न होऊन एक वर्षही तर व्हायचं आहे ग.'' हसत तो म्हणाला.

''मूल व्हायला एक वर्ष कशाला हवं?''

''ते मला कसं कळणार?''

''कुक्कुलं बाळच तर आहेस तू म्हणजे.''

तो पुन्हा हसला.

रस्त्यावरच्या पाणी साचलेल्या डवक्यात बसचं मागचं चाक आल्यामुळे त्या पाण्याचे फवारे आतपर्यंत उडाले. दाबलेलं पाणी मोकळं होताच सपकन बाहेर यावं तसं.

बेलानं खिडकीतून बाहेर नजर टाकली. पूर ओसरून गेल्यावरची नासधूस मधून मधून दृष्टीस पडत होती. मुळापासून उचकटून गेलेलं, कलंडलेलं, अर्धवट झुकलेलं एखादं बाभळीचं झाड, झाडाच्या फांद्याफांद्यांमध्ये अडकून पडलेला पुरातला कचरा, कुठे काटेरी कुंपणात अडकून पडलेलं जीर्ण, फाटलेलं वस्त्र, शिवारातली ओली चिपचिप झालेली माती...

''नंदू, ते गाव आलेलं दिसतंय् रे.'' बाहेर एकटक पाहत बेलानं सांगितलं.

तसा नंदूही आता बाहेर पाहू लागला.

बसमधले प्रवासी हळहळत, चुकचुकत बाहेर पाहत होते.

एवढ्यात बस थांबली. कंडक्टर बसल्या जागेवरून ओरडला.

''भय्या इसके आगे गाडी नै जायेंगी. आगेका रस्ता खराब हुआ है. रपटा टूट गया है.''

कंडक्टरच्या त्या आवाजापाठोपाठ बेलानं नंदूकडं पाहिलं.

''म्हणजे आता पायी जावं लागणार तर. इथून वस्ती किती दूर आहे, कुणास ठाऊक.'' तिच्या एकूणच बोलण्यात काहीसा कंटाळा जाणवत होता.

''कंटाळलीस का ग?''

त्यावर हसलीसुद्धा ती कंटाळल्या-

सारखीच.

बसमधून उतरणाऱ्या उतारूंसोबत वेला आणि नंदूही आपापलं सामान घेऊन उतरले. उतरताना कंडक्टरला वस्तीविषयी विचारायचं नंदू विसरला नाही.

"अरे भय्याऽ वस्ती क्या पुंछते. सब सत्यानास हो गया. वो देखो बस्ती. साला सव खंडहर हो गया." दु:खावर थुंकल्यासारखा विकटपणे हसत कंडक्टर म्हणाला.

दोघांनीही समोर दृष्टी टाकली. घरांची पाखं, छप्परं वाहून गेलेली बोडकी, उघडी - नागडी घरं... मुंडन केलेल्या अनाथ पोरांसारखी. ओलसर भिंती, पुराच्या पाण्याचा साचलेला सर्वत्र गाळ. तुपाचा लेप पसरवून ठेवावा, तसा.

रस्त्यावरून माणसांची वर्दळ, ये-जा सुरू होती. चिखलानं रस्ता जणू लिबलिबित झाला होता. त्यातच मिसळलेली घाण, शेण.

"ही माणसं चालली आहेत तिकडेच जायचं ना?" बेलाचा प्रश्न.

"अर्थातच."

"शी! काय घाण रस्ता आहे रे. कुबट, कुजल्यासारखा वास येतोय् बघ."

नंदूनं कॅमेरा काढला बॅगमधून. लेन्स लावला. मग लेन्स ॲडजेस्ट करीत, त्यातून पाहत त्यानं वस्तीच्या दिशेनं कॅमेरा वळविला.

"काय करतोस?"

बेलाच्या प्रश्नावरोबर त्याच्या कॅमेऱ्याचा फ्लॅश चमकला.

"इथला कशाला फोटो घेतलास रे?"

"अगंऽ इथून बघ काय छान लॅंडस्केप दिसतेय् ते."

गंमत म्हणून तिनंही कॅमेऱ्याच्या लेन्सला डोळा लावला. नंदूनं पुन्हा लेन्स ॲडजेस्ट केला. दूरवर दिसणारी ती वस्ती त्या लेन्समधून एकदम अंगावर आल्यासारखी वाटू लागली.

"हूंऽ खरं आहे रे."

येणारे जाणारे त्या दोघांकडे पाहत होते.

"बेला, इथे तू उभी राहा. या बॅकग्राऊंडवर तुझा स्नॅप घेतो. डेव्हलपिंग प्रोसेसमध्ये त्याला मस्त बनवता येईल."

"नको रे. लोक बघतात नाऽ"

"काही होत नाही ग. जस्ट अं मिनिट."

- आणि ती नाही नाही म्हणत असतानाच त्यानं तिच्यावर दोनदा फ्लॅश टाकलाच.

"तू म्हणजे ग्रेटच आहेस." तिचा नेहमीचा तक्रारवजा सूर पुन्हा उमटला.

"तुझा हा फोटो कसा मस्त एन्लार्ज करतो ते बघ. झक्कास येईल."

"माझा फोटो आणि झक्कास. अशी काळीसावळी, अपऱ्या नाकाची मी...नंद्याऽ तू मला चक्क बनवतो."

"नाही ग. तुझा चेहरा खरंच फोटोजेनिक आहे. तू मनात आणलंस नाऽ तर मस्तपैकी मॉडेलिंग करू शकतेस. रीअली."

त्याच्या त्या बोलण्यावर बेला लाट फुटावी तशी हसली.

"पहाटे पहाटे सर्वत्र हलकल्लोळ माजला. बाहेर मुसळधार पाऊस कोसळत होता. कुणीतरी ओरडत आलं - पुराचं पाणी गावात घुसायला लागलं, म्हणून साखरझोपेतून लोक खडबडून जागे झाले. हाताला लागेल ते घेऊन चिलापिलांना झोपेतच उचलून लोक पठाराकडे पळत सुटले. संकटासारखं पाणी चहू बाजूंनी धावून येत होतं. दोन-तीन माणसांचा अद्याप पत्ता लागलेला नाही. ते पुरात वाहून गेले की

काय, अशी शंका आहे. कुणाकुणाच्या गायी - म्हशी, बकऱ्या - कोंबड्या पुरात वाहून गेल्या. प्राणहानी तशी टळली; पण वित्तहानी खूप झाली. या माणसांच्या अंगावर पुरेसे कपडे नाहीत... अंथरुणं-पांघरुणं नाहीत..."

कुणीतरी दूरदर्शनच्या टीमला तिथलं घटित सांगत होतं. दूरदर्शनचा कॅमेरा तिथं सर्वत्र फिरत होता. वृत्तपत्राचे वार्ताहर, रेडिओ दूरदर्शनचे प्रतिनिधी घटनेचा तपशील आपल्या पॅडवर घाईघाईनं उतरवित होते. बेलाही त्यांच्यातच उभी होती.

नंदू आवश्यक वाटणाऱ्या वस्तूंचे, भागांचे फोटो टिपत होता. इतरांच्या कॅमेऱ्यासोबतच त्याच्या कॅमेऱ्याचाही फ्लॅश मधून मधून पडत होता.

"या नदीचं नांव काय म्हणालात?" गर्दीतच कुणीतरी विचारलं.

"वर्धा. हे बघा. इथं या दोन नद्यांचा संगम आहे. वर्धा आणि वैनगंगा. दोन्ही नद्यांना मोठ्ठा पूर आलेला होता."

अद्यापही नदी दुथडी भरूनच वाहत होती. काठावर लहान मोठ्या लाटा फुटत होत्या. नदीवरील पुलाला चाटून, त्याखालून पाणी वाहत होतं.

"इट्स हॉरिबल! भयंकर!"

"या नदीत आता किती फूट पाणी असेल हो?" वार्ताहरापैकीचं कुणाचा तरी प्रश्न.

"या पुलाला पाणी भिडलेलं आहे म्हणजे किमान पन्नास फूट तरी पाणी असेल. हा पूल नदीच्या तळापासून पन्नास फूट उंचीवर आहे."

"आय सी! आय सी!"

नदीतल्या वाहणाऱ्या पाण्यावर फटाफट दोन-चार फ्लॅश चमकलेत.

संपूर्ण पथक तिथून हललं आणि पूरपिडितांनी आश्रय घेतला होता, त्या शाळेच्या इमारतीत आलं. शाळेची इमारत तिथल्या गावकऱ्यांनी गजबजून गेली होती. कुण्या-कुण्या स्वयंसेवी संस्थांचे स्वयंसेवक, राजकारणी नेते, पोलिस, एन.एन.एस.चे विद्यार्थी त्यांना मदत करीत होते. व्हरांड्यात मोठ-मोठ्या चुली मांडून मोठमोठ्या भांड्यात अन्न शिजत होतं.

"अशा चार-पाच शाळांमध्ये ही गावातली माणसं थांबलेली आहेत. ज्यांची घरं पुरात वाहून गेली, ती ही गरीब बाया-माणसं आहेत. त्यांनी फक्त आपला जीव वाचविला. आता सरकारला यांचं पुनर्वसनच करावं लागणार. जमिनीवर नांगर फिरवावा, तशी यांची घरं पार भुईसपाट झालीत." गावातला माणूस सांगत होता.

तिथली बाया-माणसं, उघडी नागडी मुलं त्या शहरी माणसांच्या ताफ्याकडे थिजलेल्या, आसवांनी डवडबलेल्या डोळ्यांनी पाहत होती. ती केविलवाणी नजर त्या शहरी माणसांनाही क्षणभर अस्वस्थ करून गेली.

दूरदर्शनचा मुव्ही कॅमेरा हळूहळू ते सगळं टिपत होता. प्रेस फोटोग्राफरसंही हळूहळू आपापले फ्लॅश चमकवित होते.

नंदू थोडासा बाजूला उभा राहून फोटो घेत होता.

एका कोपऱ्यात आपल्या तान्ह्या मुलाला स्तनाशी भिडवून एक काळीसावळी बाई दूध पाजत होती. मूल चोखत असलेला तिचा दुधानं टरारून आलेला स्तन नकळतपणे पदरावाहेर दिसत होता. नंदूनं कोपऱ्यात फ्लॅश टाकला.

जणू अंगावरून वीज लकाकून जावी,

तशी ती बाई चमकली. दचकली. ओशाळली. शहरी माणसांच्या त्या ताफ्याकडे काहीशा नाराजीनं पाहात तिनं आपला फाटका, मळका पदर समोरून ओढून घेतला.

"हाय बेलाऽ तू कधी आलीस ग?"

गर्दीतल्या बेलाला कुणीतरी आवाज दिला, म्हणून ती आजूबाजूला पाहू लागली.

"तू का ग रीता? कुणासोबत आलीस?" बेलानं रीताला विचारलं.

"आमच्या टीमची बहुतेक माणसं आलीत ना?"

"जायचं कधी म्हणतेस?"

"अद्याप नक्की कुठे आहे. मुंबई सेंटरला एक कॅसेट ताबडतोब पाठवायची आहे."

एवढ्यात रीताच्या टीमपैकी कुणीतरी तिला आवाज दिला. तशी ती बेलाचा निरोप घेऊन पलीकडे गेली.

जवळ येत नंदूनं हलक्या आवाजात विचारलं,

"कोण ग ही?"

"दूरदर्शनला अनाऊन्सर आहे."

"हंऽ तरीच. म्हटलं इतके शार्प फीचर्स असलेली मुलगी वृत्तपत्रात कशी? मॉडेलिंग करील का ती? विचारून बघ ना. मलाही एका चांगल्या मॉडेलची आवश्यकता आहे."

"तुला जिथं तिथं मॉडेलिंगच सुचतं का रे?" हसत, टोमणा मारत तिनं त्याचं म्हणणं उडवून लावलं.

बाहेरच्या या प्रतिनिधींची जेवणाची व्यवस्था म्युनसिपालटीच्या इमारतीत करण्यात आल्याची कुणीतरी वार्ता दिली. दुपारचे दोन वाजून गेले असल्यामुळे खरं तर सगळ्यांच्याच पोटात कावळे ओरडत होते. नाही म्हणायला एक-दोन वेळा त्यांना चहा मिळाला होता. जर्मलच्या ग्लासमधून चहा पिताना त्यांना थोडी गंमतच वाटत होती; पण ढगाळ वातावरण, सतत चिखलात पाय, थंड वारा यामुळे तो पुराच्या पाण्यासारखा गढूळ चहाही त्यांना तजेला देणारा, स्फूर्तिदायी वाटत होता.

प्रसारमाध्यमांचे बहुतेक प्रतिनिधी आपापल्या बॅगा, उपकरणं घेऊन जेवायच्या ठिकाणी घाईघाईनं निघून गेलेले होते. नंदू मात्र काही इकडचे तिकडचे फोटो घेत अद्याप तिथेच होता; आणि तो होता म्हणून बेलाही.

"नंद्याऽ झाले नाही का तुझे फोटो घेऊन? मला कंटाळा आलाय् आता. भूक लागली रे कधीची."

"ओक्केऽ ओक्के." म्हणत त्यानं लेन्स, फ्लॅश काढून कॅमेरा आपल्या बॅगमध्ये ठेवला आणि बॅग खांद्यावर लटकवून तो तिला म्हणाला.

"चल. तुला जरा जास्तच छळतो मी. होय ना?"

त्यावर ती काहीच बोलली नाही. त्याच्यासोबत मुकाट्यानं चालू लागली.

"शेवटचे दोन-तीन फोटो घेतले की रोल चेंज करावा लागेल." चालता चालता तो म्हणाला.

"एवढे कसले फोटो घेतलेस रे?"

"अगं, इट्स नॉव्हेल चान्स फॉर मी. माझ्या डोक्यात एक छान आयडिया आली. बघच तू."

"कसली आयडिया? या फोटोंचे काय प्रदर्शन वगैरे भरविणार आहेस की काय?"

"हूंऽ त्यासाठीच हे फोटो घेऊन ठेवतोय."

त्यावर बेलाची प्रतिक्रिया नॉर्मल होती.

समोर रस्त्याच्या बाजूला घोटाभर चिखलात एक परकरी मुलगी आणि तिचा दहा-अकरा वर्षांचा लहान भाऊ काहीतरी शोधत होते. नंदूचं लक्ष त्यांच्याकडे गेलं. त्यानं पट्कन आपला कॅमेरा सज्ज केला आणि चिखल तुडविणाऱ्या त्या बहीण-भावाचा एक फोटो टिपला. आपल्यावर कॅमेऱ्याचा फ्लॅश पडताबरोबर ती दोघंही त्या दिशेनं पाहू लागली. नंदूची आणि त्यांची नजरानजर झाली. नंदूकडे पाहून ती दोघंही हसली. तो त्यांच्या जवळ गेला, तशी बेला काहीशी वैतागून म्हणाली,

''आता काय तुझं आणखी हे रे?''

''बेलाऽ प्लीज प्लीऽज. जस्ट ए मिनिट हंऽ''

ती वैतागून तिथंच बाजूच्या दगडावर टेकली. कंटाळून इकडे तिकडे पाहत.

''काय शोधतोस रे?'' पायानं चिखल उपसणाऱ्या त्या छोट्या मुलाला नंदूनं विचारलं.

''पैशे चमकत व्हते थे पाह्यतो...'' नंदूच्या गळ्यातल्या कॅमेऱ्याकडे कौतुकानं पाहत तो सांगू लागला.

''तुझा फटु काढू का?'' आमीष दाखवावं, तसा नंदू त्याला विचारू लागला.

''-हौऽ हौऽ माझ्या भैनीचा बी काढा ना फटु.''

''ही तुझी बहीण का?''

''हौऽ''

''नाव काय ग तुझं?'' नंदूनं सरळ तिलाच विचारलं.

''निमी.'' काहीसं संकोचत तिनं नाव सांगितलं.

''आपण एकेकाचा फोटो काढू, काय?''

''हौ हौऽ''

त्याचा फोटो काढून नंदू निमीजवळ आला. बेलाकडे पाठ करून त्यानं तिला उभं केलं. लेन्समधून एकदा पाहिलं. मग तिच्या जवळ येत त्यानं तिच्या खांद्यावरच्या जुनाट साडीचा पदर वक्षावरून बाजूला सारला. तिचा ब्लाऊज अर्धवट उघडा केला. तिचे दोन्ही स्तन दिसतील असा. तशी ती संकोचली. लाजली. पदर ओढून घेत म्हणाली, ''नकूऽ''

''अगं काही करीत नाही. फटु काढतो तुझा. तू बघ या कॅमेऱ्यात किती छान दिसतेस तर.''

— आणि खिशातून पन्नासची नोट काढून तिच्या हातावर ठेवीत तिचा गालगुच्चा घेत तो म्हणाला,

''हं हे पैसे ठेव. तुझी मेहनत.''

त्यानं आपल्या हातावर ठेवलेल्या त्या पन्नासच्या नोटेकडे ती विस्फारल्या डोळ्यांनी पाहू लागली. चेटूक व्हावं, तशी.

नंदूनं हळूच तिचा वक्ष अधिक उघडा केला. संपूर्ण उरोज दिसेल असा. आणि चार पावलं मागे सरून त्यानं फटाफट तिचे तीन - चार स्नॅप्स काढून घेतलेत.

''नंद्याऽ हरी अप्'' बेला तिथूनच ओरडली.

''हो होऽ झालंच गं.''

निमीजवळ येत तो म्हणाला,

''थँक्यू.''

- आणि त्यानं निमीचा पुन्हा गालगुच्चा घेतला. नवतीचा भाव, पाण्यात तरंग उठावा, तसा तिच्या डोळ्यांत हलला.

''उद्या पुन्ना याल फटु घ्यायला?'' तिनं विचारलं.

''बघू.''

हसत, लाजत तिनं त्याच्याकडे पाहिलं आणि आपल्या भावाचा हात धरून तिनं तिथून पळ काढला.

''तिला एक्स्पोज करून तिचा फोटो घेतला असशील.'' बेलानं काहीशा नाराजीनंच विचारलं.

''हूंऽ थोडसं. आधी तयारच होत नव्हती. हातात पन्नासची नोट ठेवली तेव्हा मुकाट उभी राहिली.''

''हे असे फोटो काढून तुला काय करायचं आहे?''

''त्यातलं निसर्गदत्त सौंदर्य टिपायचं आहे. ते कलावंतालाच दिसतंय्.''

''नंदू, तुझं हे असं वागणं मला नाही आवडत. कलावंताच्या आणि कलेच्या नावाखाली तुम्ही लोक स्त्रीदेहाचं असं उघडं - नागडं दर्शन घडवताय्. तुम्हाला स्त्री, तिचं शरीर इतकं स्वस्त वाटतंय्.''

''बेला, तुझ्यासारख्या स्त्रीस्वातंत्र्यवादी आणि स्त्रीमुक्तीवादी मुलीसमोर माझ्यासारखा पामर फोटोग्राफर काय बोलणार?'' हसत त्यानं तिला टोमणा मारला.

''पुरे. कळतंय् मला. चल आता मुकाट्यानं. भूक लागलीय् सपाटून.''

''बेला, अगं झोपतेस काय? ते बघ नागपूर आलंय्. ते बघ सिमेनरी हिल्सचे दिवे दिसताहेत.'' आपल्या खांद्यावरचं बेलाचं डोकं हलवत नंदू म्हणाला.

''खूप झोप येते रे. या दोन दिवसांत अंग अगदी शिणून गेलंय्. चालून चालून हातपाय ठणकायला लागलेत.'' त्याच्या खांद्यावर आपला गाल ठेवत ती म्हणाली.

''आता दोन दिवस सुटी घे आणि विश्रांती घे चांगली.''

''हंऽ किती वाजले असतील रे?''

त्यानं बसल्या बसल्या आपल्या मनगटावरील घड्याळ्यात पाहण्याचा प्रयत्न केला; पण बसमध्ये सर्वत्र अंधार असल्यामुळे त्याला नीटपणे पाहताही आलं नाही. अंदाजानं तो म्हणाला.

''साडेनऊ-दहा तरी वाजले असतील.''

''मला घरी सोडून देशील.''

बसमधल्या अंधाराचा फायदा घेऊन नंदूनं हळूच तिच्या कमरेभोवती हात घातला. तिनं त्यावर कुठलाही प्रतिकार केला नाही. उलट ती त्याला आणखी चिपकून बसली.

''बेला -''

''ऊं?''

''उद्या दुपारी घरी ये ना ग.'' त्याच्या बोलण्यात जणू आर्जव होतं.

''हंऽ''

''नाहीतर असं करायचं का? आता सरळ माझ्या घरी जाऊ. तासभर थांबू. मग मी तुला तुझ्या घरी पोहचवून देतो.''

''घरी तू नीट बसत नाहीस. बळजोरी करतोस. अन् हवं ते घेतल्यावाचून राहत नाहीत.''

''तुला नको असतं ते?''

''त्यातून कुठला घोटाळा व्हायची भीती वाटते रे. असं काही झालं तर लग्न करशील माझ्याशी?''

''हे काय विचारणं झालं का ग? आपलं ठरलंय् ना?''

तिनं त्यावर हुंकार भरला.

नंदूचं दार आतून बंद होतं. बेलानं आपली

स्कूटर लॉक केली आणि दारावरची कॉलबेल दाबली.

बाहेर पावसाची रिपरिप सुरू होती. पावसात आल्यामुळं तिचा सलवार-कुर्ता काहीसा भिजला होता. चेहऱ्यावर, केसांवर पाण्याचे थेंब दिसत होते. रुमालानं तिनं आपला चेहरा तिथंच उभ्या उभ्या पुसून काढला.

एवढ्यात नंदूनं आतून दार उघडलं.

''अरेऽ तू होय? ये ना आत.'' हसून त्यानं तिचं स्वागत केलं.

ती त्याच्या पाठोपाठ आत आली. कॉटवर बसली.

''ए नंद्याऽ फॅन ऑन कर ना रेऽ मी चक्क भिजत आले. अंगावरचे हे कपडे जरा सुकू तरी दे बाबा.''

''कपडे काढून ठेव ना. मी प्रेस करून देतो.''

''एऽ पांचटपणा पुरे कर. चल फॅन ऑन कर.'' बेलानं लटक्या सुरात त्याला दटावलं.

गंमतीनं तिच्याकडे पाहत, हसत त्यानं फॅन सुरू केला. फॅनचा थोडा वेगही वाढविला.

''या अशा भिजपावसात कुठे आलीस ग इकडे?''

''तुझी तीव्रतेने आठवण झाली म्हणून.'' ओठ मुडपत त्याच्याकडे पाहत ती म्हणाली.

''चल् फेकू नकोस!'' तिचं तशा प्रकारचं बोलणं ऐकून त्यानं तिला उडवून लावलं.

''का? तुझी आठवण मला येत नाही, असं वाटतं तुला? आठवण फक्त तुलाच येते? खरं खरं सांगू नंद्याऽ तुम्हा पुरुषांपेक्षा आम्ही स्त्रिया या बाबतीत अधिक सेंटिमेंटल असतो. अधिक पझेसिव्ह असतो.''

''बेला, तू असं काही बोलायला लागलीस ना की हातात माइक घेऊन डायसवर उभी राहून बोलणाऱ्या बाईसारखी वाटतेस.'' नेहमीच्या पद्धतीनं हसत त्यानं तिला टोमणा मारला.

त्यावर तीही हसली. मग म्हणाली,

''अरेऽ एका प्रेसकॉन्फरन्सला गेले होते. तिथून परतताना सहज तुझा विचार डोक्यात आला. म्हटलं घरावरून जाऊ या तर. महाराज भेटले तर भेटले. बघते, तर तुझ्या दाराला नेहमीप्रमाणे कुलूप लटकलेलं नव्हतं.''

''एवढ्यात सहसा घरीच असतो. एक नवं काम हातात घेतलंय्.''

''कुठलं?''

''सांगतो. आधी तू कॉफी घेशील का ते सांग. मला घ्यायची आहेच.''

''मग? घेईन तर! अगदी मनातलं बोललास. छान स्ट्राँग आणि गरम कॉफीची आवश्यकता आहे.''

तसा तो तिथून उठून किचनमध्ये आला. पाण्यानं भांडं विसळून त्यात दूध उकळायला घातलं. त्याच्या पाठोपाठ बेलाही किचनमध्ये आली. ओट्याखाली साचलेल्या खरकट्या भांड्यांचा ढीग पाहून म्हणाली,

''आज तुझी भांडीवाली बाई आलेली दिसत नाही.''

''कालपासून तिचा पत्ता नाही. कुण्या नात्यातल्या बाईच्या बाळंतपणाला गेली म्हणे.''

बोलता बोलता अचानक त्याच्या डोक्यात प्रकाश पडला. मग बेलाला विचारू लागला,

''बेला, तुझ्या ताईचं बाळंतपण आटोपलं का ग?''

''हूंऽ आठ दिवसांपूर्वीच. काल ती

हॉस्पिटलमधून घरीसुद्धा परतली.

"काय? मुलगा-मुलगी?"

"मुलगी."

"व्हेरी गुड!"

"व्हेरी गुड काय! ताईला मुलगा हवा होता. तिच्या सासरकडच्यांना मुलाचा भारी सोस !"

"त्यात काय? मुलगाही होईल म्हणावं. लेट देम टेक अगेन वन चान्स."

— आणि त्यानं तिला खसूकन जवळ ओढून तिच्या अधराला चावा घेतला. तशी ती क्षणिक विव्हळली. कळवळली.

"पुरे आता. प्रत्येक खेपेला हेच हवं का?"

"हे दैनंदिन जीवनातलं नित्यकर्म आहे, तेव्हा का नको?"

"ती बघ कॉफी झाली. ती कपात ओत आणि चल बाहेर बसू."

त्यानं दोन कपांमध्ये कॉफी ओतली. तिनं आपला कप उचलला.

समोरच्या रूममध्ये येत तिनं विचारलं,

"गावचं सगळं विकून तू आईवडिलांना इकडे आणणार होतास यंदा, त्याचं काय झालं रे?"

"हं ते आहेच ना डोक्यात. तिथलं विकून मला इथे चांगला स्टुडिओ उभारता येईल. सौदा सुरू आहे."

"हंऽ तुझा स्टुडिओ एकदा उभा राहिला की चांगलं होईल. नंद्याऽ अलिकडे तू कुठल्या नव्या कामात गुंतलास म्हणाला रे?"

"माझ्या छायाचित्रांचं प्रदर्शन भरवायचं आहे मुंबईला जहांगीर आर्ट गॅलरीत. त्याकरिता सगळे फोटोग्राफ्स तयार करणं सुरू आहे. प्रदर्शनाचं नाव ठेवायचं आहे 'दि फ्लड!'"

"म्हणजे मोवाडच्या महापुराचे फोटोग्राफ्स?"

"हूंऽ ते बघ, कॉटखाली काही पॉझिटिव्हज तयार आहेत. बघ ना."

- आणि त्यानं कॉटखालचं पाकीट काढून तिच्यासमोर ठेवलं. तिनं पाकीट उघडून पाहिलं. दीड बाय दीड फुटांचे छत्तीस फोटोग्राफ्स त्यात होते. पूरग्रस्तांचे.

ती एकेक फोटोग्राफ न्याहळू लागली... सगळे तेच तर फोटो होते... धूरकट, झाकोळलेल्या वातावरणात उभं असलेलं उद्‌ध्वस्त गाव, उडालेल्या वाहून गेलेल्या छपरांची उघडी बोडकी घरे, चिखलानं माखलेले रस्ते, चिखलात उमटलेला पायाचा एखादा ठसा, गढूळ पाण्यानं दुथडी भरून वाहणारी नदी. शाळेच्या इमारतीच्या पडवीत बेघर झालेले गावकरी, मुलाला पाजणारी आई. षोडशा मुलीचा उघडा उरोज, नागडी पोरं... स्त्रियांचे आणखी काही उघडे नागडे फोटो...

"कसे आहेत ग फोटो?" त्यानं अभिप्राय विचारला.

"चांगले आहेत."

हा अभिप्राय देतानाही तिच्या मनात काहीतरी होतं. ते नंदूला जाणवलं. तिचं बोलणं, तिचा हा अभिप्राय मनापासूनचा नव्हे. वरवरचा आहे. मनापासून दिलेला अभिप्राय फार उत्कट असतो. ते शब्द असे कोरडे नसतात.

"बेला, तू मनापासून बोलत नाहीस." नंदू म्हणाला.

"बोलूच का मनापासून?"

"हंऽ"

त्या फोटोमधून तिनं काही फोटो वेगळे काढले. वेगळे काढलेले ते कुठले फोटो आहेत हे नंदूनं ताडलं.

''या प्रदर्शनात तू हे फोटोसुद्धा लावणार आहेस?'' बाजूला काढून ठेवलेल्या फोटोंचा निर्देश करीत बेलानं विचारलं.

''हां. ते फोटोसुद्धा या प्रदर्शनत महत्त्वाचे आहेत. त्यात काय वाईट आहे ग असं?''

''नंद्याऽ हे फोटो स्त्रीदेहाचं उघडं - नागडं दर्शन घडविणारे आहेत. हे फोटो वघ तू कसा घेतलास. हे आईचं दूध पिणारं मूल त्याचं फक्त डोकं आणि त्याच्या आईचे स्तन दिसतात...''

''हा फोटो मातृत्त्वाचं प्रतीक आहे. अशा फोटोंना फॉरेनमध्ये खूप मागणी असते म्हणतात.''

''म्हणून तू हे फोटो काढलेस. हा फोटो म्हणजे मातृत्त्वाचं प्रतीक आहे तर मुलाला स्तनपान करणाऱ्या आईच्या चेहऱ्यावरील कृतार्थ भाव नकोत? वात्सल्यानं, मातृत्त्वानं फुलून आलेला तिचा चेहरा नको?''

''तिचा चेहरा घेतला असता तर इतर डिटेल्स आले नसते.''

''इतर डिटेल्स म्हणजे? केवळ तिचे स्तन, त्याचा आकार... किती हास्यास्पद बोलतोस. तुला केवळ स्त्रीदेहाचं प्रदर्शनच यातून मांडायचं आहे.''

बेलाचं बोलणं ऐकून तो क्षणभर गप्प राहिला. निरुत्तर व्हावा, तसा. विचार करू लागला. मग म्हणाला,

''अगं ती कला आहे आणि कलेकडे कला म्हणूनच बघायला हवं. खजुराहोंची मूर्तिकला तू बघितली आहेस ना? त्यात तर...''

''नंद्या, एक मिनिट. खजुराहोंच्या शिल्पावरचे सगळे भावच कामासक्त असे आहेत. इथे या फोटोंमधील स्त्रियांच्या चेहऱ्यावर भाव दु:खाचे आहेत. जगण्याच्या सगळ्याच आशा जळून कोळसा झालेल्या या स्त्रियांना असं उघडं नागडं, वस्त्रहीन दाखवणं, हा त्यांच्यावरील अन्याय आहे. त्यांचं हे दु:ख आपण कलेच्या नावावर विकणार आहोत? आपल्याला चार पैसे मिळतात म्हणून, आपण मारलेल्या चार फटकाऱ्यांचं कौतुक होतं म्हणून आपण असं त्यांचं दु:ख, वेदना बाजारात घेऊन बसायचं? मला नाही पटत हे.''

बेलाच्या बोलण्यातून नेहमीचाच पीळ जाणवत होता. तिच्यासारखी स्पष्टवक्ती, उत्कट मुलगी हे असंच बोलणार हे नंदूलाही ठाऊक होतं. तिचं हे बोलणं आपण कितपत गांभीर्याने घ्यायचं. व्यवहार आणि जीवनादर्श हे कसे स्वीकारायचेत हा प्रश्न नंदूचा होता.

कॉफीचे रिकामे कप उचलून त्यानं आत नेऊन ठेवले. मग बाहेर आला.

बेला कसलातरी विचार करीत असावी. तिच्या चेहऱ्यावरचं गांभीर्य त्याचं जणू निदर्शक होतं.

''एऽ वेडाबाई, कसला विचार करतेस?''

''छे रे! काहीच नाही.'' हसत ती उत्तरली.

पण त्याला तिच्या हसण्यातही एक प्रकारची उदासीनता जाणवली. ते हसणं वरवरचं वाटलं.

''तुझा हा पीळदार स्वभाव. तुझ्यातलं हे स्त्रीमुक्तीचं भूत याच गोष्टी तुला असं गंभीर बनवतात. नको नको ते विचार करायला लावतात.'' तिचा हात हातात घेत, कुरवाळत, तिच्या बोटांमध्ये आपली बोटं

गुंतवत तो म्हणाला.

"विचार करणं वाईट आहे?"

त्याच्यासमोर तटस्थपणे प्रश्न ठेवीत तिनं त्याच्या हातातून आपला हात शांतपणे सोडवून घेतला. निर्विकारपणे.

"ताई, तुझ्या बाळाचे तळवे किती नाजुक आणि लुसलुशीत आहेत ग!" ताईच्या बाळाचे तळवे हळूच न्याहाळत, प्रेमानं कुरवाळत बेला म्हणाली.

"लहान मुलांचे तळवे नाजुक नसणार तर काय राठ असतील गं?"

"हंऽ ताईऽ नाव काय ठेवणार ग हिचं?"

"तूच सूचव ना छानसं नाव. तेच ठेवू."

"मी सुचविलेलं नाव तुझ्या नवऱ्याला आवडायला हवं ना!"

"नाव छान असेल तर का नाही आवडणार ग?"

"सांगू छानसं नाव —" विचार करीत ती म्हणाली, "अंऽ अंऽ दीपन्विता छान नाव आहे. तेच ठेव."

"दीपन्विता या नावाचा अर्थ काय ते सांग आधी."

"बंगाली नाव आहे. दीपन्विता या शब्दाचा अर्थ बहुतेक कालीमातेचं संध्याकाळचं रूप. मी माझ्या बंगाली मैत्रिणीला विचारून कन्फर्म करते. ओक्के?"

"हेऽ संध्याकाळच्या कालीमातेचं रूप?" ताई पोट धरून हसायला लागली.

ताईपाठोपाठ बेलाही. दोघींच्या हसण्याकडे कॉटवरचे बाळ आलटून पालटून किलकिल्या डोळ्यांनी पाहत होतं.

"बघ लबाड कसं हसतंय् ते?"

दोघींचंही हसणं ओसरलं.

ताईनं हळूच पदराआड हात नेला. मग बेलाला म्हणाली,

"बेला, फॅनचा स्पीड वाढव ग. गुदमरल्यासारखं वाटतंय्."

बेलानं फॅनचा स्पीड वाढवला. पुन्हा ताईजवळ येऊन बसली. ताईचे दोन्ही हात पदराआडच होते.

"का ग? काय होतंय्?"

"ब्लाऊज टाइट होतंय् ग. मधल्या दोन हुक्स काढल्यात."

"लठ्ठ झालीस ताई तू?"

"हंऽ"

"आत ब्रा नाही घातलीस?"

"नवीन आणायच्या आहेत. जुन्या सगळ्या घट्ट होतात. दोन-तीन नवीन ब्लाऊजंही शिवून घ्यायचे आहेत."

"बाळंतपणात हे सगळंच मेजरमेंट वाढतं का गं?"

"हेच मेजरमेंट अधिक वाढतं बाईऽ" हसत ताई म्हणाली.

तिथे दोघीच बसलेल्या असल्यामुळे त्यांच्या बोलण्यात मोकळेपणा होता.

"ताई, एक गोष्ट विचारू?"

"हंऽ"

"बाळ दूध पितं तेव्हा कसं वाटतं ग? तुझं बाळ दूध पिताना तुला कसं वाटतंय्?"

"बेलाऽ बेलाऽ काहीतरीच काय विचारतेस?" काहीसं संकोचत, टाळत ताई म्हणाली.

"एऽ सांग ना ग." दबत्या आवाजातला तिचा आग्रह.

"नाही सांगता येणार ग."

"असं काय करतेस? सांग ना!"

"तुला कळेलच ग. मी नाही सांगणार.

तू अनुभव घेतल्यानंतर मलाच सांग.''

''ताई, कन्सेप्शन राहिल्यानंतरचा नेमका अनुभव कसा असतो ग?''

''एऽ गाढव. चल चूप !'' ताईनं लटक्या रागात तिला दटावलं. ''तुला लग्न करायचं आहे का? मी सांगू का बाबांना?''

''सध्याच नको. मला वाटलं तर मीच बाबांना स्पष्टपणे सांगेन ग.''

''निर्लज्जच आहेस !'' ताईनं हसत टोमणा मारला.

''हूंऽ थोडीशी.'' नाक उडवत तिनं कबूल करून टाकलं.

टेबलावर कॉफीचे पेले ठेवून वेटर निघून गेला. कॉफीच्या पेल्याकडे पाहत दबत्या, हलक्या आवाजात बेला म्हणाली,

''मला शंका आली म्हणून डॉक्टरकडे गेले, तर माझी शंका खरी ठरली. डॉक्टरनं ते सांगितलं आणि छातीत एकदम धस्स झालंय्.''

ते ऐकून नंदूलाही क्षणभर धक्काच बसला. हे असं कसं झालं एकदम?

पेल्यातल्या फेसाळ कॉफीकडे एकटक वघत तो काहीस विचारात गढून गेल्यासारखा बसून होता. ते त्याच्या बोलण्याची वाट पाहत त्याच्याकडे पाहत होती.

तिची त्याची नजरानजर झाली. तिच्या डोळ्यांत आर्त भाव एकवटलेले होते.

''बोल ना काहीतरी. काय करता येईल?'' तशाच, दबत्या आवाजात तिनं विचारलं.

''तूच सांग ना यावर कुठला उपाय शोधता येईल?'' नंदूनं उलट तिला प्रश्न केला.

त्याच्या प्रश्नावर ती काहीशी चिडली. म्हणाली,

''मलाच विचारतोस. मी इथे तुला कशाकरिता बोलावलंय? केवळ बेजबाबदारपणानं सगळ्या गोष्टी करायच्या आणि मग परिणामांना सामोरं जायची पाळी आली की पळवाट शोधायची.''

बोलता बोलता तिचे डोळे काहीसे पाणावले. शब्द जड झाले.

कोपऱ्यातला टेबल धरून ते बसलेले असल्यामुळे त्यांचं बोलणं फारसं कुणाला कळणारं नव्हतं. शिवाय दोघंही दबत्या आवाजात, केवळ परस्परांना ऐकू जाईल असेच बोलत होते.

डोळ्यांतल्या आसवांचा थेंब तिच्या पापणीवर जमा झाला. तो कुठल्याही क्षणी गालांवरून ओघळू शकत होता.

बेलाच्या डोळ्यांत, तळाशी त्याला कधी नव्हे ते हताशपण जाणवलं.

''सॉरी बेला. आय ॲम सो सॉरी.'' टेबलवरचा तिचा तळवा आपल्या हातात घेऊन हलकेच दाबत त्यानं दिलगिरी व्यक्त केली.

नाक ओढत, खाकरत तिनं रुमालानं आपल्या डोळ्यांच्या पापण्या टिपून काढल्या. कॉफीचा पेला ओठांना लावला.

''घरी कुणाला कळलंय याबद्दल? आय मिन साधी शंका वगैरे...''

तिनं नकारात्मक मान हलविली.

''कुणाला कळूसुद्धा देऊ नकोस. तेवढी काळजी घे.''

''अरेऽ पण आज ना उद्या ते कळणारच नाऽ कळणार नाही कसा म्हणतोस? आईच्या, ताईच्या नजरेतून हे सगळं सुटणार का? शिवाय तू घरी यायला लागल्यापासून आईचं

माझ्यावर सतत लक्ष असतं. आपली मुलगी वाकडं पाऊल टाकणार नाही, याबद्दल त्यांना पूर्ण विश्वास वाटतो; आणि यातच त्यांना हे कळलं तर ते दुभंगून जातील. मलाही तोंड दाखवायला जागा राहणार नाही..'' कॉफीचा एकेक घोट घेत बेला बोलत होती.

बोलता बोलता तिचे शब्द जडावत होते. डोळे पाणावत होते.

समोर धर्मसंकट उभं ठाकल्यासारखा नंदू हतबुद्ध झाला होता. काय बोलावं, कुठला मार्ग शोधून काढावा, हे त्यालाही कळत नव्हतं.

''नंदूऽऽ''

''हंऽ बोल.''

''आपण लग्न करायचं का रे? तावडतोब?''

''तावडतोब लग्न?'' क्षणभर तो अडखळला. विचार करू लागला. कॉफीच्या रिकाम्या पेल्यावर उगीचच बोटं फिरवू लागला. गुंताळ्यातला एखादा धागा हाती यावा आणि त्याचं टोक धरून तो धागा उकलत जावा, तसं तो म्हणाला,

''बेला, आपल्याला लग्न करायचं आहेच; पण ते एवढ्या घाईगडबडीत उरकणं कठीण होईल ग. वाईट दिसेल ते. तुझ्या माझ्या चारित्र्यासंबंधी लोक शंका - कुशंका व्यक्त करतील. शिवाय आपण असं घाईघाईत का लग्न केलं, हे काही काळानंतर लोकांना कळेल तेव्हा...''

ठेचाळलेला घोडा थांबावा, तसा तो बोलता बोलता थांबला.

''मग? स्पष्ट सांग ना काय ते.''

''हे बघ बेला, आपण थोडं सबुरीनं घेऊ या. आपलं लग्न हे आंतरजातीय आहे. तुझ्याकडची मंडळी हे सगळं समजून घ्यायला तयार आहेत. त्यांचा वैचारिक स्तर तेवढा वाढलेला आहे; पण माझे आईवडील अशिक्षित-अर्धशिक्षित असे आहेत. हे सगळं त्यांना समजून सांगायचं तर त्यांच्या मनावरची जुन्या विचारांची, संस्काराची गोधडी आधी बाजूला करावी लागेल. त्यांच्या मनाची पूर्वतयारी करावी लागेल. माझ्याकरिता ते तयार होतीलही; नाही असं नाही; पण त्यांच्या मनाची तयारी व्हायला किमान काही काळ जाऊ द्यावा लागेल... सो प्लीज... तू ॲबॉर्शन करू शकशील? माझ्यासाठी? सध्या तरी तोच उपाय तुझ्या-माझ्याजवळ आहे म्हणून.''

त्यानं बेलाचा तळवा आपल्या तळव्यावर धरला होता. तिच्या तळव्याला आलेला घाम त्याच्या तळव्याला जाणवत होता.

''प्लीऽऽज तू समजून घे. तावडतोब एखाद्या गायनिकॉलॉजिस्टची अपॉइंटमेंट घे. हवं तर तुझ्या सोबत मी येईन.''

''पण त्यातून पुढं काही कॉम्प्लिकेशन्स नकोत निर्माण व्हायला.''

''छे छे. असं काही होत नाही. आपण जाऊ या. विचारू कुणाला.''

''सध्याच तू नको येऊस. मी बघते मैत्रिणीसोबत जाऊन.''

''ठीक आहे तर. मी तुला फोन करेन.''

''बेला, काय झालं ग? बरं नाही वाटत का तुला?'' बेलाला हलवून सुनीतानं विचारलं.

सुनीताच्या बोलण्यानं बेला भानावर आली: तिनं डोळे उघडले. इकडे तिकडे पाहू लागली. पेस्टिंग सेक्शनच्या एका टेबलवर

ती झोपलेली होती. तिच्या बाजूला सुनीता उभी होती.

ती टेबलवर उठून बसली. डोकं काहीसं जड वाटत होतं.

''का ग? असं काय झालं एकाएकी चक्कर यायला?''

आपण चक्कर येऊन पडलो?... बेलाला सगळं आठवलं. जाणवलं, पेस्टिंगटेबलजवळ आपलं ग्रामीण पानाचं पेस्टिंग सुरू असताना अचानक गरगरायला लागलं. डोळ्यांसमोर अंधारी आली. आणि मग काय झालं ते कळलंच नाही.

''मला इथे आणून कुणी झोपवलं ग?'' बेलानं सुनीताला विचारलं.

''इथल्या पेस्टर्सनी. हा पराते मला सांगायला धावत धावत वर आला, म्हणून मला कळलं.''

''हंऽ'' कपाळावरचा घाम पुसत तिनं निःश्वास सोडला.

''तुझ्या घरी फोन करून कळविणार होते; पण म्हटलं नकोच. उगीचच त्यांनाही काळजी वाटेल.''

''बरं झालं तू घरी फोन केला नाहीस ते.''

''का ग?'' काहीशी शंकितपणे सुनीतानं विचारलं.

एवढ्यात तिथे चहावाला पोऱ्या आला. दोघींनीही त्याच्याकडून चहा मागवून घेतला.

''काय बेलाऽ कसं वाटतंय आता?'' चीफ रिपोर्टर आबा फडणीसांनी विचारलं.

''बरं वाटतंय आबा.''

''जरा चांगलं खात-पीत जा. तुम्ही मुली डायटिंगच्या नावाखाली उपवास करीत बसताय. अर्धपोटी राहताय. काय एकेक फॅड तरी!''

आबांच्या बोलण्यावर बेला काहीशी केविलवाणेपणे हसली.

काय वाटलं असावं इथल्या लोकांना आपण असं चक्कर येऊन पडलो तर? कुणाला कुठली शंका आली असेल?

''बाई, आता कसं वाटतंय?'' पेस्टर परातेनं विचारलं.

''हंऽ बरं वाटतंय्.'' घड्याळाकडे पाहत ती जणू ओरडलीच, ''बापरे! सहा वाजले. पराते, माझं पेज तयार व्हायचं असेल ना?''

''मी केलं बाई सगळं पेस्टिंग.''

''बातम्यांचा क्रम बरोबर लावलास ना?''

''बाई, दहा वर्षांपासून हेच काम करतो. बातम्या कशा टाकायच्या, ते आपल्याला डोळे झाकूनही कळतं.''

''डोळे झाकून तर पेस्टिंग केलं नाहीस ना?'' तशातही बेलानं त्याला गमतीनं विचारलं,

''नाही बाई, आबांनी पाहिलं, ते म्हणाले, छान केलंस.''

''बेलाऽ आता सरळ घरी जा आणि विश्रांती घे आणि भरपूर जेवत जा. डायटिंगचं भूत डोक्यातून काढून टाक.'' वडिलकीच्या अधिकारानं आबा फडणीस म्हणाले.

आबा फडणीसांच्या बोलण्यावर तिनं मान हलविली. टेबलवरून खाली उतरत ती सुनीताला म्हणाली,

''चल, तुझ्याशी बोलायचं आहे.''

सुनीता तिच्यासोबत तिथून बाहेर आली. पॅसेजमधून निघताना हळूच बेलानं सुनीताला विचारलं,

''सुनीता, नंदूचा फोन आला होता का ग?''

''नाही तर. का?''

— आणि दुसऱ्याच क्षणी सुनीताच्या डोक्यात प्रकाश पडला.

''बेलाऽ तर हे असं आहे तर?''

''एऽ हळू बोल.'' चालता चालता बेलानं तिच्या दंडाला चिमटा काढला.

सकाळी साडे-आठ नऊच्या सुमारास बेला स्कूटर घेऊन सुनीताच्या घरी आली तेव्हा सुनीता सज्ज होती. दोघीही स्कूटरवर बसून नंदूच्या घराकडे जायला निघाल्या.

''बेला, काही खाल्लं नाहीस ना?''

''नाही ग. फक्त चहाच घेतला बाई. खरं तर रात्री नीटसं जेवणही झालं नाही. शिवाय आज दिवसभर अन्नपाण्यावाचून राहावं लागेल.''

''पाच-सहा तासांचाच तर प्रश्न आहे ग.''

''हूंऽ खरं सांगू सुनीता, आज निघताना मी मुद्दामच स्कूटरला जोरजोरात किक् मारली. म्हटलं, अशा किक् मारण्यानं तरी अ‍ॅबॉर्शन होईल.''

''वेडी आहेस का ग?''

चौकातून एक वळण घेऊन बेलानं स्कूटर नंदूच्या घराजवळ थांबविली. स्कूटर पार्क करून दोघीही त्याच्या रूममध्ये आल्या.

मोठी सूटकेस समोर ठेवून नंदू पायात बूट घालत होता.

''अरेऽ तू? ये ये. बैस.''

''तू कुठे निघालास रे?''

''अगं ऽ पुण्याच्या एका मित्राचा काल रात्री फोन आला होता. तो आणि मी, असं दोघांच्या छायाचित्रांचं प्रदर्शन भरवायचं आहे. त्यानं परवापासून जहांगीर आर्ट गॅलरीतला हॉल आठ दिवसांसाठी बुक करून ठेवलाय !''

त्याचं बोलणं ऐकून बेला निरुत्तर झाली. तोच पुढे बोलत होता:

''काल तुला घरी चारदा तरी फोन लावला असेन मी. दोन-तीनदा तर एंगेज्डच लागला. मग तुझ्या आईनं घेतला, तर तू गाढ झोपली होतीस म्हणे. अकरा वाजलेले होते. खरं तर एवढ्या उशिरा फोन केल्यामुळं मलाच अपराध्यासारखं वाटत होतं. तुझ्या आईनं नाही सांगितलं.''

''नाही. खरं म्हणजे मी उशिरा झोपून उठले आज. तयार झाले आणि सरळ इकडेच आले.''

''कमाल आहे ! मी फोन केला होता. एवढा निरोप तर तुला द्यायला हवा होता.''

नंदूच्या बोलण्यात नाराजीची कडा होती. त्यांचं बोलणं सुरू असताना सुनीता समजूतदारपणे गॅलरीत येऊन उभी राहिली.

''तुला आजच जायला हवं का रे? खरं म्हणजे आज मला तुझी गरज आहे. आधाराकरिता का होईना, तू माझ्याजवळ हवा आहेस.''

''मलाही तेच वाटतंय् ग. तुला असं सोडून जायचं जिवावर येतंय् ग. पण त्या वेड्यानं लागलीच सगळी व्यवस्था करून ठेवली. नंतर सहा महिने तिथला हॉल मिळणार नाही, म्हणे. माझं बोलणं खोटं वाटतंय्?

''सहा महिने म्हणजे खूप होतात. यावेळी मिळणारं यश पुढच्या सहा महिन्यांनी मिळेलही; पण मग या क्षेत्रात मी सहा महिन्यांनी मागे पडेन उगीचच. हातातली ही संधी विनाकारण वाया जाईल.''

''विनाकारण?'' काहीसं दुखावल्या-



अनुक्रमणिका







सारखं तिनं विचारलं.

"विनाकारण म्हणजे तसं नव्हे ग. मी तिकडे जातोय म्हणून तुझ्याविषयीची ओढ, प्रेम कमी होईल का? अं? तू तर मला हवी आहेसच. सुनीताला मी सगळं सांगतो. ती तुझी काळजी घेईलच." बोलता बोलता त्यानं तिला थोपटलं.

"परत कधी येशील?"

"ताबडतोब, मुंबईहून तुला वारंवार फोन करेन. प्लीऽज मला समजून घे."

"ठीक आहे."

"काही पैसे हवेत?"

"नको. माझ्याजवळ भरपूर आहेत."

दुपारी अडीच-तीनच्या सुमारास बेलानं डोळे उघडले. डोळ्यांवर झापड होतीच. पापण्या जड वाटत होत्या. सुस्त वाटत होतं. किलकिल्या डोळ्यांनी तिनं सुनीताकडे पाहिलं.

"सुनीताऽ" क्षीण आवाजात तिनं हाक मारली.

"बेला, तू शांतपणे पडून राहा. मी इथेच आहे." तिच्या कपाळावर हात ठेवत, कुरवाळत सुनीता म्हणाली.

"मी कुठे आहे ग?" तिचा काहीसा नेणीवयुक्त प्रश्न.

"हॉस्पिटलमध्ये. आपण सकाळी आलो नाहीत का ग दोघी?"

"हंऽ नंदू नाही आला ग? तो कधी येणार आहे?"

"तो पुण्याला गेलाय. तू झोप बरं."

सुनीतानं तिच्या पापण्यांवर हलकेच आपला तळवा ठेवला. तशा बेलानं आपल्या पापण्या मिटवल्या. तिची स्पंदनं संथपणे सुरू होती. चेहऱ्यावर निर्विकार भाव होता.

कुठल्या अपेक्षेनं ही या मर्यादेपर्यंत आली? ही लक्ष्मणरेषा ओलांडताना हिला भीती नाही वाटली? की नंदूनं सहजपणे घेतलं आणि या वेडीनंही स्वतःला त्याच्या स्वाधीन करून दिलं? तो दगा देणार नाही या विश्वासानं? नंदू नाही दगा देणार हिला? हिनं घेतलेला तो पहिला अनुभव कसा असेल? उत्कट? दुःखद? बीभत्स? की भीतीप्रद?...क्षणभर तीही शहारून आली. आतून झंकारून उठली.

सुनीतानं बेलाच्या कपाळावरून पुन्हा कनवाळूपणे हात फिरवला.

एवढ्यात डॉक्टर राऊंडवर आली. बेलाच्या कॉटजवळ आली. सुनीता काहीशा अदबीनं उभी राहिली.

"डोळे उघडले होते का हिनं?"

"हूंऽ पाच मिनिटांपूर्वीच."

"सगळं ठीक झालंयू. आता कसलीच भीती नाही."

डॉक्टरनं बेलाच्या कपाळावर हात ठेवला. नाडी पाहिली

हूंऽ टेम्प्रेचरही नॉर्मल आहे. सुनीताकडे पाहत डॉक्टर म्हणाली, "तुम्ही कशा ग मुली अशा फशी पडता. एवढी सगळी साधनं उपलब्ध असताना गावंढळ बायांसारखे व्यवहार करता? तुम्हाला तर सगळंच कळतंय ना? मग कळून सवरून असं आंधळं बनायचं?"

त्यावर सुनीता काय बोलणार? डॉक्टरचं बोलणं ती मुकाट्याने ऐकून घेत होती.

"तू हिची बहिण का?"

"नाही. मैत्रीण."

"तो कोण मुलगा आहे ते तुला ठाऊक

आहे ना?''

''हं.''

''त्या बावळटाला सांग जरा काळजी घ्यायला. नाहीतर लग्न करायला सांग या दोघांना. हिलाही नीट समजावून सांग.''

सुनीतानं होकारार्थी मान हलविली.

''आलात कशा तुम्ही?''

''स्कूटरनं. हिला आता स्कूटर चालवता येणार नाही ना?''

''नाही. तू चालवायचीस. हळू चालवायची. प्रिस्क्रिप्शन सिस्टर सांगेलच. बिल काऊंटरवरच पे करायचं.''

तो म्हणाला होता, फोन करून चौकशी करेन, पण तीन दिवस उलटून गेलेत तरी त्याचा फोन नाही. आपण फोन करायचा तर कुठे? त्याला साधा फोन करायलाही वेळ मिळू नये? इतका कशात गुंतून पडला तो? की मुद्दामच त्यानं फोन केला नसावा? हा हतविनिमयच ठरणार का काय? दिले हिरण्मय, हाती मृण्मय... त्याच्यावर केलेल्या प्रेमातून शेवटी हातच काळे होऊन निघणार का?...

सैलसर बांधलेल्या वेणीशी चाळा करीत ती अस्वस्थपणे बसून होती. आपल्या खोलीत. या तीन दिवसांत ती जाणीवपूर्वक घरच्या माणसांना टाळत होती. वरवरचं, कोरडं बोलत होती. किंवा बोलणंच टाळत होती.

तिचं हे वागणं घरच्यांच्या नजरेतून तरी कसं सुटावं? तिची पाठ वळताच तिच्या या वागण्यावर घरच्यांच्या प्रतिक्रिया उमटत होत्या. पण त्यासंबंधी बोलणार कोण? विचारणार कोण तिला? शेवटी ताईनं तिला विचारायचं ठरवलं. तिला असं एकटं बसलेलं पाहून तिच्याजवळ येत ताईनं विचारलं.

''का ग बेला? काय झालं?''

ताईच्या विचारण्यानं ती काहीशी दचकली. मुळापासून वेल हलावी, तशी; पण सावरत म्हणाली,

''कुठं काय? काही तर नाही ग?''

''मनातलं लपवते आहेस तू? हे बघ, मी तुझ्यापेक्षा फक्त दोन वर्षांनीच मोठी आहे. म्हणजे मैत्रीणच समज. काय झालं ते स्पष्टपणे, मोकळेपणानं सांग.''

तरीही ती नि:शब्दच होती. विचार करीत असावी, मनातली खळबळ कशी सांगावी? सांगावी की न सांगावी?

तिनं दीर्घ श्वास घेतला. उगाचच. ताईच्या नजरेला भिडलेली नजर तिनं दुरीकडं वळवली.

''बेला, कुणाच्या प्रेमात पडलीस काय ग?'' ताईचं बोलणं वरवर मस्करीचं वाटत असलं तरी त्या विचारण्यामागची भावना खरी होती.

बेलानं ताईकडे पाहिलं. ताई गालातल्या गालात हसली. बेला थंडपणे म्हणाली,

''प्रेमात पडले होते ग; पण आता ते सगळं खोटं वाटायला लागलंय. वाटतं, ते प्रेम नव्हतं; तर प्रेमाच्या नावाखाली कुणीतरी आपल्या भावनांशी खेळत होतं. कुणीतरी आपला उपयोग करून घेत होतं. त्यातल्या खरेपणाचा मुखवटा कधीच गळून पडला...''

''कोण आहे तो? नंदू?'' ताईनं अंदाज व्यक्तविला.

''हंऽ''

''कुठंपर्यंत आलंय हे? म्हणजे मर्यादा...''

''त्याचं काय ! त्यातून बाहेरच पडायचं










ठरविलं तर मागच्यां पाऊलखुणा मुळापासून मिटवून सगळं स्वच्छ करायला नको?''

''नंदू तसा चांगला मुलगा आहे ग? नेमकं कुठं बिनसलंय तुमचं? प्रेमातली भांडणं असतील तर ती आज ना उद्या मिटतीलच. ती अशी ताणून धरण्यात काही अर्थ नाही. विचार कर.''

''पुरुष म्हणून सगळे चांगलेच असतात ग? मी त्याच्यात त्याच्यापुढचं काहीतरी शोधत होते. सामान्य माणसांपेक्षा तो कुठे वेगळा ठरतो ते. त्याचं वेगळेपण सुपरनॅचरल नको आहे मला.''

तिच्या बोलण्यावर ताई क्षणभर थांबली. विचार करू लागली.

त्यांच्या या व्यवहारात ती तरी काय बोलणार होती? चार शहाणपणाच्या, अनुभवाच्या गोष्टी सांगण्यापलीकडे?

''ताई, आई-बाबांना संशय आला का ग माझा?'' मनात खुपणारा प्रश्न तिनं विचारला.

''त्यांची खात्री पटली तू कुणाच्या तरी प्रेमात पडलली असावीस म्हणून.''

त्यावर बेला केविलवाणी हसली. स्वत:चीच कीव करावी, तशी.

रात्री साडेदहा वाजता मुंबईहून नंदूचा फोन आला, म्हणून ताईनं बेलाला तिच्या खोलीत फोन आणून दिला.

''हंऽ नंदूचा फोन आहे मुंबईहून.''

''आई-बाबा काय करताहेत?'' फोन घेत तिनं विचारलं.

''झोपलेत. मधल्यामध्ये तुझा फोन कुणी घेणार नाही.'' हसत ताईनं टोमणा मारला आणि ती आपल्या खोलीत निघून गेली.

''हॅलोऽ बेला बोलतेय.''

''बेला, मी नंदू. अगं अर्ध्या तासापासून प्रयत्न करतोय; पण लाइनच मिळत नव्हती. दोन-तीन दिवस तुला फोन करायला सवडच मिळाली नाही. परवा कल्चरल मिनिस्टरच्या हस्ते प्रदर्शनाचं उद्घाटनं झालं. छान रिस्पॉन्स आहे. माझ्या फोटोग्राफीचं अनेक जाणकारांनी कौतुक केलं. हुसेनसाहेबांनी भेट दिली तेव्हा आकाश दोन बोटं जवळ असल्याचा आनंद झाला. तुला जे फोटो आवडले नव्हते नाऽ ते हुसेनसाहेबांना खूप आवडलेत. खूप कौतुक केलं त्यांनी माझं.''

''अभिनंदन!'' तिच्या तोंडून कोरडा स्वर बाहेर पडला.

''थँक्स. तू कशी आहेस? बरी आहेस ना? इथे फोन करणाऱ्यांची बरीच रांग आहे. टेलिफोन बुथवरून बोलतोय. तीन तारखेला येतो. मग खूप बोलू.''

आणि पलिकडून फोन बंद झाल्याचा आवाज आला.

तिनंही फोन ऑफ केला आणि बाजूला ठेवून दिला.

ताई म्हणाली, तुझा फोन मधल्यामध्ये कुणी घेणार नाही. फोन न घेण्यासारखं असं काय होतं? तो स्वत:चंच कौतुक सांगत होता. स्वत: विषयीच मोठ्या उत्साहानं बोलत होता. शेवटी उपचार म्हणून विचारतो - बरी आहेस ना?

त्याच्या बोलण्याचं तिला हसायला आलं. फोनकडे पाहत ती विषण्णपणे हसली.

तो परतल्यानंतर तरी काय? हेच बोलेल. हे असंच सांगत राहील. आपण जिच्याजवळ हे सगळं बोलतो आहे, तिला काही विचारायला हवं. आपल्यामुळं ती एका

दिव्यातून गेलेली आहे. याची त्याला जाणीव तरी असेल? एखाद्या दुसऱ्या वाक्यापुरती तो आपल्या संदर्भात चौकशी करेल.

मोकळ्या केसांमध्ये बोटं फिरवत ती तशीच बसून होती. काहीशी हतप्रभ झाल्यासारखी.

टेबलवर समोर पडलेली आजची डाक फोडत, ग्रामीण वार्तापत्र नीट लावत बेला बसली होती. सुनीतानं येता बरोबर तिची चौकशी केली. खरं म्हणजे बेला आज नेहमीपेक्षा उशिराच आली होती. संपादक विभागात येताना टेलिफोन ऑपरेटरनी निरोप दिला होता, तासापूर्वी नंदूचा फोन आला होता म्हणून. पण त्यावर तिनं कुठलीही प्रतिक्रिया व्यक्त केली नव्हती.

बाजूच्या टेबलवरून सुनीता म्हणाली,

"नंदूच्या छायाचित्रप्रदर्शनाची बातमी आलीय ग फोटोसह माझ्या टेबलवर. दाखवू का?"

"नकोऽ छापून आली की वाचेनच. बातमी छान विस्तृत असेल."

"जशीच्या तशी छापली तर तीन कॉलमची तरी होईल."

बेला हसली उगीचच. मग ग्रामीण वार्तापत्र चाळू लागली. अमरावती जिल्ह्यातली बातमी होती. 'प्रेमभंगामुळं युवतीची आत्महत्त्या.' तिनं बातमी वाचून काढली. अमरावतीच्या जिल्हा प्रतिनिधीची ती बातमी होती. त्या प्रतिनिधीच्या बातम्यांना अग्रक्रम द्यायचा. असा वरून आदेश होता. म्हणून ती बातमी ताबडतोब पुन: लिहायला घेतली. एवढ्यात तिच्या टेबलवरचा फोन वाजजला. तिनं रिसिव्हर उचलला.

"हॅलोऽ"

"मी नंदू बोलतोय. बेलाच ना?" पलीकडून आवाज आला.

"हूं बोलतेय."

"अगं मी मघासुद्धा फोन केला होता, तर ऑपरेटर सांगत होती, तू यायची आहेस म्हणून."

"कळलंय मला."

"अशी कोरडी कोरडी काय बोलतेस नीरस माणसासारखी. मधल्या दिवसांत तुझी किती आठवण येत होती ! किती दिवस झालेत आपली भेट झाली नाही. घरी ये आज. मी वाट पाहतोय्."

तिला त्याच्या बोलण्यात नको तो अधिकार, नको तो अहंकार जाणवला.

"नाही जमणार."

"मग उद्या ये. नक्की ना?"

"आता आपण एकमेकांना भेटू नये. माझ्याकडून मी सगळं संपवलंय. जे घडलं, ते अपघात म्हणून. विसरून जायचं. मी विसरले."

"बेला काय बोलतेस तू? शुद्धीवर आहेस का?" त्याचा पलीकडून संतप्त सूर.

"म्हणूनच बोलतेय्. या दिवसांत जे जाणवलं, जे शहाणपण आलं, त्यानं माझे डोळे उघडले. तुझ्या माझ्या वाटा आता भिन्न आहेत, असं समज."

"असं कसं बोलतेस ग? आपलं काय ठरलं होतं? माझं काही चुकलं का?"

"चुकलं कुणाचचं नाही; पण पुढच्या चुका टाळण्यासाठी आताच हे सगळं विसरणं आवश्यक वाटतं मला. नाहीतरी तुला - मला त्याचा खूप त्रास होईल. ओक्के ! ठेवते !"

आणि तिनं रिसिव्हर ठेवून दिला.



अनुक्रमणिका







समोरच्या वार्तापत्रावरून तिला बातमी तयार करावयाची होती.

एवढ्यात फोन वाजला. रिसिव्हर उचलला. पलीकडून आवाज आला.

''हॅलोऽ बेला का? मी नंदू-''

कुठलाही प्रतिसाद न देता तिनं फोन डिस्कनेक्ट केला.

सुनीता तिच्याकडे पाहत होती. एकटक. तिला सगळे संदर्भ ठाऊक होते, म्हणूनही.

बेला बातमी लिहू लागली, तसा पुन्हा फोन वाजला. फोन नंदूचाच असावा. म्हणून तिनं मुद्दाम उचलला नाही. तो तसाच वाजत होता. शेवटी सुनीतानं रिसिव्हर उचलला. पलीकडून त्याचाच आवाज आला. माऊथपिसवर हात ठेवून सुनीता म्हणाली,

''नंदूचाच फोन ग. काय सांगू?''

बेलानं पुन्हा फोन डिस्कनेक्ट केला. मग हातात रिसिव्हर घेऊन ऑपरेटरचा नंबर डायल करीत ती म्हणाली.

''मी बेला बोलतेय. नंदूचा फोन आला तर त्याला सांग, ती फोन घेत नाही म्हणून.''

— आणि तिनं रिसिव्हर शांतपणे ठेवून दिला.

□

प्रा. डॉ. रवींद्र शोभणे
२६, पंचदीपनगर, कोकाकोला
फॅक्ट्रीमागे, वर्धा रोड,
नागपूर ४४० ०२५.

---

## स्वागत

- **इतिशोध :** सुरेश जोशी, पद्मगंधा प्रकाशन, पुणे. पृष्ठे १७२
- **लोकसाहित्य बदलते संदर्भ, बदलती रूपे :** डॉ. गंगाधर मोरजे, पद्मगंधा प्रकाशन, पुणे. पृष्ठे १५५
- **चित्रकथी :** व्यंकटेश माडगूळकर, पद्मगंधा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ११६
- **महाराष्ट्राची मानचिन्हे :** एकनाथ साखळकर, सुभाष भेण्डे, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठे २९३
- **साहित्य समीक्षा आणि आस्वाद :** डॉ. दादा गोरे, प्रतिमा प्रकाशन, पुणे. पृष्ठे १३४
- **ग्रामीण वाङ्मयाचा इतिहास :** प्रा.चंद्रकुमार नलगे, सुरेश एजन्सी, पुणे, पृष्ठे २४०,
- **आशयवेध :** डॉ.स.त्र्यं.कुळी, विजय प्रकाशन, नागपूर. पृष्ठे १६८
- **म. ज्योतिराव फुले आणि विष्णुशास्त्री चिपळूणकर :** प्रा. गजमल माळी, राजमुद्रा प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे २१६
- **निव्वळ जिद्दीतून :** सविता भावे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे. पृष्ठे १८७
- **घाशीराम कोतवाल :** शामला वनारसे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ११४
- **शाकुंतल शैली शास्त्रीय अभ्यास :** डॉ. वामन के. लेले, इतिहास पत्रिका प्रकाशन, ठाणे, पृष्ठे २०
- **अतातो मृत्यू जिज्ञासा :** प्रभाकर अडसुळे, प्रकाश कुमार इंदुर, पृष्ठे ४०८



अनुक्रमणिका







# व्यामिश्र अनुभवांची मांडणी / रवींद्र शोभणे

*एखाद्या निर्मितीशील लेखकाने कथालेखनासंबंधी (किंवा एकूणच लेखनासंबंधी भूमिका मांडणे, आपल्या कथेसंबंधी बोलणे, ही त्या त्या निर्मितीच्या नंतरची त्या लेखकाची गरज ठरत असेल, तर ती निर्मितीच्या प्रक्रियेतच पूर्ण होत नाही का? की निर्मितीप्रक्रियेतून जे सुटून गेलेले असते, प्रत्यक्ष निर्मितीच्या बेहोषीत ते सापडलेलेच नसते, म्हणून त्याचा मग त्याच अंगाने, पण नव्याने तटस्थपणे काही विचार मांडता येतो? किंवा या अंगाने लेखक कळत न कळत आपल्या निर्मितीप्रक्रियेचा झाडा घेत असतो?*

*माझ्या 'तद्‌भव' या कथेसंबंधी लिहिताना सर्वप्रथम माझ्यासमोर हे प्रश्न आहेत. अर्थात या प्रश्नांची उत्तरे शोधणे हाच ह्या लेखनामागचा एक भागही असू शकतो. म्हणून उपर्निदिष्ट प्रश्नांना काहीसे होकारार्थी उत्तर देऊन पुढे जाणे मी उचित समजतो.*

*'तद्‌भव' ही माझी कथा १९९६च्या 'विशाखा'च्या दिवाळी अंकात सर्वप्रथम प्रकाशित झाली.*

*'वर्तमान,' 'दाहीदिशा' आणि 'शहामृग' या तिन्ही कथासंग्रहातील कथांना समोर ठेवून जेव्हा मी सर्वप्रथम माझ्या जाणिवांची तपासणी करू पाहतो, माझ्या अनुभवाची जात कुठली याचा विचार करू लागतो, तेव्हा माझ्या लक्षात आवर्जून एक गोष्ट येते-ती म्हणजे माझ्या अनुभवाची जात, ते स्वीकारण्याची प्रक्रिया ही खूपदा गुंतागुंतीची होऊन बसते. एखादा अनुभव जेव्हा मला स्पर्शून-भेदून जातो, तेव्हा खूपसा अस्पष्ट-कंगोरेहीन स्वरूपाचा असतो. त्यात निर्मितीचे बीज असल्याची खात्री पटलेली असते; पण पुढची दिशा मात्र केवळ अस्पष्ट असते. तो विषय कुठेतरी टिपून ठेवण्यापलिकडे मग त्याला फारसे स्थान नसते.*

*ही अशी टिपणं मग मधून मधून चाळताना, त्याची प्रसरणशीलता तपासताना कळत नकळतपणे एखादा दिवा लुकलुकतो. एका दिव्यापाठोपाठ दुसरा, तिसरा. कधी क्षीण तर कधी तेजाळलेला. मग हळूहळू पुढची वाट दिसू लागते. काही पाऊलखुणा स्पष्ट होऊ लागतात. अर्थात हे सगळं घडतं ते लेखन प्रक्रियेपूर्वी आणि लेखनप्रक्रियेअंतर्गत त्या अनुभवाच्या अनेक कडा स्पष्ट होऊ लागतात. मूळ अनुभवधारणेच्या वेळी ज्याचा अदमासही आलेला नसेल, असेही कंगोरे स्पष्ट होऊ लागतात.*

*प्रत्येकच अनुभव या दृष्टीने स्वीकारार्ह असतो का? किंवा स्वीकारलेला प्रत्येकच अनुभव असा अनेकविधी कंगोऱ्यांसह नंतर गोचर होतो का? याला नकारात्मकच उत्तर द्यावे लागेल. कारण ही बाब प्रत्येक लेखक कलावंताच्या प्रकृतीधर्मावर जशी अवलंबून असते तशीच ती वाचनाचा संस्कार, चिंतन-मननाचा मगदूर आणि अनुभवाला सामोरे जाण्याची कुवत यावरही अवलंबून असते. एखादा अनुभव यादृष्टीने प्रेरक असेलही; परंतु त्यात अंतर्भूत असलेली व्यामिश्रता, त्याद्वारे व्यक्त होणारा जीवनविषयक दृष्टिकोन इत्यादी घटक नीटपणे पकडता आले नाही तर त्या प्रकाशापलीकडे केवळ निबिड अंधारच जाणवतो. किंवा डोळे दिपवणाऱ्या दूरवरच्या प्रकाशाकडे जातानाही केवळ चाचपडावे लागते, ठेचाळावे लागते; प्रसंगी माघारीही वळावे लागते. म्हणून*

आपला पिंडधर्म जसा असेल तशाच अनुभवाला भिडणे, त्याचे विच्छेदन् करणे आणि त्यातून नंतर एकसंध अर्थ शोधणे अधिक उचित ठरते.

या अशा प्रवासात एखादी कथा लिहिताना मला जर पुढचे स्पष्ट दिसत नसेल काही अर्थपूर्ण असे हाती लागत नसेल, तर मी ती कथा तशीच, अर्धवट ठेवून देतो. त्यादृष्टीने नंतर कधीतरी काही कवडसे जाणवू लागले की मग पुन्हा तिकडे वळतो.

'तद्‌भव' ही या अशाच प्रक्रियेतून जन्मलेली कथा आहे. काही पाने लिहून ती कथा वर्षभर तशीच पडून होती. वर्षानंतर त्या विषयाचे काही पैलू-काही घटक-गोचर होऊ लागले आणि मग ती कथा लिहून पूर्ण झाली.

या कथेकडे जेव्हा मी आज तटस्थपणे पाहतो तेव्हा या कथेतून व्यक्त होणाऱ्या अनुभवाचा पोत हा एकपदरी निश्चितच नाही. तो तीनपदरी किंवा त्रिस्तरीय स्वरूपाचा आहे, हे प्रथमत: जाणवते. पहिला स्तर- प्रसिद्धीमाध्यमे-त्यांचा मानवी जीवनाशी, जगण्याशी, सुखदु:खाशी असलेला संबंध. कला म्हणून या जीवनाची या माध्यमासाठी ठरणारी उपयोजिता आणि त्यापरीने उपयोग करून घेणारा व्यवहारी दृष्टिकोन. दुसरा स्तर हा आजच्या मुलींचा. विशेषत: या क्षेत्रातील मुलींचा स्त्री-पुरुष संबंधाकडे, लैंगिकतेने पाहण्याचा मुक्त दृष्टिकोन आणि तिसरा स्तर म्हणजे या मुक्त लैंगिक दृष्टिकोनाच्या परिणामांतून, त्या अनुभवाच्या आचेतून येणारी स्त्रीस्वत्त्वाची मूलभूत जाणीव. हे तिन्ही दृष्टिकोन या कथेत एकजीव झाल्यामुळे अनुभवाची व्यमिश्रता अधिक गहिरी व्हायला मदत झाली.

'तद्‌भव'मधील नंदू आणि बेला हे आजच्या व्यमिश्र जीवनाचे प्रतिनिधी ठरतात. प्रारंभी पुरात वाहून गेलेले गाव, त्यानुषंगाने तिथे येणारी प्रसिद्धीमाध्यमे, त्यांचे प्रतिनिधी, नंदूची फोटोग्राफी आणि त्यातून त्यानं 'दि फ्लड' म्हणून भरविलेले छायाचित्रप्रदर्शन इथे प्राधान्याने नंदूचं व्यक्तिमत्त्व, त्याचा कलावंत म्हणून कलाविषयक बरावाईट दृष्टिकोन, त्याला सतत बसणारा बेलाचा छेद इत्यादींमधून व्यक्त होतो तो नंदूमधील व्यवहारी पुरुष, व्यवहारी कलावंत. एका अर्थाने हे व्यक्तिमत्त्व पूर्णपणे विकसित आणि परिपूर्ण असे आहे; तर त्याउलट बेलाचे व्यक्तिमत्त्व हे खूपसे विकसनशील आहे. यात जे घडलं जातं, त्यामागे तिच्या व्यक्तिमत्त्वाचे पदर घट्टपणे बांधलेले आहेत. लैंगिक संबंधांकडे पाहण्याची मुक्तदृष्टी, काहीशी भावुकता आणि नंतर अनुभवाच्या आवर्तनातून परिष्कृत होणारी 'स्व'त्वाची भावना-पुरुषी अहंकार आणि स्त्रीचं करारीपण हे सगळे आयाम या कथेला प्राप्त होतात. बेला सहजपणे गर्भपात करवून घेते. या घटनेतून तिचं जमिनीवर येणं, जमिनीवर असणं अधिक प्रकर्षानं प्रतीत होते. इथे ती विवाहपूर्व अपत्याची - मातृसत्ताक समाजव्यवस्थेची रंगीबेरंगी पंख लावलेली बंडखोरी स्वीकारत नाही; किंवा तशी भाषाही बोलत नाही. या कथेतील अनुभवाचं मुळात रुजणं इथे अधिक गहिरं होतं. वास्तव होतं.

व्यमिश्र अनुभवांची मांडणी करणारी, त्या अनुभवांना अधिक गोचरत्त्व देऊ पाहणारी, अशी ही कथा मला भावते, मी त्याकडे अतीव अपत्यभावनेनं पाहतो, ते यामुळेच.

□

# एका बीजापोटी

□

सुबोध जावडेकर

□

तुफान पाऊस कोसळत होता. अंधारून आलं होतं. दुपारची वेळ असूनही तिन्हीसांजा झाल्यासारखं वाटत होतं. पावसाच्या अखंड चाललेल्या रपरप आवाजाची गुंगी चढत होती. दारंखिडक्या बंद होत्या; पण फटीतून घुसणारी ओली झुळूक अंगावर शिरशिरी आणत होती.

पण या सगळ्या वातावरणाची डॉक्टर श्रीनिवास रायकरांना दादफिर्याद नव्हती. एकाग्र मुद्रेने ते समोरच्या उपकरणाला डोळा लावून बसले होते. त्यांच्या हातातल्या कागदावर ते कसल्यातरी नोंदी करत होते. पुन्हा उपकरणाची बटणं पिरगाळत होते. पुन्हा काही तरी लिहून घेत होते. त्यांच्या सगळ्याच हालचाली इतक्या यांत्रिकपणं होत होत्या, की ते समोरच्या यंत्राचाच भाग आहेत, असं भासत होतं.

'कर्रर्रर्रऽ!...' दारावरची घंटा वाजली.

डॉक्टरांच्या समाधीचा भंग झाला नाही. त्यांना तो घंटेचा आवाज ऐकूच गेला नसावा आपल्या कामात ते गर्क होते.

'कर्रर्रर्र!..' पुन्हा आवाज आला.

डॉक्टर रायकर किंचित चाळवले. वर डोकं करून त्यांनी आतल्या खोलीच्या दिशेनं एक त्रासिक कटाक्ष टाकला.

'हा लेकाचा सदाशिव काय झोपलाविपला तर नाही?' त्यांच्या मनात विचार आला. मग त्यांना आठवलं. काही तरी कामानिमित्त त्यांनीच सदाशिवला बाहेर पाठवलं होतं.

'कर्रर्रर्रर्रर्र!...' यावेळी आवाज खूपच लांबला.

बाहेर जो कोणी होता, त्याची आणखीन थांबायची तयारी नव्हती.

रायकर चरफडत उठले. त्यांचा गोरा गुलाबी चेहरा आता लाल झाला होता. भुवयांच्या मधोमध आठी पडली होती. डोळ्यांत संताप मावत नव्हता. दोन-तीन टांगातच त्यांनी दार गाठलं आणि खाडकन कडी काढून सताड उघडलं.

दाराबाहेर एक तरुण स्त्री उभी होती. साडी नेसली होती, म्हणून तिला बाई म्हणायचं. पण चणीनं ती एखाद्या शाळकरी मुलीसारखी दिसत होती. चिंब भिजली होती. तिच्या केसांवरून पाण्याचे थेंब ओघळत होते. कुंकू फिसकटलं होतं. हातातली पर्स छातीशी धरून ती स्वत:ला ऊब आणण्याचा प्रयत्न करत होती. एखाद्या भिजलेल्या चिमणीसारखी ती रायकरांना वाटली.

"चालत्या व्हा!" रायकर गुरकावले.

"प्लीज...जरा आत येऊ का?"

तिचा आवाज विलक्षण गोड होता; पण



अनुक्रमणिका





त्यात आर्जवापेक्षा आग्रह जास्त होता. रायकर काहीसे चमकले.

"मला काही विकत घ्यायचं नाहीये."

"पण मी कुठं म्हणाले तसं? मी काही विकायला आलेच नाही मुळी. मला आत तर येऊ द्या. बाहेर किती गारठा आहे! शिवाय असं दार उघडं ठेवलं, तर पाणी आत येतंय."

"अं? " रायकर म्हणाले. मग स्वतःच्या नकळत ते दारातून दूर झाले.

चटकन आत येऊन त्या मुलीनं दार आतून बंद करून घेतलं.

"तुम्ही कोण? मला न विचारता माझ्या घरांत कशाला घुसताय?"

"रबिश! घुसायला काय मी चोर-दरोडेखोर आहे? जोरात पाऊस पडतोय, म्हणून जरा आडोशाला आले, झालं."

"पण तुम्ही आहात कोण?"

"माझं नाव सुचेता... आणि मला 'अहोजाहो' म्हणायची गरज नाही. तुमच्या मुलीएवढी असेन मी." सुचेता प्रसन्नपणे हसली.

"हे बघा, मला मुलगी नाही, आणि तुम्हाला असं लाडांत यायचं कारण नाही."

"हं! तुम्हाला मुलगी नाही, ते माहीत आहे मला. आणि मी लाडात काय आले हो? तुम्हाला हवं तर 'अहोजाहो' करा. माझं काय जातंय? पण एवढ्या मोठ्या शास्त्रज्ञाच्या तोंडून 'अहोजाहो' येणं जरा चमत्कारिक दिसतं, म्हणून म्हटलं..." सुचेता आपल्या साडीचा पदर पिळून त्याच्या टोकानं तोंड पुसून घेत म्हणाली.

रायकर दचकले.

"मी कोण आहे, ते माहीत आहे तुला... आपलं... तुम्हांला?"

"हो! तुम्ही डॉक्टर रायकर. जेनेटिक्सच्या क्षेत्रातले प्रसिद्ध शास्त्रज्ञ. सजीवांची उत्पत्ती आणि वाढ या विषयावर तुम्ही संशोधन करताय्. बरोबर ना?"

"तुला कुणी सांगितलं?"

सुचेता खळखळून हसली.

"सांगायला कशाला पाहिजे? या दोन-चार मैलांच्या परिसरात तुमचाच एक बंगला आहे, ते माहीत होतं मला... एखादा टॉवेल मिळेल का?"

"नाही मिळणार. आणि माझ्या प्रश्नाचं उत्तर दे. तू माझा फोटो कुठं पाहिलास?" डॉक्टरांनी करड्या आवाजात विचारलं.

"नाही. फोटो नव्हता कधीच पाहिला. तुम्ही स्वतःचा फोटो काढू देत नाही ना?"

"मग तू कसं ओळखलंस, की मीच तो, म्हणून?"

"कपाळ माझं! त्यात ओळखायचं काय? तुमच्या बंगल्यात तुम्हीच नाही राहणार, तर दुसरं कोण राहत असणार?... टॉवेल... नाहीतर एखादा नॅपकिन तरी द्याल?"

रायकरांनी जवळचा नॅपकिन उचलून सुचेताकडे फेकला. तिनं तो पटकन झेलला.

"थँक्स." असं पुटपुटत ती केस पुसू लागली.

"तुला माझ्याबद्दल बरीच माहिती दिसत्येय्." तिच्याकडे संशयानं पाहत रायकर म्हणाले.

"हो." सुचेता म्हणाली.

ती पुढं काही तरी बोलेल, म्हणून रायकर वाट पाहत राहिले; पण ती मन लावून नुसतीच केस पुसत राहिली.

"हा तुमचा लॅबकोट पडलाय् इथं. तो मी अंगावर घेऊ का? खूप थंडी वाजत्येय्."



सुबोध प्रभाकर जावडेकर
जन्म : १६ सप्टेंबर १९४८.
बी. टेक्. - आय आय टी मधून केमिकल इंजिनियरिंगची पदवी

**पुस्तके :**

(१) चिंतामणी हा नव्या युगाचा - प्लास्टिक संबंधी माहितीपर पुस्तक (त्रिदल) १९८७

(२) आकांत - भोपाळ दुर्घटनेवर आधारित कादंबरी (ग्रंथाली) १९८८

(३) गुगली-विज्ञानकथासंग्रह (रविराज) १९९१

(४) विज्ञानाच्या नव्या वाटा-विज्ञानलेख (स्मिता प्रकाशन) १९९२

(५) विज्ञानाची नवी क्षितीजे- विज्ञानलेख (स्मिता प्रकाशन) १९९२

(६) PLASTIC FEAST (Published in Hindi and English) Popular Science (CISR) 1992

(७) वामनाचे चौथे पाऊल - विज्ञानकथा संग्रह (मेहता पब्लिशिंग हाऊस) १९९४

(८) संगणकाची सावली - विज्ञानकथा संग्रह (रविराज प्रकाशन) १९९७

(९) प्लॅस्टिकची मेजवानी - (महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ) १९९८

**इतर लेखन :**

(१) महाराष्ट्र टाईम्स, लोकसत्ता व इतर वृत्तपत्रांतून वेळोवेळी विज्ञानविषयक लेख, पुस्तक परीक्षणे इ.
(२) आकाशवाणीसाठी नाटिका, फिचर्स अशा प्रकारचे लेखन, मुलाखती, कथाकथन.
(३) ललित, किर्लोस्कर, म. सा. पत्रिका, अंतर्नाद यासारख्या मासिकांतून लेख

**सन्मान :**

(१) आकांत कादंबरीस ग्रंथाली पारितोषिक.
(२) गुगली या कथासंग्रहास राज्यपारितोषिक.
(३) विज्ञानसाहित्यिक म्हणून मराठी विज्ञान परिषदेतर्फे सत्कार-मडगांव (गोवा).

**संकीर्ण :**

(१) बारा कथांचे अनुवाद इंग्रजी, हिंदी, उर्दू, कन्नड व बंगाली भाषांत प्रसिद्ध झाले आहेत.
(२) 'मराठी विज्ञान कथा' या विषयावर दोनदा मुलाखत झाली आहे.
(३) इंग्रजी, हिंदी व मराठी प्रातिनिधिक कथासंग्रहात (Anthologies) विविध विज्ञानकथांची निवड झाली आहे.

रायकर काहीच बोलले नाहीत. रागानं धुमसत गप्प राहिले.

त्यांचं मौन हीच संमती समजून सुचेतानं आपल्या ओल्या अंगावर ढगळ पांढरा लॅबकोट चढवला.

''तू कॉलेजात आहेस?''

''इतकी लहान दिसते मी?'' स्वत:वर खूश होत सुचेता हसली. ''नाही, नोकरी करते.''

''इथं कशाला आली होतीस?'' तिच्याकडे रोखून पाहत रायकरांनी विचारलं.

''आम्ही मैत्रिणी गावाबाहेर पिकनिकला आलो होतो. पावसात भिजायला. दर वर्षी आम्ही वर्षासहल काढतो. पण यंदा पाऊस जरा जास्तच आहे, नाही? आज तर विचारून नका.''

''मग तुझ्या मैत्रिणी कुठायत?''

''आमची चुकामूक झाली. पण हरकत नाही. त्या निमित्तानं तुमची भेट झाली.''

''माझ्याबद्दल, माझ्या संशोधनाबद्दल कुठं वाचलंस? मी तर कधीच वर्तमानपत्रात बातमी येऊ देत नाही.''

''खरं आहे. वर्तमानपत्रात नाहीच वाचलं. आमचे बायॉलॉजीचे प्रोफेसर तुमच्याबद्दल बोलायचे. प्रोफेसर भुस्कुटे. तुम्हांला माहीत असतीलच.''

रायकरांनी आठवायचा प्रयत्न केला. त्यांना काही आठवलं नाही. असेल कुणी तरी...

''पण मी इथं राहतो, म्हणून तुला कुणी सांगितलं?''

''तुम्हाला वाटतं तितके तुम्ही अप्रसिद्ध नाही.'' सुचेता हसून म्हणाली.

नकळत रायकरांच्या कपाळावरची आठी अदृश्य झाली.

''पावसाचा जोर कमी झाला, की मी जाईन. तुम्हाला तुमचं काम चालू ठेवायला हरकत नाही. मी शांतपणं बसून राहीन. तुम्हाला डिस्टर्ब करणार नाही.''

''उपकारच करतेस!'' रायकर पुटपुटले. त्यांनी पुन्हा उपकरणापुढं बैठक मारली. सुचेताकडे पाठ करून आपलं काम सुरू केलं.

सुचेतानं भोवताली नजर टाकली.

शेजारच्या टेबलावर वेगवेगळ्या रंगाच्या आणि आकारांच्या बाटल्यांचा खच पडला होता. शेकडो परीक्षानळ्या हारीनं लावून ठेवलेल्या होत्या. त्यांवर कापसाचे बोळे झाकणीसारखे लावलेले होते. पलीकडे पंधरा-वीस काचपात्रं स्टँडवर अडकवलेली होती. स्टॅण्ड लयबद्धपणं हेलकावे घेत होता. आतला द्रव हिंदकळत होता.

शेजारच्या खोलीचं दार बंद होतं. दारावर एक भलमोठं कुलूप लटकत होतं. घरातल्या एखाद्या खोलीचं दार कुलूप लावून बंद केलेलं असणं सुचेताला चमत्कारिक वाटलं.

विजेच्या दिव्याचा प्रकाश मंद होत होत एकदम अंधार झाला. वीज गेली होती.

रायकरांच्या तोंडून चार सणसणीत शिव्या बाहेर पडल्या.

''आपल्या शहरातली वीज कंपनी अगदी बेभरवशाची आहे, नाही? पाऊस सुरू झाला, की हमखास वीज जाते.'' सुचेतानं बोलणं सुरू करायचा प्रयत्न केला.

''हॅं!'' असा एक तिरसटपणाचा उद्गार रायकरांच्या तोंडून बाहेर पडला.

''फार महत्त्वाचा प्रयोग चालू होता का?''

''हं.''

''वीज गेल्यामुळं प्रयोगात व्यत्यय येतो,

नाही? मला, बाई असं काही झालं, की अगदी संताप येतो!'' सुचेतानं प्रयत्न सोडला नाही.

डॉक्टर रायकर काहीच बोलले नाहीत.

''तुम्ही गप्प बसल्यामुळं काही वीज येणार नाही. मग बोलत का नाही? तेवढाच वेळ जाईल.''

''तुझ्यासारख्या मूर्ख मुलीशी बोलण्यात मला वेळ फुकट घालवायचा नाहीये.''

''पण तुमचा वेळ तर फुकट जाणारच आहे. तुमच्या समोरचं यंत्र काही विजेशिवाय चालू शकत नाही. या अंधूक प्रकाशात तुम्हाला वाचताही येणार नाही. घरात मेणबत्त्या आहेत?''

''माहीत नाही.''

''मी शोधू?'' सुचेतानं मदत करायची तयारी दाखवली.

''काही नको. मीच बघतो.'' असं म्हणून रायकर उठले.

पंधरा-वीस मिनिटं खुडबुड केल्यावरही जेव्हा काही हाताला लागलं नाही, तेव्हा ते पुन्हा सुचेतासमोर येऊन बसले.

''नाही ना सापडल्या?''

उत्तर नाही.

''नुसतं गप्प बसण्यापेक्षा जरा गप्पा तर मारू या. काय?''

''अं?''

''नाही तर करणार तरी काय? मी हॉस्टेलवर होते, तेव्हा वीज गेली, की आम्ही नेहमी गप्पा मारत बसायचो. तेवढाच टाइमपास!''

रायकरांनी दात-ओठ खाल्ल्याचं सुचेताला दिसलं नाही. ती बोलत राहिली.

''प्रोफेसर भुस्कुटे नेहमी तुमच्याबद्दल सांगायचे. ते म्हणायचे, 'इतका हुशार माणूस? पण'...'' सुचेतानं जीभ चावली.

''पण? पण काय?'' रायकरांच्या तोंडून शब्द बाहेर पडले.

''काही नाही.''

''नाही कसं? काय म्हणायचंय् ते स्पष्ट सांग.'' रायकरांचा आवाज चढला.

''विशेष काही नाही.'' सुचेतानं उत्तर द्यायची टाळाटाळ केली.

''तुला सांगायचं नसलं, तर चालती हो माझ्या घरातनं!''

''नाही... सांगायचं नाही, असं काही नाही, पण कशाला उगाच?''

''आता सांगतेस की...''

''सांगते...सांगते, ते म्हणायचे, 'इतका हुशार माणूस, पण अगदी एककल्ली. एखाद्या गोष्टीच्या पाठीमागं लागला, की काय वाट्टेल ते झालं तरी सोडणार नाही. मग ती गोष्ट कितीही अशक्य कोटीतली असो.' ''

''अस्सं?''

''हो, ना! तुम्ही, म्हणे, स्त्रीपुरुषांशिवाय मूल जन्माला घालायचा प्रयोग करायला घेतलाय्. त्या मूर्ख स्वप्नामागं... आय् ॲम सॉरी-असं भुस्कुटे सर म्हणायचे.''

रायकरांचे दात कराकरा वाजले.

''कोनिंग की काय म्हणतात ना त्याला?''

''क्लोनिंग!''

''बरोबर! क्लोनिंगच, भुस्कुटे म्हणायचे, 'हे क्लोनिंग बेडक्यासारख्या प्राण्यांच्या बाबतीत शक्य असलं, तरी माणसाच्या बाबतीत कधीच शक्य होणार नाही.' ''

रायकर उपहासानं हसले. त्यांच्या हसण्याचा आवाज त्या अंधाऱ्या खोलीत घुमत राहिला.

''शक्य आहे?'' सुचेतानं विचारलं. ''जमू शकेल कधी असं करणं?''

''शकेल? शकेल नव्हे; शक्य झालंय्! या आधीच! मी स्वतः ते करून बघितलंय्.'' रायकर गर्वानं म्हणाले.

''काय? खरंच?'' सुचेता चीत्कारली.

''मग काय खोटं, की काय? बघशील तू. फक्त आणखी थोडे दिवस थांब.''

''काय सांगताय्? जमलंय् तुम्हाला? स्त्रीपुरुषाशिवाय मुलाचा जन्म?''

''स्त्री-पुरुषसंबंधाशिवाय! एकट्या स्त्रीचं मूल किंवा एकट्या पुरुषाचं!''

''अशक्य!''

''त्यात काय अशक्य आहे? मूल जन्माला येताना तेवीस गुणसूत्रं आईची आणि तेवीस बापाची घेऊन जन्माला येतं. मी काही प्रयोग केले. जेनेटिक इंजीनिअरिंग म्हणतात त्याला. नवीन जीव सेहेचाळीसच्या सेहेचाळीस गुणसूत्रं आईची किंवा बापाची घेऊन जन्म घेईल. असं घडवून आणलं.''

''आणि मग?'' सुचेतानं डोळे विस्फारून विचारलं.

''मग साहजिकच ते मूल आपल्या आईची किंवा बापाची सहीसही प्रतिकृती होतं.''

''फॅण्टास्टिक!'' भान न राहून सुचेता ओरडली.

डॉक्टर रायकर सुखावून हसले. त्यांच्या डोळ्यांत आत्मगौरवाची चमक आली.

''कसं जमलं तुम्हाला ते?'' सुचेतानं कौतुकानं विचारलं.

''गेली पंधरा-वीस वर्षं मी हा एकच ध्यास घेऊन काम करतोय्. रात्रंदिवस एकच ध्यास. माझी स्वतःची प्रतिकृती निर्माण करायचा. सतत काम. न कंटाळता, न थकता, न कुरकुरता. तेव्हा कुठं मला हे साध्य झालं.''

''पण...'' सुचेता विचारात पडली. ''पण मुलाची पूर्ण वाढ होईपर्यंत कळणार कसं, की ते आईबापाची सहीसही प्रतिकृती झालंय् की नाही, ते? निदान सतरा-अठरा वर्षं थांबायला नको का ते समजण्यासाठी?''

रायकर हसले.

''त्यावरही मी उपाय काढलाय्. मी अशी औषधं तयार केली आहेत, की ती घेतल्यानं मुलाची वाढ अतिशय झपाट्यानं होते. नेहमीच्यापेक्षा पाच-सहापट वेगानं. तीन वर्षांच्या आतच पूर्ण वाढ झालेला पुरुष निर्माण होतो.''

''फॅण्टास्टिक!'' पुन्हा सुचेताच्या डोळ्यांची फुलपाखरं फडफडली.

एखाद्या लहान मुलाच्या उत्साहानं आता रायकर सांगू लागले,

''बघशील तू! आणखी वर्षभराच्या आत मी जगातला सर्वात श्रीमंत माणूस होईन!''

''श्रीमंत, की प्रसिद्ध?'' सुचेता गोंधळली.

''श्रीमंतच.'' डॉक्टर रायकर ठासून म्हणाले, ''प्रसिद्धी काय चाटायची आहे? हुबेहूब आपल्यासारखा वारस जन्माला घालणं हे प्रत्येक माणसाला आपलं आद्य कर्तव्य वाटतं. माझा शोध जाहीर झाला, की देशोदेशीच्या श्रीमंत माणसांची रांग लागेल माझ्या दाराशी! मग काय? पैसाच पैसा!''

''पण असं करणं बरोबर ठरेल का?''

''का? त्याला काय झालं?''

''निसर्गानं जीवनिर्मितीची जी चाकोरी आखून दिली आहे, ती मोडणं धोक्याचं नाही का? निसर्गनियमांत असा बदल करणं योग्य

होईल का?''

''योग्य आणि अयोग्य! या चर्चा समाजशास्त्रज्ञांना करू देत! मला काय त्याचं?''

''शास्त्रज्ञ म्हणून तुमचं काहीच कर्तव्य नाही?'' सुचेताच्या आवाजात आता किंचित उपहास डोकावू लागला होता.

''तू कोण माझी उलटतपासणी घेणारी?''

''तेही खरंय्. म्हणा!'' सुचेताचा स्वर बदलला. ''पण इतका महत्त्वाचा प्रयोग तुम्ही इतका गुप्तपणे का केलात?'' तिनं भाबड्या स्वरात विचारलं.

''गुप्तपणानं कुठला? फक्त त्याची वाच्यता मी केली नाही, इतकंच!''

''खरंच की! मी कुठं तरी वाचलंय्, की खरा शास्त्रज्ञ आपल्या संशोधनाचा कधीच ढिंडोरा पिटत नाही. स्वत:च्या कार्याचा गवगवा करणं हे उथळ बुद्धिमत्तेचं लक्षण आहे.''

रायकरांच्या चेहऱ्यावर प्रसन्नता उमटली.

''पण, डॉक्टर, तुम्हाला कधी आपल्या संशोधनात चूक होईल, अशी भीती नाही वाटली? अपयशाची धास्ती नाही वाटली?''

''कसली चूक? कसली धास्ती?''

''आपला प्रयोग फसेल, याची. मारुती जन्माला घालताना माकड निर्माण होईल, याची.''

''अपयशाची भीती बाळगली, तर संशोधन करताच येणार नाही. चुकांतून मार्ग काढत काढतच शास्त्र पुढं जातं.''

''म्हणजे तुमच्या हातूनही चुका झाल्या?''

''अर्थात!'' रायकर बेसावधपणं बोलून गेले.

''आणि अशा चुकांमधून जन्माला येणारी सजीव बालकं?''

''त्यांचं काय?''

''त्यांचं काय केलंत?''

''काय करायचं? ती मी नष्ट केली.'' रायकरांचा आवाज कोरडा होता.

''नष्ट केलीत?''

''मग काय करणार? गर्भपात नाही करत डॉक्टर्स?''

''हो. पण तुम्ही नष्ट केलेत, ते गर्भ नव्हते. ती जितीजागती माणसं होती. त्यांची वाढ झपाट्यानं करण्यासाठी तुम्ही त्यांना तुमची औषधं देत होतात. म्हणजे नेहमीच्या हिशेवात ती निदान आठ-दहा वर्षांची मुलं होती. त्यांना तुम्ही 'नष्ट' केलंत?''

''त्या प्रयोगामधे झालेल्या चुका होत्या. त्या सुधारणं आवश्यकच होतं.''

''डॉक्टर, तुम्ही काय बोलताय् हे तुम्हाला समजतंय् का? तुम्ही स्वत: जन्माला घातलेली कोवळी मुलं, केवळ त्यांची वाढ तुम्हाला हव्या त्या दिशेनं होत नाही, म्हणून तुम्ही ठार मारलीत?'' सुचेताचा आवाज आता एखाद्या तलवारीच्या पात्यासारखा धारदार बनला होता.

क्षणभर खोलीत शांतता पसरली.

''बोला, डॉक्टर! तुम्ही त्या मुलांचा खून केलात?''

''ती मुलं माझ्या संशोधनाची फळं होती. त्यांतली रोगट, खुरटी मुलं जगायला लायकच नव्हती!'' डॉक्टरांचा चेहरा वेडावाकडा झाला होता; पण स्वरात अपराधीपणा नव्हता, ती केवळ आपण बेसावधपणं बोलून गेल्याची खंत.

''नाही, डॉक्टर.'' सुचेता तिरस्कारानं



अनुक्रमणिका

म्हणाली, "ती मुलं रोगट नव्हती. फक्त ती तुम्हाला पाहिजेत, तशी नव्हती. तुमची प्रतिकृती नव्हती. म्हणून केवळ तुमच्या स्वार्थासाठी तुम्ही त्यांचा बळी घेतलात!"

"हो, घेतला!" डॉक्टर उद्दामपणे म्हणाले, "तू कोण मला विचारणारी? माझ्या घरात मी हवं ते करेन!"

"सॉरी! तुम्ही तुमच्या घरात वाटेल ते करू शकता, असं तुम्हांला वाटत असेल, तर तो तुमचा भ्रम आहे. या देशात अजून कायद्याचं राज्य चालतं."

"हूं:! कायद्याचं राज्य, म्हणे!" रायकर उपहासानं म्हणाले.

"होय. कायद्याचं राज्य!" सुचेताचा स्वर शांत होता. "कायद्याच्या लेखी तुम्ही गुन्हेगार आहात. तुमच्यावर खटला भरण्यात येईल. तुम्हांला फाशीची शिक्षा होऊ शकेल."

"खटला?" रायकर मोठ्यानं हसले. "आणि त्यासाठी पुरावा काय?"

"पुरावा...माझा शब्द! तुम्ही आत्ता माझ्यापाशी मुलांना ठार मारल्याचं कबूल केलंत."

"तुझा शब्द! तू कोण? तुझ्या शब्दावर कोण विश्वास ठेवणार आहे?"

सुचेता किंचित हसली.

"मघाशी मी नोकरी करत असल्याचं सांगितलं. पण कुठं करते, ते नाही सांगितलं. मी 'सी.आयू.डी.' मधे आहे. हे माझं आयकार्ड!" आपल्या पर्समधून ओळखपत्र काढून रायकरांपुढं धरत सुचेता म्हणाली.

रायकर क्षणभर सुन्न झाले. मग चटकन उठायचा प्रयत्न करत असतानाच त्यांच्या लक्षात आलं, की सुचेतानं आयकार्ड काढतानाच आणखी एक वस्तू पर्समधून काढली आहे. अंधूक प्रकाशातही सुचेताच्या हातातलं छोटं पिस्तूल त्यांना दिसलं.

"मुळीच गडबड करायचा प्रयत्न करू नका, मागच्या दरवाज्यापाशी माझे सहकारी उभे आहेत. तुम्ही मुकाट्यानं माझ्याबरोबर चला."

"मी...मला..."

"तुमचा नोकर सदाशिव याला पोलिसांनी ताब्यात घेतलेलं आहे. त्यांना सदाशिवकडून सगळी माहिती मिळालेली आहे. शिवाय तुमच्या प्रयोगशाळेची झडती घेतली, की आणखी रगड पुरावा सापडेल! डॉक्टर रायकर, तुमच्या नशिबातला फास आता काही चुकत नाही."

रायकरांचा चेहरा पांढराफटक पडला होता. त्यांच्या अंगातलं सगळं त्राण संपलं होतं.

"मी. तुमच्याबरोबर यायला तयार आहे." ते पुटपुटले, "पण..."

"पण काय?"

"मला पाच मिनिटं वेळ द्या."

"कशाला?" सुचेतानं धारदार स्वरात विचारलं.

"माझा जो प्रयोग चालू आहे, तो नीट बंद करू दे. नाही तर वीज आल्यावर यंत्र चालू होऊन गोंधळ उडेल."

"ठीक आहे. करा बंद. पण काही गडबड करायचा प्रयत्न करू नका."

डॉक्टर रायकर लटपटत्या पायांनी उठले. यांनी समोरच्या उपकरणाची काही बटणं दाबली. मग सुचेताकडे वळून ते म्हणाले,

"त्या खोलीतही काही उपकरणं आहेत. तीही बंद करावी लागतील."

सुचेतानं त्यांच्याकडे संशयानं पाहिलं. मग

हातातल्या पिस्तुलानंच त्यांना तिकडे चलण्याचा इशारा केला.

रायकरांनी खोलीचं कुलूप काढलं. सुचेतानं दार उघडून खोलीत डोकावून पाहिलं.

खोलीत तीन प्रचंड मोठाली कपाटं होती. दुसरं काहीही सामान नव्हतं.

आत डोकावायच्या निमित्तानं क्षणभरच सुचेताचं लक्ष रायकरांवरून ढळलं. नेमका त्याच क्षणाच फायदा घेऊन रायकरांनी सुचेताच्या हातातलं पिस्तुल उडवलं आणि खोलीच्या आत पाडलं. दुसऱ्या क्षणी तिला बाहेर ढकलून देऊन रायकरांनी खोलीचं दार आतून बंद केलं.

सुचेता बधिर होऊन क्षणभर जागच्या जागीच थांबली. मग भानावर येऊन आपल्या सहकाऱ्याला हाक मारण्यासाठी ती घरावाहेर धावली.

मिनिटभरात सुचेतानं आणि तिच्या सहकाऱ्यानं सावधपणानं घरात प्रवेश केला. दाराजवळ असतानाच त्यांना पिस्तुलाचा आवाज ऐकू आला.

आतल्या खोलीचं दार सताड उघडं होतं. आत डॉक्टर रायकरांचा देह वेडावाकडा पडला होता. सरळ डोक्यावर गोळी झाडून घेतल्यामुळं त्यांचा मेंदू छिन्नविछिन्न झाला होता. रक्ताचा सडा जमिनीवर पडला होता.

रायकर जिवंत असण्याची काडीमात्र शक्यता नव्हती, तरी सुचेताचा सहकारी त्यांच्याकडे धावला. त्यांची नाडी बघून त्यानं खात्री करून घेतली आणि सुचेताकडे पाहून मान हलवली.

''आता?'' सुचेता पुटपुटली.

''आता काय? हे एक त्रांगडंच झालं. आपण डिपार्टमेंटला कळवू. पुढचं सगळं ते बघून घेतील.''

''हॉरिबल! एका महान शास्त्रज्ञाचा असा शेवट व्हावा...''

सुचेताच्या सहकाऱ्यानं खांदे उडवले.

''चल, इथं थांबण्यात काही अर्थ नाही.'' तो म्हणाला.

अंगचं कुलूप असलेलं बाहेरचं दार ओढून घेऊन ती दोघं भर पावसात चालू लागली...

त्या दोघांना जाऊन पाच मिनिटं व्हायच्या आत खोलीतल्या एका कपाटाचं दार उघडलं गेलं. त्यातून डॉक्टर रायकर बाहेर आले. त्यांच्या चेहऱ्यावर विजयी हास्य विलसत होतं.

त्यांनी शेजारची दोन कपाटं उघडली. त्यातून हुबेहुब डॉक्टर रायकरांसारखीच दिसणारी दोन माणसं बाहेर आली.

''चला.'' डॉक्टर रायकर म्हणाले, ''आता आपल्याला घाई केली पाहिजे. पोलिस यायच्या आत आपण शहराबाहेर पडू. तू दिल्लीला जाऊन राहा. आणि तू बंगलोरला. हा पत्ता आणि हे पैसे. तुमची गरज लागली, की मी तुम्हाला बोलावून घेईन. ओके?''

मग जमिनीवर पडलेल्या आकृतीकडे एक उदास नजर टाकत ते म्हणाले,

''बिचारा! या रायकराची पोलिस विल्हेवाट लावतील. याचा जन्म सार्थकी लागला नाही, तरी मृत्यू तरी सार्थकी लागला, म्हणायचा...चला!''

बाहेर पाऊस वेडावाकडा कोसळतच होता. □

सुबोध जावडेकर
५, भागीरथी प्रसाद, रानडे रोड,
९९, शिवाजी पार्क, दादर, मुंबई ४०० ०२८.
दूरध्वनी : ४४६६४५१



अनुक्रमणिका






## विज्ञानकथा : अनेकविध अनुभव / सुबोध जावडेकर

'एका बीजापोटी' ही एक विज्ञानकथा आहे. विज्ञानकथा वाचकाला विज्ञान शिकवण्याच्या भूमिकेतून लिहिल्या जाऊ नयेत असे माझे ठाम मत आहे. विज्ञानकथा ही प्रथमत: कथा असते, निदान असली पाहिजे अशी माझी धारणा आहे.

विज्ञान शिकविण्याच्या अट्टाहासाने लिहिलेली कथा हे प्रचारकी वाङ्मय होईल. ते कलाकृतीच्या पातळीला कसे पोचेल?

म्हणूनच माझ्या विज्ञानकथांमधे शास्त्रीय तपशीलाचे अवडंबर जवळजवळ नसतेच. वैज्ञानिक माहिती आलीच तर ती शास्त्र समजावून देण्यासाठी नसते. इतर कुठल्याही कलाकृतीप्रमाणे विज्ञानकथासुद्धा वाचकाला एक अनुभव देत असते. हा अनुभव घेणं त्याला शक्य व्हावं एवढ्यापुरतंच त्या माहितीचे प्रयोजन असतं.

माझ्या इतर विज्ञानकथांच्या मानाने 'एका बीजापोटी' मधे शास्त्रीय विवेचन किंचितसे जास्त आले आहे. ह्याला एक कारण आहे.

ही कथा क्लोनिंग ह्या संकल्पनेभोवती गुंफलेली आहे. मी ती दहाबारा वर्षांपूर्वी लिहिली. त्या वेळी क्लोनिंग म्हणजे काय ह्याबद्दल बहुतेकांना माहिती नव्हती. पुढे क्लोनिंगच्या सहाय्यानं 'डॉली' ह्या मेंढीला जन्माला घातल्यावर वृत्तपत्रे, नियतकालिके ह्यातून क्लोनिंगबद्दल बरीच माहिती पुढे आली. त्यावेळी मात्र क्लोनिंगबद्दल माहिती वाचकाला देणं आवश्यक होतं. नाहीतर कथा वाचकांपर्यंत जाऊच शकली नसती.

अर्थातच असे असले तरी ती माहिती मी सरळधोपट पद्धतीनं दिलेली नाही. कथेच्या ओघात पात्रांच्या तोंडूनच ती येते. एवढेच नव्हे तर एका पात्राने आदरमिश्रित कुतुहलाने क्लोनिंग म्हणजे काय हे विचारणे आणि दुसऱ्या पात्राने ती सांगताना आत्मप्रौढीच्या स्वरूपात ते सांगणे ह्यामुळे पात्रांच्या स्वभावरेखाटनाला नकळत मदत झालेली आहे, असे मला वाटते. कथेत शेवटी येणाऱ्या धक्क्याच्या दृष्टीने ह्या संभाषणाला महत्त्व आहे.

'एका बीजापोटी' ही एक गुन्हेगार कथाही आहे. कथांचे वर्गीकरण करताना पुष्कळदा ते विनोदीकथा, गूढकथा, अद्भूतकथा, रहस्यकथा, त्यातच 'विज्ञानकथा' हा एक कप्पा उघडून केले जाते. ते अर्थातच चुकीचे आहे. कारण विज्ञानकथा ही रहस्यकथा असू शकते, प्रेमकथा असू शकते, विनोदीकथा असू शकते. हा मुद्दा 'एका बीजापोटी' ही कथा अधोरेखित करते.

रूढार्थाने 'एका बीजापोटी' ही गुन्हेगारकथा असली तरी तिची मांडणी सांकेतिक नाही. म्हणजे 'गुन्हेगाराला पोलिसांनी हातकड्या घातल्या' असा ठराविक शेवट तिचा होत नाही. गुन्हेगार सापडतोही आणि नाहीही. ह्यापेक्षा जास्त स्पष्ट केल्याने कथा वाचण्याची मजा जाईल.

दुसऱ्या एका कारणामुळे ही कथा रूढ चौकटी मोडते. तिच्यातल्या गुन्ह्याचे स्वरूप, तो घडण्याची कारणे ह्यामागे वैज्ञानिक कारणे आहेत. त्यातला संघर्ष विज्ञानामुळे निर्माण झालेला आहे. (म्हणूनच ती साधी रहस्यकथा न राहता विज्ञानकथा होते!)

साहित्य माणसाचे जीवन समृद्ध करते, असे आपण अनेकदा म्हणतो. ह्याचा नक्की अर्थ



अनुक्रमणिका

*काय? साहित्यातून वाचक अनेकविध अनुभवांना सामोरा जातो. अनुभवातून येणारे शहाणपण त्याच्याकडे अलगद जमा होते. तो प्रगल्भ बनतो.*

*विज्ञानकथेतून येणारे अनुभव हे माणसाला आजपर्यंत कधी न आलेले अनुभव असतात. पण ते खोटे, परिकथेतील अनुभव नसतात. तर भविष्यकाळात येऊ घातलेले अनुभव असतात. आज ना उद्या त्यांना सामोरे जायचेच आहे. विज्ञानकथा हे साहित्यच नाही अशी भूमिका घेणाऱ्यांनी, अशा अनुभवांकडे पाठ फिरवणे उचित होईल का, ह्याचाही विचार करणे जरूर आहे.*

❑

---

## स्वागत

- ❑ **शिवराम जानबा कांबळे :** ह. ना. नवलकर, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १९४
- ❑ **दलित कवितेतील हिन्दुत्त्व :** मोतीराम कटारे, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठे ७२
- ❑ **जोजोबा लागवड :** शिवाजी ठोंबरे, व. सी. खुरपे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२०
- ❑ **शुक्रवारची कहाणी :** प्रतिभा रानडे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे २०६
- ❑ **वेध :** पुष्पा त्रिलोकेकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे २५३
- ❑ **महाभारत :** सदाशिव आठवले, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे ३५०
- ❑ **प्रवास :** विजया टेकसिंगानी, प्रेरणा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६४
- ❑ **कवितारती :** पुरुपोत्तम पाटील, मौज प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ११२
- ❑ **माझी भारतमाता :** वि.वि.देवगावकर, महाराष्ट्र कला साहित्य प्रसारिणी, पुणे. पृष्ठे ६०,
- ❑ **आशा बगे नवे अस्तित्त्व :** सुलभा हेर्लेकर, कौस्तुभ प्रकाशन, नागपूर. पृष्ठे ८८
- ❑ **शब्दकुंज :** गजानन घारपुरे, साहित्य कलायात्री प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४०
- ❑ **दलित शाहिरी :** महेन्द्र गायकवाड, संघर्ष प्रकाशन, नागपूर, पृष्ठे ९१
- ❑ **काळोखाचे रंग :** डॉ. कमलेश, संदर्भ प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६३
- ❑ **विद्यार्थी हिन्दी मराठी कोश :** श्रीपाद जोशी, शुभदा सारस्वत प्रकाशन, पुणे. पृष्ठे २२८
- ❑ **सर्जनशील कल्पनाशक्ती :** दिलीप पारेख, शुभदा सारस्वत प्रकाशन, पुणे, पृष्ठे ७७
- ❑ **चित्रकथा :** शांता ज. शेळके, पृष्ठे २००
- ❑ **उखाणे आणि स्त्रियांची गाणी :** अनुराधा तांबोळकर, पृष्ठे ६४
- ❑ **उद्ध्वस्थ प्राचीन राजधानी :** गजमल माळी, राजमुद्रा प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १०७
- ❑ **आरोग्य तेथे :** डॉ. दिलीप देवधर, कलाप्रतिमा, पुणे, पृष्ठे १२५

**उत्कर्ष प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने**

- ❑ **बोळवण :** रा. रं. बोराडे, पृष्ठे १६९
- ❑ **माळरान :** रा. रं. बोराडे, पृष्ठे १८२
- ❑ **रस्त्यावरचे दिवे :** जयंत साळगांवकर, पृष्ठे ११२
- ❑ **नव्या जीवनाची सफल वाटचाल :** श्री. वा. काळे, पृष्ठे १००

---



अनुक्रमणिका

# महालूट

□

सदानंद देशमुख

□

थंडी चांगलीच झोंबत होती. तुकारामबुवांचे सगळं अंग त्याच्यानं गारठून गार झालं होतं. त्याच्यानं तो थरथरत चालला होता, अंगावर एक चादर गुंडाळून मुंडाळून घेतली होती, तरी काळीज गोठल्यावाणी वाटत होतं. वहाणातून उघडे असणारे पाय चांगलेच गारठले होते. बधिरल्यासारखे झाले होते. त्याच्यानं ते ठोकरल्यागत आंधळ्या माणसांसारखा चालत होता.

घरी आल्यावरोबर त्याने चुलीकडे आपला मोर्चा वळविला. आधीच्याच पेटलेल्या चुलीत त्याने बचाकभर तुरकाट्या कोंबल्या, तर त्याच्यानं भक्कन असा जाळ उंचाडला. त्यावर हात, पाय, सगळं अंग त्यानं शेकून घेतलं. पोरगी बाहेरच्या अंगणातून सडा टाकून आली. ती चांगलीच थरथरत होती. म्हणताना चुलीजवळ बसली अन् हात-पाय शेकाय लागली.

"तुपली माय नाही उठली आजून? झोपलेय होय का काय?" असं तुकारामबुवाने तुरकाट्या चुलीत कोंबत विचारलं.

"रातभर लय कण्हारत व्हती माय. आगीच्या वणव्यातून निंगल्यावाणी तळमळ तळमळ करत होती.."

"कावून ते? काय झालं लगी, असं तळमळाय?"

"आता तुम्हाला काय माहीत नाय का? तिचं डोस्कं लय ठणकत व्हतं रातभर. पाह्यटी कशीबशी झोपली आसंन..."

"आन् आजाब काय करते? वावरात गेला का काय?"

"हाव. झाकटतच उठून गेला. गऱ्हास बारी द्याले."

"बरं, मले चहा ठेव कपभर." म्हणताना तुका उठला.

राखोंडीचा ढेपसा घेऊन दात घासायला लागला. मग उभं आडवं बोट फिरवून त्याने तांब्याभर पाणी घेतलं. खळखळ करत तोंड धुतलं अन् चुलीशी येऊन बसला. उक्कड बसून चहा प्याला. तर बायको उठून बाहेर आली. तिच्या कपाळावर पट्टी बांधलेली. पुन्हांदी वरतून लुगड्याचा पदर खच्चून आवळून बांधलेला. तोंड सोकाटून गेलं होतं. चाल गळाठून गेली होती. आली अन् कण्हत कण्हारत चुलीशी बसली. कासावीस झाली.

"काय म्हणते तुपलं डोक्सं? थांबलं, का दुकूनच राह्यलं आजून?" त्याने विचारायचं म्हणून विचारलं.

"दुकूनच राह्यलं आजून! मले पुढी घलते कान्नू ते." ती तिरसाटल्यावानी असं बोलली. तर त्याचा काळजाच्या दोन खापा.

''आसं काईच्या वाई नको बकू रामपहाऱ्यात मायगंगे. डोक्सं दुकल्यानं का कुठी माणूस मरते का? काईबी म्हन्ती...''

''काल लाह्यना जुमडे डाक्तर सांगत व्हता, ताबडतोब आकोल्याले न्या म्हणी. तिथोल्ल्या शेवाळे डाक्तरसाहेबाकून डोळे तपासून आणा म्हणी, त्याच्याबगर काई फरक पडणार आता.''

''आता हा काय नवीन घोरघंट्या बाप्पा. शे-पाचशाचा गच्चू हायेच म्हणायचा.''

''मंग राहू द्या. तुमचा पैशातच जीव हाये त मरू द्या मले...'' असं ती एकदम करवदल्यासारखी म्हणाली.

तर तिच्या डोळ्यांत टच टच आसवं दाटाळून आले. आता आपण काय बोलावं. हे काही त्यास कळेनासं झालं. तो तसाच आरबळल्यावाणी तिच्याकडे टुकू टुकू पाहत बसला. मग कवाच्या कवा म्हणाला,

''आरे रडू नको बाप्पा. माहे मायगंगे, करतो न् मी काई सोय साय. घेऊन जावू आकोल्याले. पण पह्यल्यांदी पैसे त येऊ दे मापल्या हातात.''

म्हणताना तो चुलीचा उठला. अन् दारात उभा झाला. निर्जीव डोळ्यांनी रस्त्यावर पहाय लागला. तर रस्त्याने जाणारा बाबुराव आढाव एकदम थांबला.

''काय तुकारामबुवा! झाला का तुमच्या जवारीचा काटा?'' असं विचारीत इकडेच आला. दारासमोरच्या अड्‌म तड्‌म ओट्यावर बसला. तुकारामही बसला. त्याच्या मनातली जखम आधीच ठस ठस करत होती. तर त्याने अशी एकदम खचाटून दाबल्यावाणी कळ उठली.

''आरे कशाचा काटा करतात लेकाचे! लय लय तरास द्याय लागले सोसायटीवाले. मचण्यापासून गोदामाच्या आवारात जवारा नेवून टाकली. काटा करायचं नाव नाई घेत. त्याह्याच्या खुशामती करता करता अन् लोणी लावता लावता फेसकुंडी आलो. रोज राती तिथीसा जावून मरा लागते जागलीवर. नाई त गधडे डुकरं समद्या गावाचे मोकाट, हारल्या तिथीसा येतात. पोतडे लुचू लुचू खातात. मायमी, काय खरं नाई आपल्या कास्तकाराईचं. इतक्यांदी वावरात खळ्यावर जागलीले जावावं लागत व्हतं. आता गोदामाच्या आवारात. घरी झोपायचं कामच नाई...''

''किती पोताडे जवारी हाये?''

''इस पोतडे नेवून टाकली. म्हन्लं, सरकारनं दोनशे चाळीस रुपये हमी भाव जाहीर केला. तेवढाच इस पोत्यावर दोन हजाराचा फायदा. इकडी व्यापारी त दीडशेच्या वर मांगायले तयारच व्हत न्हाईत.''

''पण सरकारी भावानं तुपली जवारी इकल्या जाईन आशी खात्री वाटते तुले?'' बाबुराव आढावने विचारलं.

''कावून नाई इकल्या जाणार? इकल्याच जाय पाह्यजेल. सरकारनं कास्तकारायच्या भल्यासाठी जाहीर केलेत हमी भाव. त्याचा, सरकारी योजनेचा फायदा घयायलेच पाह्यजे आपून...''

''आरे बाबा, सरकार गंज गंज योजना आखते आपल्यासाठी. पण हे मंधातले झिंजोल्ले त्याचा फायदा घेवू देताता का बिट्या आपणास? सम्दा मलिदा खातात मंधातल्या मधाद. म्या त कावं कावं इकली जवारी व्यापाऱ्यास. आपल्या गावातल्या मन्नू

शेठास.''

''कावून ते?''

''ऐरी तरी खविसवाले कास्तकारायचा ठाक लागू देतात का? सम्दी साखळी हाये. व्यापाराची अन् सोसायटीवाल्याची. कास्तकारायचे पोतडे तसेच मयना मयना आवारात पडेल आस्तात. त्या पोतड्यास गधडे, डुकरं लुचू लुचू खातात. अन् व्यापाऱ्याचे पाच-पाचशे पोतडे तिकडी डायरेक काट्यावर लागतात. कास्तकार पैशाच्या मेळ्यापायी रंजीस झाला की, हेच व्यापारी त्याह्यच्याकून दीडशेच्या भावानं आडून जवारी घेतात. आपूनबी गरजवान आस्तोच. देतो. कावून की पैशाचं काम आस्ते. मंग काय? आडला नारायण धरी गाढवाचे पाय हो. मंगसऱ्या हेच व्यापारी लेवीचा ही भाव घेतात. दणकावून नफा कमावतात. नफ्यातला अर्धा हिस्सा सोसायटीवाल्याचा. आर्धा व्यापाराचा. आपून फिरा घंट्या हालवत इकडच्या तिकडी!''

''ही त सांगडच हाये म्हणायची यायची. आसं काय चालू हाये हे सम्दं? कोणी काई कारवाई कावून नाई करत म्हणायची त्याह्यच्यावर?''

''कोण करणार हाये? कारवाई करायची कोणात हिंमत अन् धऊस हाये? आता तूच एवढा गांजून राह्यला. तुपली हाये का सांग हिंमत? हाये तुपली तयारी कोर्टा-कचेऱ्यात झगडायची?''

असं बाबुराव आढावने तडकून विचारलं, तर तुकारामबुवास छाताडात भाला खुपसावं तसं ते वाटलं. त्याच्यानं तो एकदम असा गांगरून गेला. काय



*षडासन नामदेवराव देशमुख*
*लेखन 'सदानंद देशमुख' या नावाने.*
*जन्म ३०-७-५९*
*गाव अमडापूर, ता.चिखली, जि.बुलढाणा*
*शिक्षण मराठी विषय घेऊन प्रथम क्षेणीत एम्.ए.*
*नोकरी जानेफळ, ता.मेहकर, जि.बुलढाणा*

***प्रकाशित साहित्य -***

***कथासंग्रह :***
*लचांड, उठावण, महालूट*
*मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे.*

***कादंबरी :***
*तहान, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.*
*विशाखा, सा.सकाळ, लोकप्रभा, महाराष्ट्र टाइम्स, अनुष्टुभ, लोकमत, तरुण भारत, किर्लोस्कर, स्त्री, अंतर्नाद, सत्याग्रही, रविवार सकाळ, मुंबई तरुण भारत, पुढारी, इत्यादी नियतकालिकातून व दिवाळी अंकातून कथा-कविता प्रकाशित.*

***पुरस्कार :***
*महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ग.ल.ठोकळ पुरस्कार, महाराष्ट्र शासनाचा राज्य पुरस्कार*
*भि. ग. रोहमारे पुरस्कार*
*कथा/कविता स्पर्धातून प्रथम क्रमांकाचे पुरस्कार.*

बोलावं, अन् काय नाही हे त्यास कळेनासंच झालं.

''आरे तुंभाजी, आपल्या मांगं पह्यलेच हजार लफडे आहेत आपले. एकटा दुकटा माणूस कुठी कुठी झगडणार? आत संघटनेवाल्यानंच त्याह्यले सापळे टाकून पकडाय पाह्यजेल. जरा दोन-चाराच्या नवकऱ्या गेल्या, भुके खाय लागले त आपच बाकीचे बी येतान लायनीवी.''

''पण तू काई म्हण, आपली लूट चाल्ली विट्या सम्दी...''

''लूट? नुस्ती लूट नाई. महालूट म्हण, महालूट.''

''खरं म्हन्जी आपल्या देशात आता नवकरशाहीच सुरू हाये का काय आसं वाटाय लागते कंधी कंधी. जिथी पहावं तिथी त्याह्यची मनमानी सुरू हाये. कचेरीत जा. पांडेवाजवळ जा. बाबुलोकाय जवळ जा. मार्केटात जा. आलम देशात कुठीवी जा. ह्या जळवा पिळून घेवून राह्यल्यात आपल्या लोकास. जुन्या काळात सावकार व्हते. जमीनदार व्हते. सरकारनं कायदे करून त्याह्यले मातीत घातलं, त आता हे नवीन उगवले. आपल्या टाळूवरचं लोणी खाणारे. पण जातानंच हे बी. व्हातानंच एकना एक दिवस खतम!''

''पण या व्यापाऱ्यापायी अन् खुडण खाणाऱ्यापायी सम्दा चिंवदा ऱ्हवून राह्यला आपलाच. आता हेच सांग, सरकारनं हमी भाव जाहीर करून फायदाच काय? हमी भाव खरा आपल्यासाठी, पण आपून रंजीस झालो की मालास इकतो व्यापाऱ्यास, त्या इकते लग्गा लावून खविसात...''

''नाइलाज हाये. हाल हाल करतात बाप्पा, हाल हाल करतात. आज काय त बारदाणा नाई. बारदाणा हाये त जागा नाई. हजार बहाणे सांगतात. आता गारगोंड झाली. लाखो हजारो किंटल जवारी भिजली. डिसकलर झाली. त्याले जबाबदार कोण?''

''व्यापाऱ्याची जवारी कशी खपाखप की खपाखप काटा करून घेतली! कास्तकार बसले गारगोंडीखाली भिजत...''

''या पिकाच्या भरोशावर आपले हजार लफडे साले. पाच हजाराचा माल इकते त दहा हजार कर्जा बोकांडी व्हते. हंगाम सरला की अपून पुन्हांदी तसेच्या तसे सडे फटांग, मोकळे चयांग हात झटकून.''

म्हणताना तुकारामबुवा एकदम पिळवटून गेला. डोक्यातल्या अनेक चिंता त्याच्या डोळ्यांपुढे झळकून गेल्या. पाच हजारांचं कर्ज...बैलजोडी इकत घ्यायची. बायकोचं डोस्कं तडकून तडकून दोन खापा व्हाय आलं. तिले तपासाय अकोल्याला न्याचं, पोरगी उजवाय झाली. तिच्या सोयरिकीसाठी गावोगाव घरोदार हिंडायचं. लोकायच्या दाढ्या धरायच्या. सगळ्यात मोठं काम म्हंजी गऱ्हास युरिया द्यायचा. गऱ्हाचं आगाईत युरियावाचून सोकाटून राह्यलं. फटे प्लडे व्हय लागलं. युरिया देल्याबिगर थोंब संगळणार नाई. गऱ्हास झडती येणार नाई...

''तुले एक गोष्ट खटकत नाई तुकारामबुवा?'' बाबुराव आढावने हसून विचारलं.

''कोन्ती?'' तुकारामबुवाने निर्जीवपणे विचारलं.

''आपुन दुकानात जातो, कोन्ताबी माल घ्याले तवा सामानाचा भाव कोण ठरवते?''










"दुकानदार!"

"कपड्याच्या दुकानात जातो. भाव कोण ठरवते?"

"दुकानदार!"

"काईबी इकत घ्याले जा बाजारात. भाव कोण ठरवते? घेणारा का इकणारा?"

"इकणारा!"

'पण आपूनच कास्तकार आसे हावोत, की आपला माल जवा मार्केटात इकायले नेतो, तवा आपल्या मालाचा भाव कोण ठरोते?"

"व्यापारी!"

"हाये का नाई उल्टे काम? व्यापारी, दलाल येतात. परभारे भाव ठरवून जातात. आपून बस्तो टुकू मुकू पाहत. कमी जास्त बोलाय गेले की न्या घराकडी वापीस. अन् आणून काय करता? पोरास खायास काल घालता? कवळे कवळे दगडं? आरे मांगल दिसा म्या मुंग इकायले गेलो. जायाले उशीर झाला. म्हणूनसन्या दलालास इचाराय गेलो. मपल्या मुगास काय भाव देला? त सांगाय तयार नाई. पह्यलेच आठ रोजपासून चकरा मारत व्हतो. पुना पुना लगट्यावाणी इचारलं. त म्हणी पोतड्यावर लिवेल आसल, जावून पाह्य... लय लय आवदा हायेत साल्या आपल्या. पाच पोतडे मुंग इकाय आठ रोज लागले. नंबरच लागेना. लागेना म्हन्ल्यापेक्षा लावत ना. कास्तकारास आसे जेर जेस करायचं. मंग काय? तोंड बोलल्या भावानं टाक्ते इकून. आपल्या जवळ मुंग व्हते, तवर भाव काय त सहाशे - सातशे. आपल्या घरातून सुपडा साफ झाले, की झाले हजार बाराशे. आजब तमाशा हाये साला; आजब तमाशा हाये..."

बाबुराव आढाव अशी बडबड करत होता. पण तुकाराबुवाचं त्याच्याकडे अजिबात ध्यान नाही.

"मायनी; मपल्या पोतड्याचा कधी येईल त येवो बुवा नंबर. कधी व्हईल त व्होवो बुवा काटा..." असं तो मध्येच धास्तावल्यासारखा बोलला.

"काई येत नाही लवकर!"

"पण मले त पैशाचं लय काम हाये आर्जेन्ट. गव्हास युरिया द्याचा. बायकोस दवाखान्यात न्याचं."

"म्हणूनसन्यास तुले म्हन्तो. सम्दे करून राह्यले. तसंच तूबी कर. आता काई हेलपाटे खात नको बसू. मन्नू व्यापाऱ्यास देवून टाक."

"त्यो त लयदा म्हणी मले. पण त्यो दीडशेच्या भावात मागते फक्त. म्हंजी पोत्यामागं शंभराचा घाटा. सम्दा मिळून दोन हजाराचा घाटा. इकडी त आपून कवडी कवडीसाठी मौताद हाये. अन् लगी दोन हजारांचा घाटा?"

"ऐरी आपल्या नशिबात तोटाच हाये. नशिबात तोटा अन् मस्तकात गोटा... आपला जलमच खोटा!"

म्हणताना बाबुराव आढाव करवादून उठला.

"जातो बिट्या. वावरात जायाचं भाकर खाऊन ..." असं म्हणून उभा झाला. हात उंचावून त्याने आळस झटकला. अन् रस्त्याने चालाय लागला.

बाबुराव आढाव उठून गेला. तसा तुकारामबुवा एकदम पोकळ पोकळ झाला. आतल्या आत दाट-गरगट दाटून आलं. उदास उदास वाटाय लागलं. आपल्याच घरापुढे असून आपण दुसऱ्याच कोणाच्या

दारी मर्तकीला आलो का सावडाय आलो, असं त्यास वाटाय लागलं. अनेक चिंता, अनेक फिकरा काळजावर पावसाळी शिदोडासारख्या वळवळाय लागल्या. त्याच्यानं तो बेजार झाला. कसमसून आला. खिशातली अर्धी बिडी झुरकाय लागला. पण काही मजा नाही आली. कारण बिडीत तंबाखूच नव्हता. सूर ऽ सूर ऽ करत दोन झुरके ओढले. अन् फेकून दिली.

तर तेवढ्यात पंढरीच्या बोळातनं पोरगं येताना दिसलं. वावरातून येत होतं.

"कारे आजाबराव, झाला का लगी उपसा काढून..."

"नाई झाला!"

"मंगसन्या कावून आला वापीस?"

"एक घोरघंट्या झाला..."

"काय झालं?" विचारतानी तुकारामबुवाचं काळीज भाता झालं. कळेना वळे, पण धडधडाय लागलं.

"पह्यलेच त त्या मरूड्या गव्हास पाणी द्यावं वाटत नवतं. निरानाम फडे फडे झाला व्हता. सम्दा सोकाटला व्हता. सपकल्या विमार माणसासारखा..."

"आरे पण आता देवूच न मायच्यान युरिया."

"आता काय फायदा बा! टूक इचकल्यावर. बेमारी हाये तवर आवशीदाचं काम. आता काय? बिन आवशीदाचं खांडूक फुटलं तुमचं."

तर त्याच्या या कोड्यात बोलण्याचा तुकारामबुवाला एकदम रागच आला.

"आरे आसा काय बताळून राह्यला नशापाणी केल्यावाणी. काय झालं ते सरकं वरकं सांग नं!" तुकारामबुवा असं त्याच्यावर करवादत म्हणाला.

"आपली मोटार जळून खाक झाली."

गालात फाड्कनी तमाचा मारावा तसे पोराचे शब्द वाटले. डोळ्यांपुढे चमचम काजवे चमकले अन् सुईसारख्या विजाचे तरंग खालून वर अन् वरतून खाली असे तरंगाय लागले.

पोटात एकदम झोंब आली. छाताडात धडक् धडक् करत होतंच, तर आता अंगात थंडी झोंबाळून आली. त्याच्यानं उभा आडवा थरथराय लागला.

"आशी कशी जळाली बापा महागा-मोलाची मोटार?" भांड्यावर खिळा टिचरावा, तसे त्याचे शब्द आले.

"आता तिचं काय सांगावं? मशनरी हाये ती. जनावराच्या अन् मशनरीच्या मनात काय हाये ते काय वळखता येते?"

"बुऽ रा ऽट देवा बुर्राटऽ" म्हणताना तुकारामबुवा कापसाच्या पोत्यासारखा एकदम ढिल्ला फसाक झाला.

"झालं आशीन व्होल्टेज कमी जास्ती. गेली जळून..."

आजाबराव सहज बोलल्यावाणी म्हणाला. तर पोराचा जमके राग आला. साली, मोटार जळून खाक झाली अन् ह्या बुराट बटक्या पोरास काईच गम नाई. गडीमाणसानं मालकास सांगावं. तसं आपल्याला सांगाय लागला. जशी काही ती मोटार त्याची नाईच. जशी काई शेजाऱ्याचीच मोटार जळली. दुकाचं लवलेशबी नाई याच्या थुत्तरावर. विलकूल बिनफिकीर. याले काई लाज सरभ?"

"आरे तू कसा बिनफिकीर राहून सांगाय लागला बिट्या. जसा काई तू मालकच नाई.



अनुक्रमणिका






जसा काई कामावरचा गडीमाणूसच हाये..."

तशी इतक्या दिवसांची वखवखणारी आग ओठावर दाटाळून आली. "तसंच करून ठेवलं तुमी मले..."

"कसं काय रे बाबा! आसं कावून म्हन्तू?" भांड्यावर खिळा घासल्यासारखा आवाज चिरकला. नरड्यात बेंडका घरडला.

"ऐरी काय हाय त! नुस्तं खाय अन् काम कर! आसा झालो मी..." असं म्हणून आजाबराव पुन्हांदी भारीबदक आवाजात म्हणाला, "किती दिवसांचा सांगून राह्यलो. येईन त्या भावान जवारी इका. गव्हास युरिया द्या. बदबद गव्हाची झडती घेऊ. पण तुमच्या हलगर्जीपणानं गव्हाचं आगाईत सम्दं बरबाद झालं. पन्नास पोते व्हायचं तिथी ईस पोतेच व्हतान आता... अन् काय हुरूप येणार हाये मले. माहं काई आयकतच नाई तुमी, त कशाचं सुक-दुक वाटून घेऊ मी?"

"आरे पण हे सम्दं तुह्याचसाठी करून राह्यलो न मी. पिकलं पान दोन दिवसाचं सोवती. पटकनी गळून जाईल. मग काय? तुपल्याच हाती कारभार. टाक्याटाक्यानं संसार सांधायचं करतो वावा मी." असं गहिवरून आल्यागत बाप म्हणाला. तर त्याच्यानं पोराचं काळीजही कापूस झालं.

"किती पैसे लागतान मोटार भरायास?" बापाने विचारलं.

"लागतानं पाचकशे रुपये!" पोराने सांगितलं. "तेवी आर्जन्ट. आर्जेन्ट मोटार भरून, आर्जेन्ट युरिया द्यावं लागणार हाये. तर त आपली आव राहील आवंदा. तर तच गव्हाचं पिकं होईन. नाई त काई खरं नाई. साळ सुके हुल्डा फुके... आशी गत व्हईन आपली."

"मग त आता जवारी इकनं आलीच व्यापाऱ्याले?"

"तेच त मी किती दिवसाचं सांगत व्हतो. की हे सोसायटीवाले आपला ठाक लागू देणार नाईत. सगळ्याची सांगड हाये त्याह्यची. व्यापारी, दलाल, मापारी, साहेब, सम्दे एका माळेचे मणी...दणकावून हुली येवास्तोर खुडण खाय लागले..."

"जातो मंग, येतो सौदा करून मन्नू शेठशी..."

"पह्याले जा. नाई त काई फायदा व्हनार नाई. साप गेल्यावर फरकांडीले मारल्यावाणी आबदा व्हतानं आपल्या. आगाईत वाळून गेल्यावर मगसऱ्या पाणी द्या, का युरिया द्या. काई फायदा व्हनार नाई."

तुकारामबुवा गोदामाच्या आवारात आला. तर एकदम त्याला गर्दी दिसली. लोक धावत पळत गर्दीकडे जात होते. तर गर्दी आणखी फुगत चालली होती. तिकडं आरडा-ओरडा कलमा हलम कसा वाढतच चालला होता. कोणाची तरी हाणामारी सुरू होती. धराधरी, पळापळी, पाडापाडी असं वेगात सुरू होतं.

'हाणाऽ हाणाऽ मेलोऽ मेलोऽ' असं सुरू होतं.

तुकारामबुवाही पळी लागला. तर आता गर्दी कारंजे फुटल्यासारखी फुटली. वारूळ फुटल्या मुंग्यासारखी झाली. मार खाल्लेले दोघे जण सुसाटात रडत-भेलकांडत डांबरी रस्त्याकडे पळाय लागले होते.

"आता तुमची सोय लावतो..."

"पोलीस ठेसणात जावून रिपोर्ट देतोऽ"

"हाथकड्याच लावतो..."

असं पुढे पळणारे म्हणत होते.

त्यांच्यामागे धोतराचे घोळ सावरत आणखी काही पळत होते.

"आरे थांबा...तुमचे हात मोडून गळ्यात बांधतो..."

"हरामखोराहो पोतड्यात हाडकं भरून नदीत फेकतो..." असं म्हणत होते.

पुढचे पळणारे पडत-झडत जीवाच्या आकांताने तसेच पळत लोखंडी फाटकाबाहेर गेले. पलीकडच्या डांबरी रस्त्याने धावत धापाळत गावाकडे पळी लागले.

"काय झालं? काय झालं?" तुकारामबुवाने एकास विचारलं.

"करतवाडीच्या कास्तकारायनं सोसायटीच्या सायबास अन् मापाऱ्यास टेपारलं." सांगणाऱ्याने सांगितलं.

"कावून ते?"

"तुमाले काका माहीत नाई..."

"अहो रातोरात व्यापाऱ्याच्या सहाशे पोत्याचं माप झालं. त्याच्यानं मयन्यापासून लायणीत वसेल, हैराण होयेल कास्तकार भडकले. खुडण खाणाऱ्या सायबास त्याह्यनं टेपारले..."

"बरं झालं! आसंच पाह्यजे."

"आरे कशाचं बरं झालं? आता बारा भानगडी मागं लागतान. ये घोरा, बैस पाठी, आशा आबदा व्हतानं आता. हे सायेब ठेसणात रिपोर्ट देतान. मंग काय? कोर्टकचेऱ्या. लंबे व्हायचे धंदे व्हतान आता हे. पुन्हांदी काटावी लवकर व्हनार नाई आता. एकु हाप्ता या बारा भानगडीत जाणार."

"ऐरी तरी काटा कुठी लवकर व्हनार व्हता..."

म्हणताना तुकारामबुवाच्या डोळ्यांत संतापाचा भडका दाटाळून आला... महिन्यापासून आपण ज्वारी आणून टाकली ते आठवलं. थंडीवाऱ्यानं रातरातभर इथं जागली केलेल्या आठवल्या. डोक्सं दुखणारी बायको आठवली. पोरीची सोयरीक आठवली. गव्हास युरिया दिला नाही, पीकं बुडालं म्हणून खळखळणारा आजावराव आठवला. जळून गेलेला मोटार पंप आठवला. दीडशेच्या भावानं ज्वारी मागणारा मन्नू शेठ आठवला...मन्नूशेठ आठवला, तशी त्याची अवस्था भडकल्या निखाऱ्यावर पाणी शिंपडल्यासारखी झाली. पेटून उठललेलं मन गार झालं.

माणसांच्या गर्दीत त्याचे डोळे मन्नुशेठला शोधाय लागले. तसाच शोधत आवारात भिरभिराय लागला.

एकदाचा पोतड्याच्या थप्पीवर बसून बिडी ओढणारा मन्नूशेठ गावला. तसा तो त्याच्याजवळ गेला. मन्नूशेठ आपल्या जवळ बसल्या माणसाशी बोलत होता.

"राम राम मन्नूशेठ." त्याने हात जोडून कमरेत वाकून रामराम केला.

"राम राम! बोला, तुकारामबुवा!"

"काई नाई, मपली जवारी घ्या म्हणत व्हतो."

"आता? आता नाई घेत बाप्पा जवारी न फवारी. इतला खेळखंडोबा झाला इथी. आता जवारी खरदाय मी का म्याड झालो. इतक्यांदी तुमची खुशामत करत व्हतो, त आटरून बसले व्हते. तागाच्या धांदीवाणी. आता इकडी आसा खेळखंडोबा झाला. सोसायटीवाले जवारी घेणार नाईत. ते वळखून माह्याकडं आले. हुशारचं दिसता लय."










"तसं नाई हो, मपलं सकाळ पाह्यटं घरीच ठरलं व्हतं. वावरातली मोटार पंप जळली. त्याच्यानं आर्जेन्ट काम व्हतं पैशाचं. हुशारी बिशारी काई नाई. इचारा तुमी आजाबरावाले. आर्जेन्ट काम हाये पैशाचं...." असं तुकारामबुवा काकुळती येत म्हणाला. एकदम मांजरीपुढच्या उंदरावाणी लाचार लाचार झाला.

"आहो तुमचं गंज गंज आसंल आर्जेन्ट काम. पण मापल्याजोळ नाई नं आता दाम! मीच त करून राह्यलो झाम झाम... सायेब लोकांस मारलं. आता मार्केट बंद राह्यणार. मह्यना पंधरा दिवस. आता कोण इकत घेणार हाये आमची जवारी. जी घेल हाये तीच घरी न्यावं लागणार हाये उचलून. नाई त इथं गधडे न् डुकरं टाकायचे ती कुचलून..."

"ते तुमी काई करा. पण माही नड भागवाच. मापली बायको जळली. मोटारीचं डोस्कं दुखाय लागलं. तिले अकोल्यास न्यावं लागते."

"हँ हँ हँ ! काय झालं?"

"नाई. मोटार जळली. बायकोचं डोस्कं दुखून राह्यलं."

"हँ हँ हँ! काय भाव देता बोला?"

"काय भाव म्हंजी? तुमचा त्योच भाव दीडशे रुपये क्विंटल."

तसा मन्नूशेठ एकदम खदाखदा हसाय लागला. पराड्यावरून एकावर एक दगड लोटावेत तसं त्याचं हसणं वाटलं.

"आरे येडे झाले का राजे हो? तव्हाची गोष्ट आलक व्हती. आताची गोष्ट आलक हाये. तव्हा आमचा माल हमखास खपणार व्हता. आता घरी नेवून साठवावं लागणार... आता इसरा दीडशे रुपये भाव."

"नाई हो. आसं नका करू. मले लय आरजन्ट काम हाये."

"त्याले काई आपला इलाज नाई. सव्वावशे रुपये भाव देतो आता. द्यायची आसंल तर द्या. नाई त मोकळे खेळा. हाणा घणंगडडी."

असं मन्नूशेठ शेवटचं म्हणाला. त्याच्यानं तुकारामबुवाच्या हातापायवरनं वारं गेल्यावाणी झालं. कुसातून मोडल्या औतावाणी कंबर कचकून गेली. तसा तो मटकन खाली बसला. केविलवाण्या डोळ्यांनी मन्नूशेठकडे पहायला लागला. मन्नूशेठ पोतड्याच्या थप्पीवर बसून बिडीचे झुरके मारत होता... सावकाश !

□

सदानंद देशमुख
मु. पो. जानेफळ, ता. मेहकर,
जि. बुलढाणा

---

## स्वागत

- **हैदराबादचा मुक्तिसंग्राम आणि मी :** डॉ. गोपाळराव जोगाईकर, नीहारा प्रकाशन, पुणे. पृष्ठे १२८
- **चिमुकली इसापनीती आणि सकाळचा अभ्यास :** रा. ग. गडकरी, शिव पब्लिकेशन्स, पुणे, पृष्ठे ३१
- **विज्ञानाची वाटचाल :** प्र. न. जोशी, भाग : १, २, व ४, पृष्ठे ५६ (प्रत्येकी)
- **गणिताच्या गंमती :** अशोक प्रभू, शिव पब्लिकेशन्स, पुणे, पृष्ठे ३२










## मशागत : लेखनातील यश ! / सदानंद देशमुख

*आज शेतीचा व्यवसाय आतबट्ट्याचा झाला आहे. त्याला दोन कारणे आहेत. पहिले कारण नैसर्गिक आहे. तर दुसरे मानवनिर्मित म्हणता येईल. लहरी पाऊस जेव्हा यायचा तेव्हा येत नाही. म्हणजे न आल्यामुळे शेतकरी अर्धा बरबाद होतो. त्यात अधून मधून शिपक शिडकावा येत राहतो. अर्धी सुगी हाती येऊ लागते तर अवकाळी आभाळ वैरी होऊन जोर धरते. आणि हाती येणाऱ्या सुगीची धुळधाणी होते. असं विचित्र वल्लंसुकं सुरू राहते. आणि अर्धी कास्तकारी इथंच तुटून जाते. भरपूर उत्पादनखर्च लागतो. तो अर्धाही वसूल होत नाही. अशा वेळी घरखर्च चालवणे, संसारासाठी नवं काही करणे, उदा. लग्न, सण-उत्सव, कपडालत्ता-घरबांधणी, चांगला म्हटला जाणारा शेतकरी जो केवळ शेतकीच्या भरोशावर आहे, करूच शकत नाही. आहेत ती जिकण्या लावलेली जुनाट घरं खचत जातात. शेतकरी कर्जाच्या दलदलीत फसत जातो. शेतकऱ्यांना ग्रासणारे दुसरे कारण आहे कायम त्याचे शोषण करणाऱ्या बाजारपेठा. शेतकरी विकतो त्या शेतमालाच्या किंमतीत आणि व्यापारी विकतो त्या किंमतीत प्रचंड तफावत असते. उदाहरणच द्यायचे झाल्यास शेतकरी ज्या मुगाची किंमत मार्केटात हजार बाराशे रुपये प्रती क्विंटल घेतो. त्या मुगाचा सोल किंवा डाळ तीन हजार रुपये प्रती क्विंटल व्यापारी विकतो. अशी सगळ्याच शेतमालाची अवस्था, म्हणजे व्यापारी व दलाल यांच्याकडून प्रचंड पिळवणूक, आणि अडवणूक.*

*अशा या शेतीच्या अभावग्रस्त अवस्थेत, वातावरणात १९७५ ते १९८६ या काळात मी स्वत: शेतीवर रात्रंदिवस प्राणपणाने राबलो. आणि एवढे ढोरकष्ट जर पुस्तकाच्या दुनियेत घेतले तर काही तरी बरं होईल या जाणिवेने त्या उमद्या वयात जीवजोड अभ्यास करून प्रथम श्रेणीत एम्.ए. झालो. दरम्यानच्या काळात १९७८ पासूनच माझ्या शेतकऱ्यांच्या व्यथा मांडणाऱ्या कथा महाराष्ट्र टाइम्स, किर्लोस्कर, तरुण भारत, लोकमत इ.नियतकालिकातून प्रकाशित होऊ लागल्या होत्या. आत्मबळ येत होतं लेखनाच्या संदर्भात. आपण ग्रामीण भागाचं हे फार मोठं दु:ख ग्रामीण भागात राहूनच साहित्यातून मांडू शकू असं वाटून हेतूपूर्वक नोकरीही ग्रामीण भागातच स्वीकारली. आणि लेखनाचं सुरूच ठेवलं. लचांड, उठावण, महालूट, हे कथासंग्रह आणि 'तहान' ही कादंबरी अशी चार पुस्तके प्रकाशित केलीत मेहता, आणि कॉन्टिनेन्टल या दर्जेदार प्रकाशनसंस्थानी. १९७८ ते १९९८ या वीस वर्षाच्या काळात चार पुस्तके म्हणजे एका पुस्तकास सरासरीत पाच वर्षे एवढा कालखंड. याच गतीने म्हणजे पाच वर्षातून एक पुस्तक नवं यावं हाच मनोदय असतो मनात. एक पुस्तक लिहूनही माणूस लेखकच ठरतो आणि शंभर पुस्तके लिहूनही. मग उगीच आटापिटा करून शरीराला त्रास देऊन फोकलट निर्मिती कशासाठी करावी?*

*लेखन प्रत्यक्ष सुरू नसलं तरी रिकाम्या वेळात अनुभवाला भिडणं, चिंतन, मनन, टिपणं, असं सुरूच ठेवावं लागतं. ही मशागत जेवढी जास्त तेवढं लेखन बरं उठू शकतं. अर्थात हे माझं वैयक्तिक मत. हेही नम्रपणे सूचीत करावं वाटतं.*

*'महालूट' ही कथा कुठल्याही प्रदेशातील शेतकऱ्याची कथा होऊ शकते. हा अनुभव बराच काळ मनात मुरत होता. आधी त्यावर 'हमीभाव' ही कविता लिहून झाली होती. शेतकरी हाच एक*



अनुक्रमणिका






असा विक्रेता आहे की तो त्याच्या शेतमालाची किंमत ठरवू शकत नाही. दलाल, अडत्यांनी ठरविलेली किंमत मान्य करून पोतडे झटकत, मातेरे सावटत, मिळालेले अल्प दाम हाती घेऊन त्याला मार्केटातून परतावे लागते. हाती आलेल्या एवढूशा पैशात गरजा अनंत असतात. त्या पूर्ण होऊच शकत नाहीत. शेतकऱ्यांच्या फायद्याच्या योजना कधी कधी एखादं सरकार कनवाळू होऊन आखते. शेतमालाला 'हमीभाव' ही सुध्दा त्यातलीच एक. पण या योजनेतील शोषणकर्ते शेतकऱ्यांची पिळवणूक कशी पध्दतशीर करतात याचं प्रत्ययकारी चित्रण 'महालूट' या कथेत करू शकलो याचं मला समाधान आहे. समाधान यासाठी की या कथेचा महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या संपादकांनी दशकाच्या कथेत स्थान देऊन गौरव केला. त्याच प्रमाणे चार वर्षापूर्वी मुंबईच्या हेमांगीने घेतलेल्या वि. स. खांडेकर कथास्पर्धेत या कथेला प्रथम क्रमांकाचा पुरस्कार मिळाला होता. आणि महालूट कथासंग्रहास महाराष्ट्र शासनाचा राज्य पुरस्कार सुध्दा!

एकूण आजच्या सामाजिक व राजकीय व्यवस्थेत ग्रामीण समाजाच्या विकासाकडे जसं दुर्लक्ष होतं, तसं आजच्या साहित्य व्यवहारात ग्रामीणांच्या व्यथा मांडणाऱ्या माझ्या सारख्या दूरवर कानाकोपऱ्यात राहून निष्ठेने साहित्य लिहिणाऱ्या ग्रामीण लेखकाकडे साहित्यातील मान्यवरांचं दुर्लक्ष होत नाही, ही समाधानाची बाब आहे. ☐

---

## स्वागत

- ☐ **निरामय सौंदर्य आणि आयुर्वेद :** खडीवाले विनायक प. वैद्य, नीहारा प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६४
- ☐ **हंसगान :** मा.श्री.गोखले, नीहारा प्रकाशन, पुणे. पृष्ठे १६०
- ☐ **ते दहा दिवस :** मधु कुलकर्णी, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ११७

**सुगावा प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने**

- ☐ **डॉ. आंबेडकर यांचे सुविचार :** चिंतामण मोरे, पृष्ठे ३२
- ☐ **अनुभव :** फ.म.शहाजिंदे, पृष्ठे ८०
- ☐ **ब्राह्मणी आक्रोश :** विलास वाघ, पृष्ठे १०४
- ☐ **देवदासी शोध आणि बोध :** वसंत राजन, पृष्ठे ८०
- ☐ **आंबेडकरी चळवळ आणि हैदराबाद संस्थानातील दलित मुक्ती संग्राम :** प्रा.डॉ.एल.वायू. औचरमल, पृष्ठे १५१
- ☐ **दलित साहित्याच्या नामांतराचा वाद :** धम्मपाल रत्नाकर, पृष्ठे १००
- ☐ **आकाशदिवे :** मधु जामकर, पृष्ठे १४९
- ☐ **महाराष्ट्रातील राजकारणाचे साहित्यातील प्रतिबिंब :** संपादक विलास खोले, पृष्ठे ९६
- ☐ **कालचक्र :** वि. शं. पारगांवकर, पृष्ठे २१८
- ☐ **कोरस :** विश्वास वसेकर, डिंपल प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ८५, मूल्य ७० रुपये
- ☐ **राजे शिर्के घराण्याचा संक्षिप्त इतिहास :** राम राज शिर्के प्रकाशक स्वत: लेखक, कोल्हापूर, पृष्ठे १६८










# चोरावर मोर



भा. ल. महाबळ



या मंडळी, या बसा. हे मधलं दार लावून घेतो. का? असं विचारता?

या दाराच्या पलिकडं स्वयंपाकघरात आहे एक सुंदर मुलगी. काय म्हणता - किती सुंदर? कसं काय वर्णाव तिचं सौंदर्य? दूध, केशर, चंदन, चंद्र, तारे, गुलाब, प्राजक्त, रंभा, उर्वशी, गजगती, सिंहकटी वगैरे, वगैरे, पदार्थ मिक्सरमध्ये गरागरा फिरवा आणि वर येणारं लोणी काढा. या दाराआडच्या मुलीच्या सौंदर्याला अशा लोण्याचीच उपमा देता येईल! दाराआडची ही मुलगी माझी बायको आहे; नाव निर्मला.

या सुंदर मुलीला मी कसं गटवलं याचं ज्याला त्याला आश्चर्य वाटतं!

हे काम साधं सोपं नव्हतंच मुळी! एकीकडे हा सारा एका हुषार तरुणाचा पराक्रम आहे; तर दुसरीकडे ही बावळट मुलीची शिकार आहे!

एव्हाना, तुम्हाला, तो हुषार तरूण म्हणजे मी व ती बावळट मुलगी म्हणजे आमची बायको निमा हे कळलंच असणार!

या एवढ्या सुंदर मुलीला मी कसं गटवलं हे ऐकायची तुम्हाला उत्सुकता असणार! आणि ही सुरस कथा सांगायची माझी अनिवार इच्छा आहेच. लग्न झाल्यापासून मी ज्याला त्याला हेच सांगतो आहे; तुम्हालाही सांगणार आहे.

म्हणून तर मधलं दार कडी लावून घेऊन बंद ठेवलं आहे! मी जे सांगणार आहे ते जर दारापलिकडच्या, लांबलोंबत्या झुंबरांनी नटलेल्या, पाकळ्यासारख्या कानांनी ऐकलं तर—बापरे, मग माझी वाटच लागेल! ही आमची बायको निमा म्हणजे पावसाळी आकाश आहे; जरा मनाविरूद्ध झालं की ही पापण्या काळ्याशार डोळ्यांच्या डोहात फडफडणार, चमकदार मोत्यांचे आसू टपाटपा ढाळणार आणि केशरी गालांना चिंब भिजवणार. मग पाया पडता पडता, नाकदुऱ्या काढता काढता, आर्जवं करता करता आमच्या दिवसाचं व प्रॅक्टिसचं वाटोळं. म्हणून ही दार बंद करण्याची सावधगिरी!

माझी प्रॅक्टिस आजकाल झकास आहे. मी मुंबईचा एम्.बी.बी.एस्. आहे. खरं पाहता मी या नाशिकला येतोय कशाला? पण मुंबई - पुण्याला डॉक्टरांची खेचाखेच झाली होती; म्हणून मी नाशिक जवळ केलं.

नाशिकला येण्याचं दुसरं एक कारण आहे. आमच्या मेडिकल कॉलेजात पहिल्या एक दोन वर्षात 'तुम और मैं' अशी जमवाजमवी करण्याची प्रथा आहे. माझ्या सगळ्या मित्रांनी आणि मैत्रिणींनी निवडानिवड करून टाकली. त्यामुळं एम्.बी.बी.एस्. झाल्या झाल्या










आमची काही मित्रमंडळी जोडीजोडीनं प्रॅक्टिस, काही जोडजोडीनं एम्.डी., एम्. एस् चा अभ्यास करू लागली. मला खूप एकाकी वाटू लागलं. कारण दहा बारा मैत्रिणी अशा होत्या की ज्यांनी विचारलं असतं तर मी नाही म्हटलं नसतं. मुंबईत रहायचं तर या पराभवाच्या दहा बारा निशाण्या दररोज पहाणं आलं! त्याही पुन्हा आपल्या मित्राच्या पत्नी म्हणून मिरवताना ! म्हणून नाशिक निवडलं !

नाशिकात आलो, नेहरू रोडवर भाड्याने जागा घेतली व डॉक्टरकी चालू केली!

आलो तेव्हा प्रक्टिस पूज्य होती; अहो, पाटीवर मारे एम्‌बीबीएस् (बॉम्बे) म्हणून लिहिलं; पण पेशंटच्या आजारी मेंदूत बाँबेचा डॉक्टर म्हणजे अफाट बुद्धीचा डॉक्टर हे समजायला हवं ना?

प्रॅक्टिस नसण्याच्या काळात मी सिंहावलोकन, आत्मपरीक्षण व एकूण अवतीभवती निरीक्षण केलं.

सिंहावलोकन केलं तर लक्षात आलं की आपण जन्माला तर एकटे आलो, कॉलेजात एकटे शिरलो, कॉलेजातून बाहेर पडलो तेही एकटे. या जगातील व कॉलेजातील आजवरचं वास्तव्य फुकट गेलं!

आत्मपरीक्षण केलं तर लक्षात आलं की आपली बुद्धी, धडाडी, कल्पकता बिनतोड आहे. आपण सरळसरळ हिरा आहोत. आपल्याला कोंदण मिळालं नाही हे कोंदणाचं कमनशीब आहे, आपलं नाही!

अवतीभवती निरीक्षण केलं तर लक्षात आलं की आपल्या दवाखान्याच्या समोरच एक कोंदण आहे; समोर दत्तोपंत मोकाशी नावाचे गृहस्थ रहातात, ते शाळेत शिक्षक आहेत व त्यांना कोंदण नावाची, नव्हे निर्मला नावाची झकास मुलगी आहे!

एका संध्याकाळी मी धीर केला. संध्याकाळी दत्तोपंत फिरायला जातात, वहिनी देवळाकडं जातात हे मला निरीक्षणातून माहीत झालं होतं.

"घरात कोणी आहे का?" मी आरोळी दिली. निर्मला बाहेर आली आणि हसत हसत म्हणाली, "या या, डॉक्टर काही विशेष?"

आपण खलास! ही मुलगी लाजत नाही, मुरकत नाही, बाहेर येते व सहज आपली चौकशी करते!

"मला ओळखता तुम्ही?" मी चाचरत विचारलं.

"ओळखता म्हणजे? आपण डॉ. पळसुले. तुम्ही आमच्या समोरच दवाखाना थाटला आहे!"

"मला पाणी हवं होतं. दवाखान्यात झाडलोट करून ठेवणाऱ्या बाई सकाळी पाणी भरून ठेवतात. पण त्या विसरल्या आज आणि तहान ही गोष्ट अशी आहे, लागली की लागली. हो, मी तांब्याभांडही विसरून आलो आहे, तुमच्याकडचा द्या." मी माझ्या येण्याचा खुलासा केला.

कोणालाही सहजी पटेल असा हा खुलासा नव्हता. माझ्या दवाखान्याच्या आसपास काही कमी घरं होती? मग या मोकाशी मास्तरांच्या घरातूनच पाणी का हवं होतं? आता पाण्याला जायचं तर तांब्याभांड विसरून का जावं? माझी तहान पाण्याची होती का मोकाशींच्या घरच्या पाण्याची होती?

माझ्यासारखा हुषार मनुष्य जर निर्मलाच्या जागी असता तर हा समोरचा डॉक्टर साधा सरळ नाही, हा माझ्या शिकारीवर आहे हे मला — म्हणजे मी निर्मला असतो तर मला



भा. ल. महावळ
जन्म ३ ऑगस्ट १९३२
शिक्षण : बी.एस्‌सी. ऑ. १९५३
बी. ई. सिव्हिल इंजि. १९५८
एम्. ई. सिव्हिल इंजि. १९६४
नोकरी व व्यवसाय : व्ही. जे. टी. आय्.
माटुंगा, मुंबई ४०० ०१९.
१९९२ साली सिव्हिल इंजिनियर
विभागाचे प्राध्यापक व खातेप्रमुख
म्हणून निवृत्त.

**लेखन :**
खालील पाच कथासंग्रह प्रसिद्ध झाले
आहेत.
अस्सा नवरा : १ मे १९९१ विनोदी
कथांचा संग्रह
नवरा बनवावा तसा बनतो :
१५ सप्टे. १९९३ विनोदी कथासंग्रह
रम्य स्त्री, अगम्य स्त्री! २५ सप्टे.
१९९४ गंभीर कथासंग्रह
कडू मधुचंद्र : २५ सप्टे. १९९४ विनोदी
कथासंग्रह
शंभर धागे प्रेमाचे १५ ऑगस्ट १९९७
विनोदी कथासंग्रह

**पुरस्कार :**
नवरा बनवावा तसा बनतो या संग्रहास
महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक पथ,
पुणे ३० यांचा ९३/९४ चा कै. चिं.
वि. जोशी पुरस्कार
वरील संग्रहास महाराष्ट्र शासन मराठी
वाङ्मय विनोद १९९३/९४ करता विशेष
पुरस्कार
शंभर धागे प्रेमाचे या विनोदी कथांच्या
संग्रहास 'सार्वजनिक वाचनालय,
नाशिक' यांचा प्रा. वि. मा. दी.
पटवर्धन पुरस्कार १९९७-१९९८ करता.
इतर लेखन : म. टाईम्स, दै. लोकसत्ता,
सकाळ, दै. सामना, चारचौघी, मेनका,
जत्रा, माहेर, विशाखा, रोहिणी वगैरे
मासिकात, दिवाळी अंकात.

**आगामी पुस्तके :**
खून चालू, रस्ता बंद! - पोलिसकथा,
वेल वृक्षाला आधार - कथासंग्रह
संसाराची रमी - विनोदी कथासंग्रह,
नांदा सौख्यभरे - कौटुंबिक लेखसंग्रह
हसरे स्वगत - विनोदी लेखसंग्रह,
हसरी चोरी - हास्यचुटक्यांचा संग्रह

पाच मिनिटात कळलं असतं!

पण ही आमची बायको - पूर्वाश्रमीची निमा मोकाशी - एक नंबरची बावळट!

"आमचं तांब्याभांडं जा ना घेऊन" असं निमा म्हणाली.

हा तर माझा डाव होता! तांब्याभांडं परत करायच्या निमित्तानं पुन्हा जायला मिळावं ही योजना होती!



अनुक्रमणिका







दुसऱ्या दिवशी मी पुन्हा सकाळीच तांब्याभांड पोहचवायला गेलो. मोकाशी मास्तर वृत्तपत्रात हरवलेले, मोकाशी वहिनी स्वयंपाकघरात. निर्मला कॉलेजात गेलेली. सकाळी हे असंच असणार हे मी निरीक्षणातून हुडकून काढलं होतं. मला निर्मला हवी होती, पण त्या सकाळी नको होती. माझ्या बुद्धीची खरी करामत अशा व्यूहरचनेत दिसून येते.

मी तांब्याभांड पुढं केलं. मोकाशी मास्तर बुचकळ्यात. त्यांनी वहिनींना बोलावलं. त्यांच्या घरचं तांब्याभांड माझ्या हातात म्हणून त्या बुचकळ्यात. मी खुलासा केला.

वहिनी म्हणाल्या, "ही आमची निमा आहे नंबर एकची धांदरट. आता तुम्हाला तांब्याभांड दिलं आहे ते मला सांगायचं नाही? चहा घेऊन जा हं."

निर्मल बावळट आहे हे माझं मत, ती बावळट आहे हे तिच्या आईचं मत! माझ्या मताला पुष्टी देणारं!

त्या सकाळी मोकाशी मास्तर व वहिनी यांच्यावर मी अशी छाप पाडली म्हणता!

म्हणजे मी छाप पडायला काही विशेष केलं असं नाही. मी बोलायला लागलो की माझी छाप पडतच जाते!

मोकाशीमास्तर व वहिनी प्रश्न विचारत होते, मी उत्तरं देत होतो. मी कोण, कोठचा, घरी माणसं किती, मामा काय करतात, काका काय करतात, वडील काय करतात, असले फालतू प्रश्न मास्तर व वहिनी विचारत होते. आता या प्रश्नांची जी उत्तरं येणार ती शुष्क, कोरडी, निर्जिव असणार असं कोणालाही वाटेल! आणि ते वाटणं चुकीचंही नाही!

पण असल्या प्रश्नांना माझी उत्तरं होती रसपूर्ण, तजेलदार, चैतन्यानं मुसमुसलेली! हे मला कसं जमतं हे विचारू नका. मला ही एक दैवी देणगीच आहे!

माझी उत्तरं कशी होती यांची उदाहरणं देतो!

मोकाशी मास्तरांनी मला विचारलं, "आपण डॉक्टर पळसुले हे माझ्या ध्यानात आलं. समोरच आपला दवाखाना आहे हेही समजलं. पण पळसुले कोण? कोठले?"

माझं उत्तर पहा हं.

"मास्तर मी कोण? हा प्रश्न तुम्ही विचारत आहात. पण मी कोण? या प्रश्नाच्या उत्तराचा शोध भल्या भल्या, अधिकारी, आध्यात्मिक व्यक्तींना लागला नाही. मला तरी तो कोठून लागणार? पण व्यावहारिक भाषेत मी अनंत सदाशिव पळसुले.सदाशिव पळसुले या रेल्वेतील निवृत्त अकाउंटस् ऑफिसरचा मुलगा!"

वहिनींचा प्रश्न, "भाऊ बहिणी किती?"

माझं उत्तर, "७५"कोटी भारतवासी हे माझे भाऊबहिणीच, व्यावहारिक भाषेत मी एकूलता एक."

"पुढं काय करायचा विचार आहे?" वहिनी

'अविचार करायचा नाही एवढाच विचार."मी.

मास्तर आणि वहिनी भारावून जाऊन माझ्याकडे पाहत होते!

पण माझी खरी करामत वेगळीच! माझ्या दवाखान्यात शुकशुकाट का, डॉक्टरी पेशाकडं मी धंदा म्हणून न पाहता धर्म म्हणून कसा पाहतो, डॉक्टरी व्यवसायात लबाड्या कशा चालतात व आपण एकदा का आपल्या मनाचा वारू (वारू म्हणजे घोडा हा अर्थ मी वहिनींना सांगितला) बेलगाम, मोहाच्या

चराऊ कुरणात सोडला तर चरणे हाच जीविताचा हेतू कसा ठरतो वगैरे मी ठासून सांगितलं.

आणि शेवटी सांगितलं, ''मी चार दिवसांनी म्हणजे येत्या रविवारी मुंबईला जात आहे. दवाखान्याकडे लक्ष असू द्या. आपल्याकडे मुली पाहणं हा एक भयानक प्रकार. अरे, या मुली पाहणं म्हणजे काय गाय, शेळी, मेंढी असा प्रकार आहे. दोन मनं जवळ येणं, दोन कुटुंबं जवळ येणं हे महत्त्वाचं. पण हेही खरं की या पद्धतीला पर्याय नाही. वडिलांचं पत्र आलं आहे. लेले म्हणून महाराष्ट्र शासनाचे सचिव आहेत. त्यांची एक मुलगी पाहून येतो. डहाणूचे कोणीतरी परांजपे म्हणून बागाईतदार आहेत त्यांची मुलगी पहावयाची आहे. आमच्या आई-वडिलांना सून आणावयाची घाई आहे. मला धंद्याचा जम बसवायची जरूर वाटते. पण आईवडिलांची इच्छा हीही महत्त्वाची.''

या लांबलचक संवादातून मी काय साधलं? सगळं साधलं! मी एकुलता एक आहे, थोरामोठ्यांच्या मुली मला सांगून येत आहेत, माझ्या लग्नाची निकड आहे वगैरे. आणि ही माहिती जाता जाता सांगून टाकली हे कसब माझं!

रविवार आला. बोलून तर बसलो होतो. मुंबईला जाणं भागच होतं. नाही, नाही-मुली वगैरे काही बघायच्या नव्हत्या. महाराष्ट्र शासन व डहाणू एवढं खरं, बाकी तद्दन थापा.

पण एक विश्वासानं सांगतो, तुमचं मन सरळ, साफ स्वच्छ असेल, इच्छा तीव्र असेल तर परमेश्वराला तुमच्या मदतीला यावंच लागेल!

आता हेच पहा ना, मी नाशिक-मुंबई सकाळच्या बसनं ६ आसन क्रमांकाचं तिकिट काढलं होतं.

त्याच गाडीचं, त्याच क्रमांकाचं तिकीट निर्मला मोकाशी हिला मिळावं हा योगायोग, परमेश्वरी संकेतच असला पाहिजे! मी आरामात माझ्या जागेवर बसलेलो, धावतपळत निर्मला हजर, माझ्या व तिच्या जागेचा क्रमांक एकच. मी खडा टाकला, ''अरे वा, पत्रिकेतले ग्रह जमोत न जमोत, राखीव जागेचा क्रमांक तर जमला!''

हाच तर माझा चमकदारपणा! निमा लाजली. मला तरी असं वाटलं!

सर्व बसच भरलेली. निर्मला बसणार कुठे? माझी जागा मी तिला दिली व मी उभा राहिलो. अर्ध्या एक तासाने ती म्हणाली, ''तुम्ही किती वेळ उभे रहाल हे असे? तुम्ही पण बसा होऊ दे अडचण!''

निमा मला असं का म्हणाली असेल? कारण मी अर्धा एक तास चमकदार बोलत होतो व छापेवर छाप टाकत होतो!

अर्ध्या तासात मी काय बोललो?

मी संसारातील माझ्या जोडीदारा-विषयीच्या अपेक्षा सांगितल्या; काही कुटूंबातून स्नेहाचा आपुलकीचा उबारा म्हणा किंवा झरा म्हणा कायम वाहताना आढळतो, तुमचं मोकाशी कुटुंब मला त्या कुटुंबापैकी एक वाटतं हे सांगितलं. एक ना दोन. मी पेशानं डॉक्टर, मी डॉक्टर मुलीशी लग्न करावं असं कोणालाही वाटणार; पण मला माझ्या घराचा दवाखाना करायचा नाही; साहित्य, कला, संस्कृती यांचा वावर मला घरात हवा; ॲनासिन, विक्स, कोल्डरीन यांनी घर मला भरायचं नाही; आर्टस् अभ्यासक्रमाला मी यासाठी महत्त्व देतो हे सगळं सांगितलं, यानंतर

मी सांगितलं की मला पुणे, मुंबई, कोल्हापूर, सोलापूर, सांगली, जळगांव, भुसावळ, मालेगांव वगैरे ठिकाणच्या मुली नको आहेत! म्हणजे माझ्या बुद्धीची कमाल पहा हं! नाशिकचं नांव घेतलं नाही.

थोडक्यात शिकारी शिकार कशी करतात तसं केलं! शिकारी मचाणावर बसतो, जंगलभर सगळे हाका घालत हिंडतात व शिकार उठवतात! फक्त मचाणाच्या आसपास हाका घालत नाहीत! शिकार मचणाकडं थांबतपळत, दमूनभागून येणारच आणि मग शिकाऱ्याने आरामात मचाणावरून गोळी घालायची! मी तेच केलं!

मी उभा राहून बोललो, मग बसून बोलत होतो. मग एकदा केव्हातरी निमा बोलली, "मी मुंबईला मावशीकडे पळून निघाले आहे. इकडं नाशिकला माझं लग्न ठरतं आहे. आज देण्याघेण्याची बोलणी आहेत. नानांच्याकडं उचलून द्यायला पैसे नाहीत, सोनं नाही. त्यांना प्रॉव्हिडंट फंडाकडं कर्ज काढायला हवं हे मला मुळीच मान्य नाही. मी चिठ्ठी ठेवून सरळ पळून आले आहे; कुठे जाते आहे हेही कळवलं नाही."

निर्मला हे बोलली मात्र, मी निर्णय घेतला. असा तडकाफडकी व वर शहाणपणाचा निर्णय घेणं ही माझी खासियत उर्फ स्पेशालिटी उर्फ मराठीतला त्या अर्थाचा स्त्रिलिंगी शब्द. नायक उर्फ हिरो होण्याची संधी खूपदा येते. ती संधी गमावता कामा नये!

पुढच्या स्टॉपवर एस्.टी. थांबली; मी निर्मलेला जरबेच्या आवाजात म्हटलं, "निमा खाली उतर. तुला घेऊन मला ताबडतोब नाशिकला जायचं आहे. मी तुझं काहीही ऐकून घेणार नाही

आवाजात एकाच वेळी जरब, अधिकार, आपुलकी दाखवणारी निमा अशी हाक मी योजनापूर्वक मारली. बुद्धी व कल्पकता यांचा पाक म्हणजे ही हाक.

शिकार जमली; बावळट पोरगी गटली!

परतीच्या स्पेशल टॅक्सीच्या प्रवासात मी एकही शब्द बोललो नाही, चमकदार मौन पाळलं! मधून मधून निमाकडं पहायचो. डोळ्यांत कणव + अधिकार + जरब यांचं जबरदस्त मिश्रण करत! असलं खतरनाक मिश्रण मीच करू जाणे!

निमाला घेऊन मी मास्तरांच्या पुढं उभा राहिलो, "नाना, ही तुमची मुलगी निमा. ही मुंबईला मावशीकडे पळून निघाली होती. का? हिच्या लग्नाच्या खर्चात तुम्ही स्वत:ला विकून घेणार होता म्हणून!"

"अहो! पण..." नानांना काही सांगायचं होतं,

"नाना, तुम्ही बोलू नका. यांना बोलू द्या." निमा माझ्या बाजूला येऊन उभी राहिली. मला जोर चढला.

"नाना, मी तुमच्या निमाबरोबर लग्न करायला तयार आहे. मला नारळ आणि मुलगी एवढंही नको, नुसती निमा हवी आहे!"

"अहो पण..." वहिनींना काही सांगायचं होतं.

"वहिनी तू बोलू नकोस. यांना बोलू दे." निमानं माझा हात पकडला. आता तर माझा जोरावरसिंग झाला!

निमाच्या नाना-वहिनींना मी बोलू म्हणून दिलं नाही. मी एकदम आक्रमक पवित्रा घेतला. "या जगात सगळे नवरदेव पैशाकरता नादान झाले असले तरी हा एक पळसुल्या तयार

आहे; एका उपवर मुलीच्या वडिलांचे दु:ख मी जाणतो!''

नानावहिनींना मी बोलू दिलं नाही. माझ्या घरी माझ्या आईवडिलांनाही काही तरी बोलायचं होतं, पण मी त्यांनाही बोलू दिलं नाही!

मी निमा अशी मिळवली. हिऱ्याला कोंदण मिळालं, कोंदणाला हिरा मिळाला!

अशी सोन्यासारखी मुलगी गटवायला, महाराजा, अंगी हा असा चतुरपणा, चलाखपणा व चमकदारपणा लागतो आणि अशी एक फसणारी, बावळट मुलगीही लागते! दाराआड आहे तशी!

अरेच्या, हे आतून दार का वाजतं आहे? मंडळी निमाच असणार!

''मंडळी, थांबा. जाऊ नका. आमची निमा बावळट असली तरी अतिथ्यशील आहे. ती बहुदा चहाचंच विचारेल! आता जरा शांत बसा; माझं आणि निमाचं बोलणं ऐका.

''अहो, बाहेरून कडी कशाला घातलीत?''

''अगं, मौल्यवान वस्तू जवळ असली की ती कुलूपातच ठेवावी लागते!'' माझं चमकदार उत्तर.

''अय्या, बाहेर किती मंडळी ही? मित्रमंडळी वाटतं? मी चहा करून आणते!''

निमा आत गेली व बाहेर आली!

''अहो साखर संपली आहे. कोपऱ्यावरून आणता का?'' निमानं आर्जवी स्वर वापरला.

''बघा मंडळी, निमा बघा, नाहीतर इतर बायका! पिशवी आणि पैसे नवऱ्याच्या अंगावर टाकतील व खेकसतील, ''साखर आणा. साखर म्हणजे गोड असते ती नाहीतर मीठ आणून ठेवाल.''

''आणतो ना. पण निमा, मी येईपर्यंत जरा आमच्या मित्र मंडळींच्याकडं बघ हं. आलोच मंडळी.''

निमानं मंडळींचा ताबा घेतला.

अहो, मी निर्मला. सौ. निर्मला पळसुले. मी आपणा मित्रांना उद्देशूनच बोलते आहे. यांनी मला आपल्याकडं पहायला सांगितलं आहे. मला तसा वेळ कमी आहे. हे जातील व आता साखर घेऊन येतील.

यांनी तुम्हाला आमच्या लग्नाविषयी सांगितलं असेल! हे काय सांगतात ते मला शब्दन् शब्द माहीत आहे. नवऱ्यानं बाहेरून कडी घातली म्हणजे बायकोला संशय येऊन ती दाराला कान लावणार नाही?

लग्न झाल्या झाल्या माझ्या एक लक्षा आलं, हे मित्रमंडळी आली रे आली की हे दार लावून घेतात आणि घडाघडा दहा मिनिटं बोलतात. मी यांचे एकपात्री प्रयोग दाराआडून पूर्ण ऐकले; आता अधूनमधून ऐकते.

पहिला प्रयोग ऐकला, आतून दरवाजा वाजविला व यांना साखर आणायला पाठविलं.

हा सतरावा प्रयोग आहे. साखर आणण्याची यांची ही सतरावी वेळ आहे! दर खेपेला मी 'साखर संपली' असं सांगते व बाहेर पिटाळते. यांना संशय कसा येत नाही म्हणते मी? कालच तर त्यानी दहा किलो साखर आणून टाकली आहे! ते जाऊ द्या, ते यायच्या आत मला माझा प्रवेश करायला हवा! तसा हा दोनपात्री प्रयोग आहे!

यांना बावळट बायको मिळाल्याचं दु:ख तुमच्या चेहऱ्यावर मला दिसतं आहे! तुम्ही यांचे

मित्र! तुम्हाला वाईट वाटणारच! पण वाईट वाटून घेऊ नका. मी तितकीशी बावळट नाही; थोडीशी असेन; पण तितकी नाही.

यांनी तांब्याभांड्याचं-पिण्याच्या पाण्यचं सांगितलं ना? आमच्याकडची कामवालीच यांच्या दवाखान्यात साफसफाई करते. मी तिला विचारलं, 'काल डॉक्टरांच्या दवाखान्याचं पाणी भरायला कशी ग विसरलीस?' यावर आमची कामवाली मला म्हणाली, 'ताई, समोरच्या दवाखान्यात डोळा ठिवतासा वाटतं? पिंपभर पाणी भरलं ते डॉक्टरांना पुरलं नाही म्हणून तुम्ही चमचाभर पानी घेऊन गेलासा काय?' मी दोन महिने पहातच होते! आमचे हे हो, यांची नजर सारखी आमच्या घराकडं म्हणजे माझ्याकडं! हो, त्यात हे पाण्यानं पिंप भरलेलं असताना आले व तांब्याभर पाणी घेऊन गेले! मी नाना वहिनींना सांगितलं, ''नाना, हे समोरचे ॉक्टर पळसुले कसे आहेत याची चौकशी रा ना. उद्या ते तांब्याभांडं परत करायला तीलच.''

दुसरे दिवशी कॉलेजातून आले तर वहिनीनं सांगितलं, ''निमे हा समोरचा डॉक्टर तुझ्यावर भाळला आहे; स्वारी मारे गोल गोल फिरत होती; पण सगळा रोख तुझ्याकडेच होता! जरा बडबड्या आहे, थोडा बावळट आहे; पण कोणाच्यात तरी जीव गुंतला की पुरुषांचं असंच होतं! काय बोलतो, किती बोलतो, हेच त्यांना उमगत नाही! घरवसल्या सगळी माहिती देऊन गेली स्वारी.''

नानांनी मावशीच्या यजमानांना तातडीनं सगळी माहिती तपासायला सांगितली. यांनी सांगितलेली सगळी माहिती खरी होती. पण त्यांचे आईवडील-माझे सासरे सासूबाई- पैशाचे लोभी आहेत, एकुलता एक डॉक्टर मुलगा त्यांना बरा भाव आला तर विकायचा आहे असं समजलं.

नानावहिनी म्हणाले, ''निमे, आम्ही हौसेने चार पैसे खर्च करणारच; पण त्यांच्या अपेक्षा फार दिसतात ग. काय करायचं?''

हे रविवारी मुंबईला जाणार असं बोललेच होते! हे लग्न ठरवून आले तर? मलाही ते तसे ठीक वाटले होते! विचार केला, यांच्याकडे मुंबईपर्यंत जावं तरी! नानावहिनी 'जा' म्हणाले. मग एस्टी डेपोवरच्या महाडिकांच्याकडं गेले; त्यांना सांगितलं. ''काका, रविवारचं, डॉ. पळसुले यांनी ज्या एस्.टीचं व ज्या जागेचं आरक्षण केलं आहे त्याच जागेचं दुसरं तिकिट द्या, महाडिककाकांनी का? का? असं दोनदा विचारलं. काकाच ते! मग विचारणारच!

पुढचं यांनी सांगितलं आहेच! स्पेशल टॅक्सीनं मला घेऊन नाशिकला कसे तावातावानं परतले ते! त्या टॅक्सीच्या परतीच्या प्रवासात हे सारखं माझ्याकडं अशा विचित्र नजरेनं पाहत होते, वर तोंडाला कुलूप! वेडे आहेत की काय असा मला सारखा संशय येत होता! पण नाही हो, वेडे नाहीत ते! मलाच बापडीला-नाही बावळट मुलीला-समजला नाही त्या विचित्र नजरेचा अर्थ! काय म्हणाले ते? कणव, अधिकार व जरब यांचं जबरदस्त मिश्रण त्यांनी नजरेत केलं होतं! आणि वर टॅक्सीत यांनी चमकदार मौन पाळलं होतं! लग्नान्तर खूपदा वाटतं यानंतरही ते चमकदार मौन पाळावं! पण ते वेड्या सारखं पाहणं नको ग बाई! त्यापेक्षा बडबडणं परवडलं!

मी बावळट; हे चलाख, हुषार. मी का यांना गटवणार? शक्य तरी आहे का? पण आमच्या

मामंजीना हे कोण समजावून सांगणार?

चहा घेऊन जा हं. आलेच वाटते हे साखर घेऊन. तशीच साखर बाजूला ठेवून संध्याकाळी परत केली पाहिजे! नेहमीचाच वाणी आहे, घेतो परत. त्या वाण्याला मी सांगून ठेवलं आहे, 'लहानपणी यांना साखर द्यायला यांचे आईवडील खळखळ करायचे! यांना फार साखर आवडायची. त्यांना लहानपण आठवलं की बेचैन होते...मग ते साखर आणतात! साखर आणली की त्यांना बरं वाटतं!

यांना इतक्या वेळा साखर आणायला पाठवते; खुलासा तरी काय करायचा?

हो! हे आल्यावर मला पुन्हा स्वयंपाकघरात ढकलतील व म्हणतील, 'अहो, असे शांत का? मी निमाला फसवलं, गटवलं; मी या बावळट मुलीला असाच जन्मभर फसवीन अशी धास्ती वाटते तुम्हाला? छे छे, तिच्यावर माझं प्रेम म्हणजे प्रेमच आहे! मी पुन्हा कशाला फसवेन तिला? वगैरे. आता हसा. हे हसा म्हणतील तेव्हा हसा. त्यांना बरं वाटेल! हसला नाहीत तर आतून चहा आणणार नाही हं!'

निमानं बोलणं थांबविलं.

....मी आलो; तर एकदम ही शांतता पसरलेली! सुन्न, भयाण, निळीजांभळी शांतता!

या निमाचं असंच आहे! श्रोत्यांवर, प्रेक्षकांवर हुकमत हवी, ताबा हवा!

मी निमाला साखरेची पिशवी देत आत ढकललं, हळूच दरवाजा ओढून घेतला आणि पुन्हा मंडळींचा ताबा घेतला.

मंडळी, असे सुन्न काय बसला आहात? मी निमाला फसवलं यांचं वाईट वाटतं आहे तुम्हाला? छे छे! तिच्यावर माझं प्रेम म्हणजे प्रेमच आहे! मी पुन्हा कशाला फसवेन तिला? अहो निमा सुखी आहे संसारात. मी तिच्या बावळटपणाचा कधीही फायदा घेणार नाही. तिला जिवापलिकडं जपेन!

अरे, हसा ना! मी सांगितलेली हुषार तरुणाची व बावळट मुलीची आनंदपर्यवसी कथा आहे; शोकपर्यवसी नाही!

आमचे एक मित्र कथाकथन करतात. आणि मला येऊन सांगतात. श्रोते रंगले होते रे; हसत होते रडत होते-काही विचारू नकोस.

आमच्या मित्रांच सोडा. त्यांच्या विनोदी कथांना लोक रडतात व शोक-दु:खपूर्ण कथांना हसतात! दोष श्रोत्यात नाही; आमच्या मित्राच्या निवेदन पद्धतीत माझ्यासारखा चलाखपणा, चमकदारपणा नाही! काय? हसा.

आणि मित्रमंडळी हसली! खोखो हसली! निमा चहा घेऊन बाहेर आली तरी हसणं थांबेना; उलट वाढलंच!

एवढं बरं होतं; माझ्याकडे पाहत पाहत ही मंडळी आपल्या बावळटपणाला हसत आहेत हे निमाला कळत नव्हतं! नशीब माझं! निमाला संशय आला नाही ते! नाहीतर आमची निमा म्हणजे पावसाळी आकाश आहे; तिला जर सत्य समजलं तर ती पापण्या काळ्या डोहात बुडवेल आणि मग समजूत काढता काढता, आर्जवं करता करता माझ्या दिवसाचं व प्रॅक्टिसचं वाटोळं होईल!

□

भा. ल. महाबळ
१७ चंद्रविजय हौसिंग सोसायटी,
लो. टिळक रस्ता, मुलुंड (पूर्व),
मुंबई ४०० ०८१.



अनुक्रमणिका






## व्यसन ! / भा. ल. महाबळ

माझ्या कथालेखनासंबंधात मी अलिप्तपणानं पाहू व लिहू शकणार नाही याची मला खात्रीच आहे. गोपीचंद किंवा रंभेचं शरीर प्रत्येकाला थोडंच लाभलं असतं? तरीही प्रत्येकजण आरशातील आपल्या प्रतिबिंबाच्या प्रेमात असतो. माझं माझ्या कथालेखनाबाबत तसंच आहे.

वर्षापूर्वी प्रसिद्ध झालेल्या माझ्या विनोदी कथासंग्रहाच्या प्रस्तावनेत माझ्या लेखनासंबंधी मी लिहिलं आहे ते थोडक्यात असं आहे.

'लिहिणं हे माझं व्यसन आहे.' 'व्यसन' या संस्कृत शब्दाचा संकट हा अर्थ मला माहीत आहे. माझं मराठीतील 'व्यसन' सुसंस्कृत माणसांना संकट वाटण्याची शक्यता गृहीत धरूनही, मला माझं व्यसन सोडवत नाही.

तिरकस बोलायला, टिंगलटवाळी करायला, वाकड्यात शिरायला, सुलट्याचं उलटं व खऱ्याचं खोटं करायला, पराचा कावळा बनवायला, तिखटमिठालाही तिखट मीठ लावायला मला मनापासून आवडतं. नेहमीच्या व्यवहारात, चारचौघात, मी असं वागलो तर लोक मला वाळीत टाकतील. माझ्या मनातील हे गैरगुण मनाबाहेर टाकून, मन स्वच्छ करायला माझं विनोदी लिखाण मला उपयोगी पडतं. उपहास, उपरोध, अतिशयोक्ती, शाब्दिक कोलांट्या ऊर्फ कोट्या हे विनोदनिर्मितीला उपकारक गुण माझ्या गैरगुणांची सावत्र भावंडं आहेत, म्हणे!'

वर थोड्या तिरकसपणानं लिहिलेली, लेखनामागची माझी भूमिका तशी खरी आहे.

आता माझ्या 'चोरावर मोर' या व एकूणच माझ्या कथांतील गुणांविषयी मी संक्षेपानं लिहितो.

१. विनोदी कथांतील माझी निवेदनशैली चटकदार आहे.

२. 'चोरावर मोर' या माझ्या कथेत, मनोरंजनापलीकडं जाऊन, काही खास सांगण्याचं मला जमलं नाही.

'स्त्री ही जात्याच पुरुषांपेक्षा चतुर असते, आपण चतुर आहोत हा पुरुषांचा समज केवळ भ्रम असतो' हे निखालस सत्य आहे. पण हे सत्य या कथेत मांडण्याचा माझा हेतू होता अशी न पटणारी व न पचणारी थाप मी मारणार नाही. मात्र, कथेतून काहीतरी विचार मांडावा असा माझा हेतू असतो.

३. विवाहित किंवा विवाहेच्छू युगुलांचे प्रेम हा माझ्या कथांचा अविभाज्य असा महत्त्वाचा घटक असतो. माझ्या कथांत प्रेमाला स्थान असले तरी कथेचा विषय वेगळाच असतो.

४. माझ्या प्रेमचित्रणात प्रणयाला किंवा शृंगाराला चटोरपणाचे रूप मी येऊ देत नाही. उलट, प्रेमासंबंधीच्या अवास्तव, खोट्या व फिल्मी कल्पनांचा फोलपणा पटवण्याचा मी यत्न करतो.

५. माझा विनोद हसत ठेवणारा, वृत्ती प्रसन्न करणारा असतो. कथानकाची गुंफण उत्तम असते.

६. माझ्या कथावस्तूची घडण गुंफण दुहेरी विणीची असते. उदाहरणार्थ, 'चोरावर मोर'

*या माझ्या कथेत, आपण एका सुंदर व बावळट मुलीला कशी गटवली हे सांगता सांगता, डॉक्टर आपण स्वत: किती बावळट आहोत हेच उघड करत असतो. याला जोड म्हणून, तिनेच त्याला कसे शिताफीने गटवले हे तिच्या निवेदनातून कळते आणि त्याचबरोवर एक बावळंट, होतकरू नवरा त्या चतुर सुंदरीने कसा पदरात पाडून घेतला हेही समजते. ही अशी परिस्थिती असूनही दोघेजण आपापल्या परीने आनंदात आहेत ही या संसाराची गंमत जाणवून हसू येते.*

*७. माझे मन कल्पक आहे, रंगरूपांच्या संवेदना टिपणारे, विषयाला अनुकूल अशा नवीन प्रतिमांना जन्म देणारे आहे. उदाहरणार्थ, 'चोरावर मोर' या कथेतील प्रारंभीचे निर्मलाच्या सौंदर्याचे वर्णन पहावे. सौंदर्याच्या नेहमीच्याच उपमांचा म्हणजे दूध, केशर, चंदन, चंद्र, तारे, गुलाब, प्राजक्त, रंभा, उर्वशी, गजगती, सिंहकटी यांचा मी वापर केला आहे. 'फक्त ही सर्व उपमाने, मिक्सरमध्ये, गरागर फिरवा आणि त्यातून वर येणारे लोणी म्हणजे निर्मलाचे सौंदर्य' असं वर्णन मी केलं आहे. हे नाविन्य कथेतील विनोदाला पोषक ठरते.*

*माझ्या कथालेखनासंबंधी मी स्वत:च असे बरे लिहीत सुटायचे हे विनयाला सोडून होते, ते बरे दिसत नाही, शोभत नाही. चांगले तर नाहीच नाही.*

*म्हणून एक खुलासा करतो, तो महत्त्वाचा आहे.*

*प्रारंभीच, मी माझ्या कथालेखनाकडे अलिप्तपणे पाहू शकणार नाही हे स्पष्ट सांगून टाकले आहे.*

*तरीसुध्दा, माझ्या कथांतील गुणांविषयी संक्षेपानं लिहितो असं म्हणत एवढ्या पाल्हाळानं मी कसं काय लिहू शकलो? ते सांगतो.*

*'चोरावर मोर' ही कथा माझ्या 'अस्सा नवरा...' या कथासंग्रहातील आहे. या कथासंग्रहाला कविवर्य शंकर वैद्य यांची आठ पानांची विस्तृत प्रस्तावना आहे. त्या प्रस्तावनेत वैद्यांनी माझ्या कथांविषयी जे लिहिलं ते मी सारांशानं उद्धृत केलं.*

*प्रा.शंकर वैद्यांसारख्या मातब्बर साहित्यिकानी लिहिलं म्हणून मी ते तसंच्या तसं स्वीकारलं आहे असं मात्र नव्हे. मला जे पटलं तेवढंच मी स्वीकारलं. वैद्यांचं जे निरीक्षण मला पटत नाही ते नाकारण्याचं धैर्यही मजजवळ आहे. आपल्या प्रस्तावनेत, वैद्यांनी माझे दोन दोषही दाखवले आहेत. त्यांचा उल्लेख मी वर कुठं केला आहे?*

*साररूपात सांगायचं तर, माझ्या लिखाणांविषयी कोणी बरं लिहिलं की ते मला पटतं, नव्हे, तेवढंच मला पटतं.*

□

---

**स्वागत**

- ❑ **गुंजन :** ज्ञानेश्वर कुलकर्णी, कोल्हापूर. पृष्ठे ४८
- ❑ **उखाण्यातून स्त्री दर्शन :** सौ. नीलम माणगावे, मनोदय प्रकाशन, पृष्ठे ११४
- ❑ **अक्षरशिल्प :** सुरेश लोंढे, नीहारा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ४८

---



अनुक्रमणिका

# 'समुद्री चहुकडे पाणी...'

□

मेघना पेठे

□

आमच्या नव्या कॉलनीच्या हंगामी वेल्फेअर कमिटीची स्थापना व्हायची होती, म्हणून साऱ्यांनी मार्चच्या पहिल्या रविवारी नऊ वाजता तीन नंबर बिल्डिंगच्या गच्चीत भेटायचं ठरलं होतं. करता करता दहा वाजेपर्यंत पंचवीस तीस मेंब्रांचा घोळका गच्चीत जमला. नेरूरकरनं त्याच्या जाड खर्जातल्या पुरुषी आवाजात सभेला सुरुवात केली. आणि इतका वेळ माझ्याबरोबर खिदळणारी सुभद्रा अचानक सभेत शोषली गेली. कोपऱ्यावरच्या construction खाली खोपट्यात चहा बनवणारा मुसलमान चहाची ग्लासं फिरवत माझ्यासमोर ठाकला. त्याच्या थाळीतला ग्लास उचलून मी त्याला ओळखीचं स्माईल दिलं. आणि गच्चीच्या कठड्यावर रेलले. इलायची चहाचा एक जायकेदार, जळजळीत घोट घेऊन मी सभोवार नजर फेकली. सातव्या मजल्यावरून, रविवारच्या संथ सकाळी, मार्चच्या उन्हात झळकत असलेल्या आमच्या कॉलनीकडे पाहताना माझ्या मनात एक सुखाचा तरंग उठला.

किती सुंदर दिसत होती आमची कॉलनी! सारख्या उंचीच्या सहा शुभ्र इमारती सारख्या आकाराचे व्हरांडे, त्यांचे काळे गज आणि लाल रंगवलेले कठडे. दुधी तावदानाच्या खिडक्यांच्या क्रिम कलर चौकटी. इमारतींच्या अधे मधे पसरलेली, मशागतलेली लॉन्स. त्यांच्या बाजूबाजूने त्रिकोणी विटांची किनार. मध्ये लाल कळ्यांची कर्दळ. कातरलेल्या, काळपट लाल रंगाची पानं असलेल्या झुडुपांचे पुंजके तिच्या बाजूला. कडेकडेनं वाढलेली, पिवळ्या, शेंदरी, फिक्या जांभळ्या तुऱ्यांची घोसाघोसाने येणाऱ्या फुलांची रोपटी. त्यातल्या एकेका फुलाला काही व्यक्तिमत्त्व नाही. पण एकत्रितपणे वाऱ्यावर डुलताना एवढ्या उंचावरून किती सुंदर दिसतात! केबिनच्या उन्हात पेपर वाचत रेललेला, खाकी कपड्यातला वॉचमन आणि काळ्या वेटोळ्याच्या पाईपमधून लॉनवर पाण्याचे फवारे सोडणारा, लुंगी वर घेतलेला सावळा माळी. सायकलवरून किणकिणत आत शिरणारा पेपरवाला पोऱ्या आणि रिकामा दुधाचा कॅन् हलवत घाम टिपत परत फिरणारे भय्ये. कॉलनीच्या लागत जाणाऱ्या व्यवस्थेचे जणू हे चालते, बोलते ध्वजच. 'भेनजी, गिलास' मुसलमान प्रेमळ हसत म्हणाला आणि माझी तंद्री मोडली. ग्लास त्याच्या हातात देत म्हणाले, "आज सिर्फ इलायचीका जायकाही नहीं, इलायची भी मिली चायमें." तो खूश झाला आणि ग्लास गोळा करण्यात गुंगला.

इथे संबंध प्रस्थापित करायचे. ग्रोसरला नवं कॅलेंडर वहाल करायचं. कचरा न्यायला येणाऱ्या मुलाला कधीमधी चॉकलेट, चिवडा द्यायचा. येताना गेटवर ओसंडणाऱ्या रातराणीच्या घोसाला हात लावून त्याचा वास घ्यायचा. जाताना मॉर्निंग वॉकहून परतणाऱ्या सुभद्राच्या वडिलांना 'गुड मॉर्निंग' म्हणायचं. संध्याकाळी मुसलमानाला सलाम ठोकून 'चाचा कैसे हो' करायचं.

मला अचानक माझं जुनं घर आठवलं. जुन्या, शेवाळलेल्या, पोपड्याच्या भिंतींचं. भाड्याचं घर. कुणीतरी वर्षानुवर्ष राहून, वापरून, नंतर मला मिळालेलं. तिथून निघायचं या भावनेने तिथला एक एक दिवस, एक एक रात्र कंठली. बिन मुळाच्या हरळीसारखं अस्तित्व.

तिथं रुजावं असं वाटलं नाही. आपणच जणू रुजण्याची इच्छा आणि म्हणून शक्यता खुंटवून टाकली. शेवटी निघताना एक डालडाचा डबा, दोन उंच बाटल्या, ताटाळ्याला अडकलेली रबरी रिंग, धुळकटलेली आणि खिडक्यांना बांधलेल्या दोऱ्या एवढंच, अगदी एवढंच ठेवलं तिथे, एवढंच. सोडलेलं घर सोडलेल्या नवऱ्यासारखंच दिसतं. घायाळ आणि गरीब! पण एक आहे-जे सोडण्यासाठी, तोडण्यासाठी दिवसरात्र मन ध्यास घेतं, ते सोडताना आपल्यालाही घायाळ करतंच.

नव्या घराच्या सुखाला लागलेला, सोडलेल्या घराचा ठुसठुसता डंख घेऊन मी इथे आले आहे. शिशिरात पूर्ण निष्पर्ण झालेलं पांढऱ्या चाफ्याचं झाड, नुसत्या फुलांनीच डवरून येतं आणि त्याच्या मंद सुगंधानं आसमंत भिजून जातो तशी माझ्या



*मेघना मोरेश्वर पेठे*
*रिझर्व बँकेत कारकुनी*
***प्रकाशित पुस्तक :***
*'हंस अकेला' (सात कथांचा संग्रह)*
*राजहंस प्रकाशन पुणे, यांचेतर्फे नोव्हें. ९७ मध्ये प्रकाशित.*
*आगामी आजमितीस काहीही ठरलेले नाही.*

एकट्या आयुष्याला इच्छेची, हुरुपाची धुमारी फुटली आहे. इथे नवीन पडदे, नवीन गाद्या आणि कोऱ्या लाकडाच्या वासाला नवीन फर्निचरबरोबरच, एक फूलझाडही आणलंय. Desert Rose नावाचं. फुलझाड उन्हात ठेवायचं. त्याला पाणी घालायच्या, खत घालायच्या, त्याची निगा राखण्याच्या बंधनात स्वत:ला अडकवून घ्यायचं. आणि त्या मिषानं घरात अडकायचं. माणसाला मुलं जन्माला घालावी वाटतात तीही अशी आयुष्यात अडकण्याचा एक हेतू म्हणूनच की काय? आतल्या पोकळीत फडफडत ठेवायचं हेतूचं फुलपाखरू!

खाली नजर टाकली, तर उन्हात पाण्यानं चमचमणाऱ्या स्वच्छ लॉनवर एक पाच सहा वर्षांचा मुलगा गडबडा लोळत होता. ओल्या मातीनं त्याचं अंग लडबडत होतं. माळी लुंगी सावरत त्याच्या मागे धावला, की हा उठून

अर्ध्या कुल्यापर्यंत आलेली चड्डी सावरत लॉनच्या दुसऱ्या टोकाला जायचा आणि पुन्हा गवतात लोळण घ्यायचा. शेवटी हैराण झालेल्या माळ्यानं हातवारे करून वगैरे वॉच्‌मनला बोलावलं आणि त्या दोघांनी त्याला पकडून त्याचा गणपती करून टाकीवर ठेवला. टाकीवर ठेवेपर्यंतही तो पाय झाडतच होता. टाकीवर बसल्यावर मात्र तो काही क्षण गांगरल्यासारखा झाला. नंतर त्यानं हनुवटीवर एक हात ठेवला, बासरी वाजवताना कृष्णाचे असतात तसे पाय केले. आणि तो वॉचमनकडे पाहू लागला. माळ्यानं कपाळाला हात लावलेला मला स्पष्ट दिसला. मग तो मुरकत, लचकत चालू लागला. वॉच्‌मन्‌ बरोबर मलाही हसू आवरेना. मीटिंग आटपत आली होती. सुभद्रा नेरूरकरच्या कानाशी काहीतरी म्हणाली आणि माझ्याजवळ येऊन उभी राहिली. मी तिला खाली चाललेला तो प्रकार दाखवला. ती वैतागल्यासारखी कंटाळून म्हणाली, "हाँ, वो पाठक का बच्चाय." मी म्हटलं, "कोण पाठक?" तशी तिनं बोट दाखवून म्हटलं, "तो, काहीतरी किचकट नियम सांगत बसलाय नं तो." मी त्या दिशेला पाहिलं. एक उंच, टंगाळ्या, तेल लावलेला माणूस काहीतरी ठासून सांगत होता. आम्हा साऱ्यांपेक्षा वयानं मोठा. त्यांचे दात पान खाणाऱ्या माणसांचे असतात तसे, कडाकडांनी काळपट, लाल होते. जाड भुवया होत्या. त्याखाली शिंपल्यात बसवल्यासारखे डोळे होते. हसरा प्रसन्न चेहरा होता, आणि एखादं वाक्य बोलून झाल्यावर तो स्माइल्‌ द्यायचा तेव्हा त्याच्या डोळ्याच्या कोपऱ्यात झिरमिळ्या पडायच्या. त्याच्या कानांवर केस होते. पण सगळ्यात लक्षात येत राहिली ती त्याची पावडर. गळ्यावर, कपाळावर आणि गंजीतून दिसणाऱ्या छातीवर पावडरचे थप्पे होते. मी सुभद्राला म्हटलं, "याला पावडर म्हणायला हरकत नाही." तशी ती खणखणत हसली. "पॉवडर, नॉट्‌ बॅड." असं म्हणत.

मीटिंग संपली होती, आता २५/३० जणांचा जथा एकदम लिफ्टशी घोंगावेल म्हणून मी सुभद्राला म्हटलं, 'चल, उतरूनच जाऊ.' खरं म्हणजे मला नेरूरकरला टाळायचं होतं. नेरूरकरनं तंग शॉर्ट घातली होती. आणि बिनबाह्यांच्या गंजीतून त्याची केसाळ छाती दिसत होती. त्याच्या ॲथलीट्‌ मांड्यांचे स्नायू त्याच्या प्रत्येक पावलागणिक आकर्षक हलत होते. त्याच्या छातीवर एक जाड सोन्याची साखळी रुळली होती. डाव्या हाताच्या बोटांनी आपले डोक्यावरचे विस्कटलेले भरपूर, कुरळे केस तो सारखे करत होता आणि उजव्या हातानं साखळीशी खेळता खेळता मध्येच आपली दोन दिवसांची वाढलेली दाढी खाजवीत होता. तेव्हा त्याचं करंगळीचं लांबच लांब वाढवलेलं नख मला दिसलं. त्यावरचं नेल्‌ पॉलिश अर्धवट उडालेलं होतं. 'पावडर पाठक' त्याच्या खांद्यावर हात टाकून अजूनही त्याला काहीतरी सांगतच होता. नेरूरकर खाली मान घालून हं हं म्हणत होता. मध्येच आपल्या उद्धट, अर्धवट उघडणाऱ्या पिवळट, पिंग्या डोळ्यांनी इथे तिथे पाहत होता. नेरूरकर एकदम नाना पाटेकर कॅटेगरीतला भन्नाट, चिकणा होता. रासवट, दांडगा, उद्धट, निर्मम वगैरे. तरी त्याच्या चेहऱ्यावर कधीतरीच एकदम एक विद्ध आणि मायाळू छटा तरंगून जायची.

आणि ती अशा माणसांच्या चेहऱ्याला करते तसा त्याचाही चेहरा असह्य मोहक करून टाकायची. ह्या आकर्षणाचा दंश सहन करण्याची सुभद्राची कणखर ताकद माझ्यात नव्हती आणि कॉलेजमध्ये नेरूरकर प्रथम दिसला तेव्हा जाणवलेल्या आकर्षणाची इजाहीनता आता उरली नव्हती. आता रग कमी झाली होती. तरी भूक चवताळली होती. मी तीस पूर्ण झालेली, बिनलग्नाचीच नव्हे तर, बिनपुरुषाची अभोग स्त्री होते. त्यातून बघायला गेलं तर बऱ्यापैकी सुमार. आकर्षणाच्या अथवा लालसेच्या परीघाबाहेरच कायम. माझ्या देण्याच्या ऊर्मी माझ्या मला माहीत होत्या. पण त्या कुणीचं पडताळून पाहिलेल्या नव्हत्या. आणि कुठल्याही पुरुषाला पुढे होऊन त्या पडताळून पाहाव्या असं वाटण्याजोगं माझ्यात काहीच नव्हतं. सुभद्राचे पाणीदार डोळे, जाड, मऊ ओठांनी बंद केलेली अरुंद जिवणी, गोल, भरलेली छाती रोखठोकपणे पुढे काढून चालण्याची ढब किंवा तिचं नाकपुड्या फुगवून धीटपणे खणखणणारं हसणं तर नव्हतंच नव्हतं. पण कोकरासारखा शिकार दिसणारा आवही माझ्या चेहऱ्यावर नव्हता. न हरिणीचा भांबावला भाव आणि पळापळ - म्हणजे काय, की हिला सांभाळावं, हिला आपल्या छत्राची गरज आहे असे पुरुषांतले fatherly संरक्षक भाव वगैरेही माझ्या थंड चेहऱ्यातून जागे व्हायचे नाहीत. त्या मिषाने कुणी जवळपास फिरकण्याच्या शक्यताही अर्थातच जिरलेल्या. मी आपली चार-दोन consistent मुरुमं चेहऱ्यावर वागवत, नाकाच्या आजूबाजूला तेलकट होत, न जाडी, न बारीक, न आधुनिक न पारंपारिक, न बावळट, न चमत्कारिक, अशी दिवसेंदिवस होते. अगदी अभेद्य वगैरेही situations ना सुद्धा भगदाड पाडू शकेल असा एक टोकदार, त्रिशूळासारखा sense of humour मजजवळ होता हे मला माहीत होतं. आणि साधं बोलताना सुद्धा माझा आवाज दाट आणि प्रगल्भ होता. दिलीपकुमारवर खूप प्रेम होतं आणि कधीकधी कुणीच बघत नसताना, दस्तायुव्हस्कीच्या कादंबऱ्यांतल्या एका हिरोसारखा माझा चेहरा, देवाशी जवळीक साधणारा निरागस होऊ शकायचा. गेली जवळजवळ पाच सहा वर्षं एकटीच राहत असल्यामुळे आणि भरपूर वेळ असल्यामुळे, माझ्याबद्दलचे हे काही शोध लागले होते. पण ते इतरांना लागावे इतका रसच माझ्यात कुणी घेत नसे. अर्थात प्रत्येक तोट्याचा एक फायदा असतो या न्यायानं, मी निरुपद्रवी वाटल्यामुळे म्हणा किंवा कशामुळे म्हणा, माझ्याकडे कुणी लक्षच देत नसे आणि माझा जीवनक्रम आणि माझं जे आजूबाजूचं बारीक निरीक्षण चालायचं, त्या स्वातंत्र्याला कुणाच्याही, कसल्यास हरकतीची बाधा होत नसे. सांगायचा मुद्दा काय तर नेरूरकरच्या मी खिजगणतीतही नव्हते, पण नेरूरकर आजूबाजूला असला की मला शिकार वगैरे वाटायचं. आणि सर्वच आकर्षक व्यक्तींना असते तशी त्यालाही याची जाणीव होती. खरं तर नेरूरकर कॉलेजमध्ये दिसायचा, तेव्हा तो चिकणा आहे हे जाणवायचं इतकंच. त्याच्याविषयी म्हणजे 'फक्त एखाद्याविषयी' जाणवतं असं काही वाटायचं नाही. नंतरच्या इतक्या वर्षात कित्येक ओळखीच्या आणि अनोळखी लोकांविषयी - अगदी कंडक्टर - प्लंबर पासून ते कादंबरीतल्या पात्रांपर्यंत,

मला वेगवेगळ्या उत्कटतेचं आणि कालमर्यादेचं आकर्षण वाटून गेलं होतंच. अपरिहार्य नैसर्गिकतेनं. मनाचं कौमार्य वगैरे काही माझ्यात नव्हतं. शरीराचं होतं, तेही नाईलाज म्हणून. त्या त्या व्यक्तींची उपलब्धता आणि त्या व्यक्ती आपल्या विदिन् रीच् असण्याची शक्यता, या दोन अटींचे अडथळे पार करून कुणी माझ्या आयुष्यात येऊ शकलं नव्हतं. (हल्ली तर कित्येक वर्षात मी रोहिणीत आणि टाईम्समध्ये जाहिरातीही बघितल्या नव्हत्या! बघितल्या आणि दिल्या तेव्हाही विरंगुळा म्हणूनच.) या कॉलनीत आल्या आल्या शकुनच असा लागला होता की माझे जुने, विसरलेले सारे छंद, अपमान आठवल्यासारखे परतून येत होते आणि मनाशरीराच्या अशा अवस्थेत नेरूरकर एका शक्यतेच्या मूर्त स्वरूपात समोर उभा ठाकला होता. नेरूरकरसमोर मला शिकार वगैरे जाणवतं, हे त्या दळभद्र्या सुभद्रेच्याही अनुभवी नजरेतून सुटायचं नाही. आतासुद्धा जिन्यानं जाऊ म्हटल्यावर ती म्हणाली, ''अगं तरी नेरूरकर पण आमच्यावरोवर तुझ्या घरी येणारच. तो सेक्रेटरी निवडलाय वेल्फेअर कमिटीचा.'' अरेच्चा! हो की. वेल्फेअर कमिटीवर निवडले जातील त्यांनी माझ्या घरी जेवायचं ठलं होतं. त्यानुसार पाठक, चौवळ, किणी, कदम, सुभद्रा आणि रजनी आता घरी येणार, त्यांच्या बरोबर नेरूरकरही येणारच. आम्ही खाली उतरून गेटशी पोचतोय तो पाठक वगैरे मंडळी पुढे गेली होती. माळ्यानं आणि वॉचमननं पाठकच्या मुलाच्या कागाळ्या पाठकच्या कानावर घातल्या होत्या. पाठकनं खोटा, कन्सर्न्ड आव आणून टाकीवरच्या मुलाकडे मोर्चा वळवला होता. 'अरे ए च्युत्ये, तेरी माँ की, नीचे आ!' तो मुलाला उद्देशून म्हणाला. मुलानं पुन्हा एकदा उड्या मारत स्वत:भोवती गिरक्या घेऊन अत्यंत धसमुसळेपणानं उसळत पाठकच्या खांद्यावर उडी घेतली. बेपर्वापणे दोन्ही पाय त्यांच्या खांद्यावरून सोडले. जणू तसं ठरल्यासारखंच, काही न बोलता पाठकनं त्याला खांद्यावर नीट सारखा करून घेतला, आणि तो निघाला. मुलगा एक दोन तीन चार पाँच छे सात आठ नौ म्हणत पाठकच्या विरळ केसांच्या तेलकट डोक्यावर तबला वाजवत होता. काही अंतरावर उभ्या असलेल्या मिचुकड्या डोळ्यांच्या, गालफडं वर आलेल्या जाड ओठाच्या मुलानं बेचकी धरून कुठेसा नेम लावला होता. पाठकनं त्याच्याकडे जळजळीत बघितलं आणि अवाजवी वेगानं हिंदकळत तो त्याच्याकडे गेला. त्याच्या मानेच्या जरा वर खाड्दिशी एक फटका मारून त्याचा कान पिरगाळत त्याला म्हणाला, 'हो गया तू शुरू? चल घर च्युत्ये...' त्या मुलानं स्वत:ची सोडवणूक करून घेतली. पाठक एकदम आठवण झाल्यासारखा आमच्याकडे वळून म्हणाला, ''इससे जरा निबटके आता हूँ। अभी आया.'' आणि तो जिन्यानंच वर निघून गेला.

मंडळी घरात आली. माझ्या घरात एक दोनच खुर्च्या होत्या. त्यात एकात रजनी बसली शालीनपणे आणि दुसरीत कदम बसला. बूट घातलेले पाय फाकवून, आणि हातातली जणू काही बोटाचाच भाग असलेली चावी गरगर फिरवत. काळ्या मुंगीसारखा निरुपद्रवी भासणारा किणी बाल्कनीत जाऊन दोन हात खिशात घालून उभा राहिला. 'ए

बाई, जरा पंखा लाव.' असं सुभद्राला फर्मावून नेरूरकर चटईवर एक हातावर पहुडला. वेरुळच्या शिल्पासारखा. बलदंड. चौबळ पँटीची घडी वर करीत, बूट काढून, हात पाय धुवून कॉलरवरच्या रुमालानं ते पुसत सावरून कोपऱ्यात बसले आणि भिंतीला रेलले. संथ, सावकाश हुश्श असा आवाज करीत, श्वास घेत. सुभद्रानं फॅनचं बटन लावून regulator खर्रदिशी पुढे फिरवला आणि फ्रीज उघडून familiarly गटागटा पाणी प्याली. 'Any body, Water?' असं तिनं बाहेर डोकावत विचारलं आणि शांतपणे डोळा मारून हात पुढे केलेल्या नेरूरकरच्या हातात तिनं बाटली दिली. मी सेट्ट झालेलं custard फ्रीजमध्ये टाकलं. सॅलड् सुभद्राच्या ताब्यात दिलं. रस्सा गरम करत ठेवला आणि पुऱ्या तळायला घेतल्या. पुऱ्या तळताना मला पाठकचा मुलगा आठवत होता. पाठकचं त्याच्यात काहीच नव्हतं. त्याचे गाल ऐनाच्या पानासारखे मऊ होते. उजव्या गालाला एक खोल खळी होती. पापण्या काळ्याभोर आणि लांब होत्या. आणि डोळ्यांत एक पाणीदार, अनन्वित जिगीषा होती. जेवणं सुरू असताना सुभद्राचं सुरूच होतं. "अरे, ये पाठक पहले धारावीमें रहता था! & No wonder, his kids behave the way they do. लिफ्टशी खेळत असतात. लॉनवर लोळत काय असतात! शिट्ट्या काय मारतात! आणि कधी चुकून स्वच्छ नसतात. & they are so rudely stuborn. I shudder to think, our kids would get this company! कदम गॅलरीतून खाली मावा थुंकून आला आणि म्हणाला, 'च्यायला इथे एवढं पॉश आहे, पन हा घान करनार.' आणि तो पुन्हा चावी फिरवू लागला. रजनी म्हणाली, 'किती छान आहे गं फुलझाड. आता मी पण बाग करीन. अगं तिथे आमच्याकडे म्हणजे सासूबाईंना नवीन एक झाड आणलेलं चालत नाही. आणि मोठ्या दिराला फुलं तोडलेली चालत नाही. खरंच मला अगदी तुरुंगातून सुटल्यासारखं झालंय. काही स्वतःच्या तंत्रानं चार गोष्टी करता येतील' इ. चौबळ म्हणाले, 'छान झालंय जेवण.' तशी इतका वेळ गप्प बसलेला नेरूरकर म्हणाला, "चौबळ, तुम्हाला केव्हापासून हे भटांचं गुळुमुळू जेवण पटायला लागलं? सालं, मला तर पापलेटाची, एवढी आठवण येतेय. पोटात जागा ठेवली. एकदम कुठूनतरी उडी मारून आलं, तर पंचाईत नको म्हणून.." चौबळ हसले आणि म्हणाले, "नाही, सध्या आम्ही गवतखाऊ. चाळीतल्या जागेला विटलो, मोठी जागा हवी म्हणून Non - Veg सोडून दिलं." 'त्याचा काय संबंध?' काळी मुंगी किणी म्हणाला, 'संबंध असा आहे की आपल्याला जे खूप हवंहवंसं वाटतं ते सोडून दिलं तर आपल्या प्रार्थनेला धार येते.' काळी मुंगी किणी मान डोलवत, घुळघुळत बाहेर गेला.

इतक्यात बेल वाजली आणि पाठक दारात हजर झाला. तो म्हणाला, 'सॉरी, मै नही आ सका। जरा इसकी तबियत ठीक नही.' त्याच्या कडेवर एक रोगट, चिडक्या चेहऱ्याचा शेंबडा मुलगा होता. नेरूरकर म्हणाला, 'क्यूँ बे? अभी इतना मस्ती कर रहा था। अभी क्या हुआ?' तशी पाठक डोळ्याभोवती झिरमिळ्या पाडणारं हसून म्हणाला, 'जी नही। ये वो नही। वो लव था, ये उसका जुडवा भाई है। कुश.' मी

चटकन् त्या मुलाकडे पाहिलं. खरंच. त्याच लांबनाक, काळ्याभोर पापण्या, ते ऐनाच्या पानासारखे गाल, तीच खळी. identical twins. पण ते काहीतरी ह्याच्यात नाही. ते काहीतरी... आनंदी, खळखळतं, सळसळणारं. आतुर, उत्सुक, उत्साही, टवटवलेलं. ते काहीतरी, जे त्याच्यात आहे! पाठक त्याला घेऊन गेला. मंडळीही हळूहळू निघायच्या तयारीला लागली. जाताना सुभद्रा नेरूरकरला म्हणाली, 'वाइफ है क्या घरमें? मेरे को उसने कुशन कव्हर का पॅटर्न प्रॉमिस किया है । चल. मै आती हूँ ।' मी साऱ्यांना अच्छा करायला बाल्कनीत आले. सुभद्रा खिदळत उत्साहाने नेरूरकरच्या मागे, काळवीटाच्या मागे हरिणीनं जावं तशी गेली. पुन्हा एकदा कॉलनी दिसली. ही सर्वत्र दिसणारी घरं! या घरांत किती निरनिराळ्या भूतकाळाची माणसं राहत असतील. निरनिराळी स्वप्नं, निरनिराळे नाईलाज, छटेछटेनं अलग असलेल्या सक्ती आणि प्रवृत्तींनी त्यांना इथे आणलं. त्यांची मनं, आनंदोल्हास, चिंता, दुःखं सल, कडू गोड आठवणी - मित्रत्वाच्या असंख्य शक्यतांनी छिन्न-विच्छिन्न झालेला हा मानवसमूह-त्याच्या घराच्या चौरस फुटांची संख्या आणि रचना, ग्रिल्स आणि कठड्यांचे, खिडक्या आणि दारांचे रंग - बस. खरं तर इतकंच सारखं आहे त्यात.

मी खिन्न होऊन आत आले. पाहुणे गेल्यावर येतो तो नेहमीचा शीण मला आला. गादीवर अंग टाकलं तर झोपच लागली. जाग आली ती दरवाज्याबाहेर थडाथडा वाजणाऱ्या लिफ्टच्या दरवाजाच्या आवाजानं, आणि मुलांच्या खिदळण्या किंचाळण्यानं, वैतागून दरवाजा उघडून बघितलं तर पुन्हा पाठकचा बच्चा! लिफ्टच्या दरवाज्याला लोंबकळतोय. मी त्याचा हात धरून ओढलं. लिफ्ट्चा दरवाजा लावला. आतला मिचकुड्या डोळ्यांचा नफ्फडपणे डोळ्यांची उघडझाप करीत बटण दाबून लिफ्ट खाली घेऊन गेला. मी या मुलाला घरात ढकललं आणि दरवाजा लावून घेतला. झोपेतून उठल्यामुळे क्षणभर मला कळेचना काय बोलायचं ते. तोच म्हणाला, 'नही खेला, तो वो मारता है ।' त्यानं त्याची मजबुरी सांगून टाकली आणि तो एक पाय आपटत उभा राहिला. मी त्याला कोपऱ्यातल्या एका खुर्चीत बसवून ठेवलं. काही न बोलता आत जाऊन त्याच्या हातात कस्टर्डची वाटी दिली. तो आनंदून भराभर कस्टर्ड ओरपू लागला. मध्येच एक बेदाणा लागल्यावर म्हणाला, 'ये पहले अंगूर होता है न?' मी हसून हो म्हटलं. खाऊन झाल्यावर वाटी हातात घेऊन उभा राहिला. मी वाटी त्याच्या हातातून घेतली आणि दुपारपासून टेबलावर तसंच पडलेलं सारं जेवणाचं आटपू लागले. तो म्हणाला, 'दीदी, तुम अकेली रहती हो?' मी म्हटलं, 'हाँ'. तो मुकाटपणे, जणू सहानुभुतीपूर्वक मला आवरायला मदत करू लागला. फ्रीजवरून हात फिरवून म्हणाला, 'हमारे घरमें ये नहीं हे । ये बरफकी अलमारी है न?' मी म्हटलं. 'हो. पण आपलं आपण नाही होत.' लांब पापण्यांच्या त्याच्या डोळ्यांनी तो माझ्याकडे बघत होता. त्याच्या ऐनाच्या पानासारख्या मऊ गालावर एक खळी उमटली. मग म्हणाला, 'कुश बीमार है। तबतक मैं भी आईस्क्रीम नहीं खाऊँगा। वो ठीक होनेपर हम essel world को जाएँगे। और माँ वो बनाएगी...

वो जो तुमने मुझे अभी दिया! फिर वो मैं कुशके साथ खाऊँगा।' मी त्याच्याकडे बघितलं आणि म्हटलं. 'और आज जो तुमने अकेले खाया वो?' तो एक क्षणभर गांगरला आणि मग खळी पाडून म्हणाला, 'वो तो तुम गुस्सा हो गयी थी नं, इसलिए...' मला एकदम हसू आलं. मग त्याला धुवून काढलं. स्वच्छ पुसलं आणि त्याच्या अंगावर पावडर शिंपडली. मला एकदम पाठकची आठवण झाली. तो पावडरचा डबा हातात धरून न्याहाळत होता. मग डब्यावरची बाई बघून म्हणाला, 'वो सुभद्राऑंटी है ना, वो ऐसीही दिखती है।' थोडा विषाद वाटूनही मी त्याला विचारलं, 'और मैं?' तो विचारात पडल्यासारखा झाला. मग म्हणाला, 'दीदी, तुम्हारे चेहरे पे मुहाँसे है। तुम क्लीरसिल क्यूं नही लगाती? क्लीरसिल लगानेवाली लडकी तुम्हारे जैसी दिखती है।' तो जणू माझी समजूत काढल्यासारखा म्हणाला. इतक्यात त्याच्या आईची हाक आली. तो धावत गॅलरीत गेला. आणि म्हणाला, 'माँ, मै यहाँ हूँ।' तिनं झर्रदिशी वर पाहिलं आणि म्हणाली, 'मुन्ने घर आ' आणि चटकन् आत वळली. तो टणाटण उड्या मारत म्हणाला, 'मामा गया होगा, मैं जाता हूँ।' आणि दार उघडून निघून गेला सुद्धा. मी एक दहा सेकंद तिच्याकडे पाहिलं असेल. पण तेवढ्यातही मला जाणवलं, की तिच्याही डोळ्यांना लांब लांब दाट पापण्या आहेत आणि तिच्याही ऐनाच्या पानासारख्या गालांना एक खोल खळी पडते. मुलगा मातृमुखी आहे. भाग्यवान आहे. माझ्या मनांत आलं. मी बाल्कनीतच उभी होते. तिच्या घराकडे पाहत पाहत गेटपाशी चालत गेलेल्या माणसाचे डोळे मिचकुडे होते. गालफडं बसलेली आणि त्याच्या तोंडावर अनेक 'मुहाँसे' होते, हे मला लांबूनही दिसलं. या माणसाचा चेहरा आपण कुठे तरी पाहिलाय असं मला जाणवत राहिलं आणि थाड्निशी लवच्या मोठ्या भावाची आठवण झाली. लव ज्याला नेहमी मामा मामा म्हणतो तो तर हा नसेल? आणि असेल, अगदी त्या 'ऐनाच्या पानाचा चेहरा' वालीचा हा 'कील मुहाँसे'वाला चेहरा जरी सख्खा भाऊ असेल तरी तो आल्यावर ही पोरांना घराबाहेर का काढते? दुसऱ्याच्या नसत्या प्रश्नांत शिरण्याचा, सुभद्राचा वाण नाही पण गुण लागला असं मनात येऊन मला हसू आलं.

संध्याकाळ दाट झाली होती. माझ्या बाल्कनीत क्षितिजाचा एक तुकडा अजून मोकळा दिसायचा. त्यावर मुक्या माराचे वण उठल्यासारखे गडद लाल, काळे, जांभळे रंग पसरले होते. काही पक्षी इथून तिथे जाणारे. एक अर्धवट उभं राहिलेलं बांधकाम. दूरच्या नागमोडी रस्त्यावरून भास झाल्यासारख्या सायकली, रिक्शा, चालणाऱ्या माणसांच्या आकृती. खाली मुलांचा अव्याहत कोलाहल. त्यांच्यातच लवही असेल का? की तो घरात असेल आईजवळ हट्ट करीत? समोरच्या बाल्कनीत नेरूरकर चहाचा मग हातात धरून उभा होता. पिळदार दंडांचा, केसाळ हातांचा, गुलाबी, लालसर नखांचा आणि अर्धवट उघडणाऱ्या पिंगळ्या, उद्धट डोळ्यांचा नेरूरकर, मी एकदम शहारून घरात शिरण्यासाठी वळले. घरात अंधार भरून राहिला होता. माझ्यामागोमाग नेरूरकरविषयी वाटून गेलेल्या पाशवी, शारीरीक आकर्षणाचा एक सळसळता पट्टा आत आला. एखाद्या बर्फाळ रात्री, राहत्या शहरापासून दूर,



अनुक्रमणिका





अपघातानं घडून गेलेल्या संभोगाचं तुटकेपण त्याला होतं. 'मी तीस आहे. मोकळी आहे. अभोग आहे. तीस वर्षांच्या या कुमारिकेला नेरूरकर तू हवा आहेस.' अचानक वंचनेच्या धारदार सुऱ्यानं घर मिळाल्याच्या सुखाची मलमल टरटरा फाडत नेली आणि आतून अंधाराचा कापूस.कापूस ऊतू जात बाहेर आला.

हळूहळू लवचा संकोच तसा मावळत गेला. आणि त्याची माझी दोस्ती झाली. एकदा ऑफिसमधून येताना लॉनवर त्यानं मला गाठलं. त्याचा पतंग काही केल्या उडत नव्हता. इतर मुलं त्याच्याकडे लक्ष देत नव्हती आणि मिचकुड्या त्याची मस्करी करत भोवरा गुंडाळण्यात मग्न होता. मी बघितलं तर पतंग बारीक फाटला होता. मी म्हटलं, हा कसा उडणार? तर तो म्हणाला, 'लेकिन यही उडाना होगा। मेरे पास दुसरा नही है।'

मग मी त्याला समजावलं आणि म्हटलं, 'ठीकय, आपण दुसरा आणू. आणि गच्चीवरून उडवू.' त्या रविवारी सकाळी आम्ही नवे दोन रंगीत पतंग आणि मांज्ये घेऊन गच्चीवर गेलो. त्या रविवारी आणि नंतर अनेक रविवारी आम्ही पतंग उडवले. गच्चीवर आम्ही दोघंच. मी मांज्या गुंडाळत आणि तो जमेल तसा पतंग उडवत. आकाश खूप मोठ्ठं, दूरवर पसरलेलं आणि पांढरं फट्ट असायचं. मधूनमधून वाऱ्याच्या झुळका. त्याखाली एवढासा लव दुर्दम्य उत्साहानं इथून तिथे दुडदुडत, उड्या मारत, किंचाळत, पतंग उडवीत असायचा. माझ्यासकट कुणीच त्याच्या गावी नसायचं. त्या मूर्तिमंत चैतन्याचे काही शिंतोडे माझ्याही अंगावर उडायचे.

लव खूपदा संध्याकाळी माझ्याकडे यायचा. कधी टी.व्ही. बघायचा. विशेषत: जाहिराती. आणि मग त्या करून दाखवायचा. कधी राजा भिकारी खेळायचा. कधी त्याचा पहिलीतला प्रचंड (!) अभ्यास घेऊन यायचा. मी कधी कामात असले तर दोन चार टणाटणा उड्या मारून फ्रीजमधलं गार पाणी पिऊन निघून जायचा. एक प्रकारे आम्ही दोघांनी एकमेकांना एकमेकांची सवय लावली होती. माझ्यात त्याला बरोबरी न करणारा, हेवेदावे न करणारा दोस्त मिळाला होता, आणि त्याच्यात मला - माझ्या आईपणाच्या ऊर्मींना बोअर न होईल इतपत अभिव्यक्तीचा Channel मिळाला होता. मी त्याला कधीच त्याच्या आईवडिलांविषयी, आजीविषयी, मामाविषयी वगैरे नसते प्रश्न विचारले नाही. एकटं राहणाऱ्या बाईला दुसऱ्यांचा भोचक, जाचक चौकसपणा परवडणारा नसतो आणि त्यामुळं तिनं दाखवायच्या चौकसपणालाही आपोआप नैतिक मर्यादा पडतात, असंही असेल, नेरूरकरविषयी माझं आकर्षण कायम होतं. ते व्यक्त होऊ नये यासाठी मी जरूर ती सर्व काळजी घ्यायची. तो सेक्रेटरी असल्यामुळे अधूनमधून माझ्याही घरी काही बाही निमित्ताने यायचा. एकदा संध्याकाळचा तो माझ्याकडे आला असताना अचानक दिवे गेले. टी.व्ही.ची ज्योत ठप्पदिशी मालवली आणि पंखाही मरणाऱ्या माणसाच्या उरासारखा हळूहळू फिरत गपगार झाला. मी मेणबत्ती शोधून आणून लावली. नेरूरकरला काय करावं काही सूचत नव्हतं. मेणबत्तीच्या संथ, जळत्या ज्योतीच्या प्रकाशात कुरळ्या केसांचा उद्धट नेरूरकर ममताळूपणे माझ्याकडे पाहत राहिला. माझाही चेहरा तेव्हा निरागस, लहान

मुलीसारखा दिसला असणार. कारण त्यानं न राहवून माझ्या केसात हात फिरवला आणि म्हणाला, 'काळजी घे.' त्याची लांब, लालसर नखांची बोटं माझ्या केसातून फिरत आहेत या जाणिवेनं मी अतीव सुखानं शहारले. आणि त्याच्या केसाला पकडून मी त्याच्या काळपट, जाड ओठांवर ओठ टेकले. मी डोळे मिटले होते. त्याच्या हातातलं जाड, पोलादी कडं माझ्या पाठीला खुपत होतं आणि त्याच्या सिंगलेट्ला पुरुषी घामाचा, सिगरेट आणि अत्तरात मिसळलेला वास होता. इतकंच मला जाणवलं. तो निघून गेला. दिवसेंदिवस दाटलेल्या आणि दडपलेल्या माझ्या इच्छेला असा अपघाती कोंब फुटला. या आनंदानं शीण येऊन मी जवळच्याच खुर्चीत पाय मुडपून कलंडले आणि मला झोप लागली. जाग आली तेव्हा पंखा गरगर फिरत होता. दाटलेल्या अंधारात, टी.व्ही.च्या चौकटीत रेघारेघांच्या पावसाचा उजेड खरखरत होता. आणि केव्हाच विझून गेलेली मेणबत्ती स्वत:च्याच वितळलेल्या मेणाच्या जाड थारोळ्यात बुटकी होऊन उभी होती.

नेरूरकरही हळूहळू रुळला! त्याची बायको म्हणजे हाडांना साडी गुंडाळल्यासारखी दिसायची. जाड भिवयांच्या मध्ये एक मोठा टिळा लावल्यासारखं लाल भडक कुंकू असायचं. पदराआड झाकण्यासारखं काही नसून सुद्धा पदर उपरण्यासारखा गुंडाळी करून मध्ये आवळलेला असायचा. पावट्यासारखे मोठे मोठे दात होते तिचे. कुरळ्या केसांना तेल चोपडूनही ते कायम विस्कटल्यासारखेच दिसायचे. नाकाभोवती black heads होती. पावलांना भेगा. मोठमोठ्या हडकलेल्या बोटांमध्ये जोडवी. नाकात एक हिऱ्याची चमकी आणि गळ्यात पोवळ्याचं मंगळसूत्र घालून ती कधी कधी नेरूरकरबरोबर गॅलरीत दिसायची, तेव्हा माझा जीव हळहळायचा. काय करत असेल नेरूरकर या हाडांच्या बंडलाचं? तिची बोटं हडळीसारखी बारीक असली तरी नखं बुटकी होती. अर्धवट उडालेल्या नेलपॉलिशची, ती वसुधा, माहेर वगैरेच्या पलीकडलं काही वाचण्यातली नव्हती. बटणांची मांजरं, बाटल्यांचे ताजमहाल, साबणांचे सोफासेट असलं काहीतरी टिपीकल् रुखवतातलं सामान बनवण्यात ती मग्न असायची. आणि उरलेल्या वेळात ती काहीतरी खाण्याचं बनवायची. नेरूरकर विषयी हळहळ वाटायची आणि त्याची स्वत:ची कीव यायची, तरीही या बाईचा राग यायचा नाही. एकदोनदाच तीही माझ्या घरी आली होती. एकदा हळदी कुंकवाचं बोलवायला आणि एकदा मी साडीवरचा ब्लाऊझ alter करायचाय म्हटल्यावर माझं माप घ्यायला. तेव्हा तिचा निर्व्याजपणा माझ्या लक्षात आला होता. मनोमन आपल्याला कुणी हसत असेल याची शंकाही न येता तिनं मला एक रटाळ, मराठी गाणं म्हणून दाखवलं होतं. गॅसची शेगडी चकचकीत ठेवायची पावडर मिळते हे सांगितलं होतं आणि 'घर' किंवा 'एका हाताची टाळी' वगैरे असल्याच काहीतरी होपलेस्ली इजाहीन मराठी सिरीअल्सूवर उत्साहाने बोलून ती गेली होती. एखादी हडकलेली गाय भाकड असूनही एखादा सधन शेतकरी विकत नाही, तिला माश्या हाकलीत, गवत खात गोठ्यात उभी ठेवतो. Out of compassion! तसं काही तरी मला










वाटून गेलं.

खरंतर मला तिच्याविषयी कृतज्ञ वाटायला हवं आणि वाटतही असे. ती नेरूरकरबरोबर काही ना काही पदार्थ माझ्या घरी पाठवायची. फर्निचर आणायचं तर नेरूरकर टेम्पो घेऊन, पेस्ट कन्ट्रोलवाला आला तर नेरूरकर सामान आवरायला, रद्दी विकायची - नेरूरकर. कुठल्या ना कुठल्या निमित्तानं ती नेरूरकरला माझ्यावर सोडायची. नेरूरकर आपल्या गायीवर खूश होता. मी तितक्या सहजपणे तिच्या निरागसतेवर विश्वास टाकायला तयार नसे. हे ती काहीतरी उमजून करते अशी शंका कधीतरी माझ्या मनात येऊन जायची. पण माझी त्याला हरकत नव्हती. तिच्या वागण्याचा परिणाम अखेर मला सोयीचाच होता. आणि तिच्या हाताला बरीक चव होती.

असे दिवस जात राहिले आणि कॉलनी नव्याची जुनी होत गेली. लिफ्टचे दरवाजे सैल झाले. पंखे बंद पडले. नळ गेले. आले. पांढऱ्या शुभ्र भिंतींवर कुंड्यांतल्या पाण्याचे ओघळ वाहून त्या लाल झाल्या. वॉचमन् बदलले. कन्स्ट्रक्शन पुरं होतं आल्यामुळे मुसलमानांनही खोपटं हलवलं, दूधवाले, पाववाले, ग्रोसर जरा अंमळ गृहीतच धरू लागले. काही लग्नं ठरली. काही झाली. काही जन्म, एखादा मृत्यू, काही शेजाऱ्याशेजाऱ्यातली, काही घराघरातली भांडणं, काही काचा फुटल्या. काही चोऱ्या झाल्या. ठरलेले सणवार - शिवजयंती वगैरे - पताका, रेकॉर्ड्स लावून ठरल्यासारखे साजरे झाले. काही इजाहीन Gossips, ठरलेल्या वर्तुळात पाचोळ्यासारखी भिरभिरली. मी तसं पाहता कॉलनीतून तुटतच गेले.

मी विनापाश एकटी होते. तीस वर्षांची. माझ्या आयुष्यात तशा घटना म्हणाव्या अशा कमीच होत्या. ज्या काही होत्या त्या प्रत्येक घटनेनंतर माझ्या एकटेपणाच्या जाणिवेवर, एकटेपणाचीच आणखी एक तप्त मोहर उठायची. आयुष्य म्हणजे अशा चटक्यांच्या व्रणांचं एक म्युरल होतं. म्हणजे उदाहरणार्थ—

एकदा दुपारी कपाट आवरायला घेतलं तर त्यात मोठ्या, लाल, तकतकीत, मिशाळ झुरळांचा एक ताफाच दबा धरून बसल्यासारखा सापडला. शहारून क्षणभर मी स्तब्ध झाले. आणि मग हवेनं आणि उजेडाच्या संपर्कानं बावरून इतस्तत: सुरसुरसुर सुर धावणाऱ्या झुरळांबरोबर घरभर केरसुणी घेऊन धावले आणि थकले. त्यानंतरच्या दोन रात्री झुरळांची स्वप्नं पडून दचकायला व्हायचं. नंतर सारं सुरळीत झालं. किंवा-

एकदा दुपारी पालींचं मैथुन बघितलं आणि कुणाला तरी सांगावं वाटलं तर कुणीच नव्हतं किंवा —

एकदा ऑफिसमधल्या एका तेल लावणाऱ्या, काटकुळ्या, तोंडाला घाण येणाऱ्या एकलकोंड्या मुलीला, आई सिरीयस असल्याचा फोन आला, तर तिनं सगळे सोडून मला विचारलं, 'माझ्याबरोबर येतेस का?' आणि मी तिच्या बरोबर टॅक्सीतून जाताना तिनं टॅक्सीभर आपल्या घामेजल्या, काटकुळ्या हातानं माझा हात घट्ट पकडून ठेवला.

घरी गेले तर तिच्या आईनं जीव सोडला

होता, घरी तिचा एक वेडा, मंगोलियन सिंड्रोम्वाला भाऊ होता. त्याला बघून ती म्हणाली, ''याला मी आहे. पण आता मला मात्र कुणीच नाही. तुझ्याकडे बघून वाटलं की कदाचित् तुलाही कुणीच नसेल. म्हणून तुला बोलावलं,'' मग तिनं सावकाश एका कागदावर मोठ्या, वटवटीत अक्षरात एक सुटीचा अर्ज खरडला आणि म्हणाली, ''मी बघते काय करायचं ते. हा अर्ज तेवढा उद्या ऑफिसात दे. आता तू जा.'' मी निघून आले. होते तेवढा सगळा वेळ तिचा भाऊ माझ्यांकडे लाळ गाळत बघत राहिला होता. एकट्या माणसाला एकट्या माणसाविषयी सहानुभूती वाटते. पण तिरस्कार आणि उबगही वाटतो. दुकट्यांविषयी असूया वाटते पण आकर्षणही. हेच मला जाणवलं. कारण resume झाल्यावर ती पुन्हा तिच्या कोषात गेली. आणि माझ्याकडे बघून तिनं कधी साधं स्माइलही दिलं नाही. किंवा —

साहेबांनी सतत महिनाभर या ना त्या निमित्तानं केबिनमध्ये बोलावून घेतलं. सुचवून, लाडावून, चुचकारून, लागेलसं बोलून, स्तुती करून हर तऱ्हांनी त्यांनी मला वश करून घ्यायचा प्रयत्न केला. मी दाद दिली नाही. घाबरले, बावरलेही नाही. खेळ बघितल्यासारखी त्यांची लगबग, तगमग बघायची. मग एकदा स्पष्ट सांगितलं की मला यात रस नाही. त्यांना हे रोखठोक उत्तर इतकं पसंत पडलं की त्यानंतर माझ्याशी ते आदराने वागू लागले. तरीही पन्नाशी ओलांडलेल्या, ओघळत्या चेहऱ्याच्या, पोट सुटलेल्या या माणसाला आपल्यासारख्या अनाकर्षक मुलीचा अंदाज घ्यावा वाटला याला कारण आपलं जगजाहीरपणे विनापाश असणं, असंच मला वाटलं आणि खिन्न व्हायला झालं. किंवा-

एकदा ऑफिसातून घरी परततानाच अंगात ताप भरला होता. कॉलनीच्या दाराशी हिंदकळत, खणखणत हातातली पिशवी झुलवत सुभद्रा, नेरूरकरशी फ्लर्ट् करीत उभी होती. तोही अर्धमिटल्या डोळ्यांनी तिच्याकडे बघत खूश होऊन आपल्या कुरळ्या केसातून हात फिरवीत होता. त्या दोघांना एका उदासीन हॅलोनं मागं टाकून मी पुढे गेले तर लव पतंग घेऊन माझ्या हाताला धरून मला खेचू लागला. मी एक अक्षरही न बोलता हात सोडवून घेतला आणि त्याला म्हटलं, 'अभी नही.' तो चक्रावून स्तब्ध झाला आणि खाली बघून मांजा गुंडाळत उभा राहिला. मी घरी येऊन अंथरुणावर कोलमडून पडले. डोळ्यांतून दोन उष्ण थेंब ओघळले. 'कुणी नाही आपल्याला, जे कपाळावरून हात फिरवेल नि आपल्या उशाशी बसून राहील.' मी ग्लानीतच भिंतीवर लटकणाऱ्या, आईनं भरलेल्या गणपतीच्या शेंदरी wall hanging कडे पाहिलं. आणि ग्लानीतच म्हटलं, 'तुझ्या जगात वैविध्य असावं म्हणून मीही काय? असू देत. तू साऱ्यांना जितका आणि जसा आहेस तितका आणि तसा तरी मला अस.' किती वेळानी कुणास ठाऊक दरवाज्यावर बेल वाजली तशी मला जाग आली. अंधारून आलं होतं.

मी कण्हत दरवाजा उघडला. पतंग कुत्र्यासारखा मागे ओढत लव आत घुसला. मी त्याला म्हटलं, ''इतनी रात गए बाहर खेलते रहते हो, तुम्हें अब घर जाना चाहिए'' तशी म्हणाला, ''मामा आलाय. मामा असताना आई घरात घेत नाही. तू टी.व्ही.

लाव नाहीतरी पतंग उडवायला चल.'' मी त्याला म्हटलं, ''मला बरं नाही. बुखार आहे.'' तशी तो एकदम हट्ट आणि तक्रार विसरून गंभीर झाला. माझ्या बिछान्यापाशी गुडघ्यावर बसला आणि मांजा गुंडाळत म्हणाला, ''मी तुला गोष्ट सांगू?'' मी हसून नको म्हटलं, तशी माझ्या कपाळाची एक पापी घेऊन पतंगानं वारा घालून निघून गेला. दरवाजा लागल्याचा आवाज आला नाही म्हणून मी गादीवरच उठून बसले तर नेरूरकर आत येताना दिसला. माझ्याकडे पाहात त्यानं दरवाजा लावून घेतला. ''माझा अवतार बघून तो म्हणाला, ''काय गं? अशी का बसलीयस?'' मी तोंडावरून हात फिरवत म्हटलं, ''काही नाही. ताप आलाय. बहुतेक.'' तो चट्कन ममताळू झाला. त्यानं हळुवार मला गादीवर निजतं केलं. म्हणाला, ''पाय चेपू?'' मी दुखेल इतकी मान हलवली, आणि माझ्याविरुद्ध मला कोरडे हुंदके येऊ लागले. तो म्हणाला, ''वेडी काय तू? मग आम्ही कशाला आहोत?'' आणि माझ्या तापलेल्या कपाळावर ओठ टेकून तो चावी घेऊन निघून गेला. आज नेरूरकर माझ्या अंगाशी झटला नाही. आजही त्याचे स्पर्श झाले पण निराळे. लव आणि नेरूरकर. एकाची मी माता - एकाची अभिसारिका. दोघंही माझ्या भाग्यरेखेवर ओठ टेकून निघून गेले आहेत. मग रात्री तो नि त्याची बायको आले. तिच्या हडकलेल्या बोटात चमचा धरून एक एक करीत तिनं मला पातळ पेज पाजली. प्रत्येक घास क्रूर प्राक्तनासारखा माझ्या घशात अडकला. मी डोळे मिटले. मला झोप लागलीसं वाटून ते एकमेकांच्यात काही कुजबुजले. जाताना तिच्या पायातली वाजलेली जोडवी मला स्पष्ट ऐकू आली. अंधारात शेंदरी गणपतीच्या डोळ्यांच्या जागी चिकटलेल्या दोन टिकल्या चमकत राहिल्या. नेरूरकरच्या शब्दांसारख्या. 'आम्ही आहोत ना!' आणि जोडव्यांच्या आवाजाच्या धाकात मला अर्धीमुर्धी झोप लागली.

मला आठवतंय, त्या तापानंतर मला नेरूरकरविषयी प्रथमच अपराधी आणि संकोची वाटलं आणि मग जाळ्यासकट चिमण्यांनी उडावं तशी मी त्याच्याविषयीचं पाशवी आकर्षण असूनही इथे तिथे मन रमवत, खरं तर कुठल्याही विनापाश, एकट्या माणसासारखी व्यवधानं धुंडाळत पाकोळी होऊन, भिरभिरू लागले. कुठल्यातरी अंध, अपंग - मुलांच्या शाळेतच जा किंवा first day covers passionately गोळा कर किंवा निराधार बायकांच्या संस्थेत ऑनररी कारकुनी कर किंवा beautician चा course कर, किंवा ट्रेकिंगला जाऊन सिग्रेटी ओढत डोंगरातून हिंड किंवा बारीकच होण्याचा सपाटा लाव असं... असं करता करता एक दिवस मी गाणं शिकायला लागले. आणि घर बसल्या मन रमवायला मला एक साधन झालं. एकदा पेटी काढून बसले होते. तर लव आला. त्याच्याविरुद्ध दहा एक मिनिटं बसला आणि शांतपणे माझं गाणं ऐकलं. मग मीच हसून त्याला म्हटलं, ''क्यू?'' तो म्हणाला, ''तुम गाती हो?'' मला खूप हसू आलं या प्रश्नाचं! ''मग आता इतका वेळ तुझ्या मते मी काय करीत होते' असं विचारण्याचं मनात आलं. तोच तो म्हणाला, ''कल तुम जो गा रही थी वो राग काफी था?'' मी अवाक् झाले. तुला कुणी...''माँ

कह रही थी.'' बरोबर. काल झोप येईना तेव्हा रात्री १०॥ नंतर मी गायला बसले होते खरी. ''मेरी माँ गाना जानती है । तिचे वडील गावाला देवळात पुजारी होते. ती त्यांच्याकडे शिकलेली आहे.'' इत्यादी. मग पतंगासारखाच गातानाही लव माझ्याबरोबर असायचा. तो इतकं सुंदर गायचा. नकळता. नक्कल करीत. पण अचूक आणि सहज.

गडप झालेली गंगा कुठेतरी पुन्हा प्रकट व्हावी तसं तिचं पाठकच्या संसारात दडपलेलं गाणं या मुलाच्या रूपात जणू सुरावलं होतं. तिचे ऐनाच्या पानासारखे गाल आणि त्यावरची कळी कशी... तसंच. लवमध्ये ते चैतन्य सळसळत होतं. उमलत्या फुलासारखं आतुर काहीतरी थरथरत होतं, बागडत्या सशासारखं अधीर, तुरुतुरू असं, एखाद्या अळीसारखं अधाशी, एखाद्या कारंज्यासारखं न थोपवता येणारं थुईथुई, ते सारं तिचं होतं. मनांत यायचं... आपला Sensse of humour कुणात बरं उतरेल?

तरी मी कॉलनीतून तुटत गेले आणि माझा संपर्क फक्त सुभद्रा - तिनं मला पंखाखाली घालायचा विडाच उचलल्यामुळे - लव आणि नेरूरकर यांच्याशीच प्रत्यक्ष असा उरला.

एकदा सुभद्रा गाडीत आकड्यावरचे काटे अलगद सुईवर घेऊन, आकडा दातात धरून, नजरही वर न करता आणि बोटांच्या हालचाली क्षणभरही न थांबवता मला म्हणाली, 'अरे, पाठककी वाईफ्के बारेमें सुना क्या?' बंद नाणं जमिनीवर पडल्यावर जसं खणखणतं तशी ती बोलायची. पण ती जे जे विचारेल आणि सांगेल त्यात आपल्याला भयंकर रस आहे असं दाखविण्यात मी पटाईत झाले होते. कारण सुभद्राविषयी नाही म्हटलं तरी मला एक ठुसठुसता गंड होताच. पाणीदार मोठे डोळे, आणि नितळ कांती वगैरे तर होतंच. पण हळूवार मोरपीस फिरवल्यासारखं पुरुषांना चाळवून, तरीही तिच्या नामानिराळ्या, स्वच्छ प्रतिमेला तडा जाऊ न देणारं, तिच्या आवाजासारखंच खणखणतं, तिच्या हसण्यासारखंच मोकळं, तिच्या छातीसारखंच गोल, भरदार असं एक आत्मविश्वासी आकर्षण तिच्यात होतं. नेरूरकर त्या आकर्षणाला बळी जाताना मी अनेक वेळा पाहिला होता. सुभद्राचं बरं होतं Married with two kids तसा सुरळीत संसार तिच्या लेखी नेरूरकर म्हणजे एक जेवणानंतरची Sweet dish आहे फारतर. आणि त्याच्या लेखी सुभद्रा म्हणजे एक रसाळ वैविध्य. दोघांनाही एकमेकांची असून अडचण नाही! नसून खोळंबा नाही!! त्या दोघांच्याही एकमेकांशी वागण्यात एक आत्मविश्वासी उघडपणा आणि बेफिकिरी असते. पण आपण? आपल्या लेखी नेरूरकर म्हणजे भुकेल्याची भाकरी आहे. भूक लागल्यावरही जी नेहमी मिळतेच असं नाही. आणि मिळते तेव्हाही जी चोरून खावी लागते अशी भाकरी. असो! एकेकाचं भागधेय!!!

तर सांगायचा मुद्दा म्हणजे सुभद्राविषयीच्या या छुप्या असूयेमुळेच मी आपणहूनच तिच्या पसरलेल्या पंखाखाली जायची. मी आताही अतिशय खोट्या उत्कंठेनं तिला विचारलं, ''काय ग? नाही बाई... काय ऐकलंस पाठकच्या बायकोबद्दल?'' तोंडातला आकडा तसाच



अनुक्रमणिका






ठेवून तिनं क्षणभर डोळे मिटले. हताश झाल्यासारखं करून तिनं तिची सुंदर, अरुंद जिवणी मुडपली. आणि म्हणाली, 'My God! You are impossible! she is whoring away with the whold town & you don't know? मी त्या बातमीपेक्षाही ती बातमी देतानाच्या तिच्या सहज आविर्भावानं थक्क झाले. मला सुभद्राविषयी एक अत्यंत उदात्त असा तिरस्कार वाटला. मग ती काय काय सांगत होती... कशी पाठकच्या बायकोकडे माणसं येतात. कशी ती खिडकीत उभं राहून कुणाकुणाला खुणावत असते. कसं तिला रिक्शातून कोंबून नेताना अमक्यानं पाहिलंय...कसं एकदा ती घरी नाही पाहून एका desperate माणसानं तिसरीचाच दरवाजा वाजवला होता. कसं एकदा एका टोळक्याला वॉच्मननं अडवल्यावर त्यांनी दुपारी तो घरी जाताना गाठून मारलं. कसं या चीप, नटव्या बाईमुळे अख्ख्या कॉलनीचं सांस्कृतिक संचितच धोक्यात आलंय. गाडी चर्चगेटला आली. सुभद्रानं दोन तीन इंचानं वाढलेलं विणकाम पिशवीत कोंबलं आणि आम्ही आपापले रस्ते धरले.

सुभद्रानं ज्या दिवशी सकाळी मला पाठकच्या बायकोविषयी सांगितलं. त्याच दिवशी रात्री तो प्रसंग घडला. नेरूरकरनं मला वाजवायला दिलेली अत्रेंची कॅसेट् लावून मी चक्क कॅसेट ऐकत पडले होते. अचानक बेडरूमच्या खिडकीतून आदळआपट, किंचाळ्या, शिव्या, रडारड असे आवाज एकावर एक यायला लागले. ते पाठकच्या घरातूनच येत होते. पाठकचा, तोवरा भरलेला, 'र' ला 'द' म्हणणारा बोबडा ॲक्सेंट् माझ्या चांगला लक्षात होता. हे असं यापूर्वीही घडलं होतं. पण मी ते त्यांच्या भारतीय संस्कृतीचा, नात्याचा, गरजेचा अपरिहार्य भाग म्हणून स्वीकारलं होतं. चालायचंच! असं म्हणून. लव मला भेटला. हसता-बागडता, रुसता भांडताना दिसला की मला पुरेसं व्हायचं. मी त्याला घराबद्दल एकही प्रश्न कधी विचारला नव्हता. माणसं आपल्या निरागस, निरामय आयुष्याला विषारी कुतुहलाच्या चोची मारतात, शंका - आरोपांचे डंख करतात, तेव्हा काय होतं हे मला ठाऊक होतं. ते मला या निरागस, नितळ मुलाला निदान माझ्यामुळे तरी समजू द्यायचं नव्हतं. पण त्या रात्री मला राहवेना. पाठकच्या बायकोबद्दल जे ऐकलं होतं ते दिवसभराच्या घटना, माणसां-क्षणांखाली दडपून गेलं होतं. वाळूतून वाळू कोरत तुरुतरू खेकडा बाहेर यावा तशी माझ्या जाणिवेवर ती बातमी खरखरली.

सुभद्राला एखादी बातमी समजणं म्हणजे रीतसर परिपत्रक फिरवल्यासारखंच होतं. कदाचित् या साऱ्याची चर्चा ही पाठकच्या कानावर गेली असेल. असेल का? पाठक हल्ली दिसतच नाही. परवा दिसला. तेव्हा खूप खंगल्यासारखा. थकल्यासारखा दिसला. डोळ्याभोवती काळी वर्तुळं आणि बहुधा पिऊन घरी चालला असावा. कारण बघूनही खाली मान घालून गेला. डोळ्यांभोवती झिरमिळ्या पाडणारं हसला नाही;

पाठक ओरडत होता. भेकल्यासारखा, रडल्यासारखा आणि दमून धाप लागल्यासारखा मध्येच खर्जात बरळत होता. पुन्हा एखादी चपराक आणि लाथ बसली किंवा बसणार असली की ती किंचाळू

लागायची. हात मुरगळल्यावर कळवळतात तशी कळवळायची. त्यांचे श्वास ही ऐकू आले असते अशी नीरव रात्र होती. अचानक माझ्या लक्षात आलं. ते दोघांचेच आवाज होते. लव? झोपला असेल? दुसरे दोघे? या गदारोळात...

एखाद्याचा अंतर्गत मामला म्हणजे जीव घेण्याचा परवाना नव्हे. सारी कॉलनी शांत होती. कित्येक घरांतून दिवे दिसत होते. पण कुणी या प्रकाराची दखल घ्यायला तयार नव्हतं. आपल्या अलिप्ततावादी, सुसंस्कृत पडद्यातून बाहेर यायला तयार नव्हतं. मला लवची आठवण आली, नि असह्य झाली. मी एका तिरमिरीत खाली गेले, नि जिन्यावरच थबकले. पाठकच्या बंद दरवाज्यासमोर पिचकुड्या डोळ्यांचा, लव आणि त्याचा जुळा भाऊ असे तिघे होते. जुळा भाऊ चिडक्या चेहऱ्याने घरंगळत खाली जाऊन बसला होता, आणि पेंगत होता. मिचकुडा भोवऱ्याला दोरी गुंडाळून भोवरा हातावर मख्ख चेहऱ्याने झेलण्यात मग्न होता. आणि लव दोन्ही हात मागे धरून, भिंतीला टेकून, लांब पापण्यांच्या उघड्या डोळ्यांनी समोर बघत होता. त्याचे डोळे पाणेरलेले होते. पण त्यातून पाणी वाहत मात्र नव्हतं. मी नेमका मुद्दयाला हात घालावा तसं बाकीच्या फंदात न पडता त्याच्यासमोर गेले आणि म्हणाले, 'चलो मेरे साथ।' त्यानं माझ्याकडे एक क्षण नुसतंच पाहिलं आणि मग जोरात मान हलवली. मग एकदम चिडून तो म्हणाला, 'तूम जाओ! मै उसीकी गोदमें सोऊंगा।' आणि नीरव रडू लागला. मी अवाक् झाले. जिव्हारी लागणारा घाव फक्त लहान मुलंच करू शकतात, निष्पापपणे, नकळत आणि म्हणून परतवता न येणारा घाव. मी त्याचे डोळे पुसले.

अखेर त्यांच्यातला जैविक बंध मी तोडू शक्त नव्हते. नाही. त्याच्या पापण्या, त्याची खळी, त्याचं चैतन्य, त्याचा सूर, त्याचं पतंग उडवणं हे तिचं आहे. तिच्या पेशींनी ते त्याच्या पेशीत ओतलं आहे. तिच्या त्याच्यात मला मज्जाव आहे. हे रिजेक्शन फक्त ॲक्सेप्टन्सनंच साहता येतं. मी गुडघ्यावर बसले होते. नेहमीसारखी त्याला thumps up ची खूण करून मी उठले. तोच दरवाजा उघडला. दरवाज्यात पाठक उभा होता. अशीच सवय असल्यासारखी ती तिन्ही मुलं आत गेली. चिडक्या अशक्त, कुशला पाठकनं उचलून घेतलं आणि मिचकुड्याच्या डोक्यात थाड्दिशी एक थप्पड मारली. त्यानंतर त्याला मी दिसले. कुशला थोपटत दरवाजा लावताना तो almost डोळ्याभोवती झिरमिळ्या पडतील की काय असं ममताळू हसला की मायाळू आणि उत्कट माणसंच इतकी उत्कट हिंस्र होऊ शकतात? असा विचार करीत मी घरी गेले. जवळजवळ एक प्रकारच्या सक्तीनंच माझे डोळे खिडकीतून नेरूरकरच्या बाल्कनीकडे वळले. सारं घर अंधारात बुडून गेलं होतं. फक्त त्याच्या बेडरूममध्ये एक उदास, आणि शांत असा निळा दिवा झरत होता. पुन्हा एक्दा मी बाहेर ढकलल्यासारखी झाले.

अशा अतोनात एकट्या क्षणी परमेश्वरालाही उदार क्षमा करून टाकण्याला मर्त्य माणसाला पर्याय उरत नाही हे मला उमजलं. मी डोळे मिटले. मिटलेल्या डोळ्यांसमोर निळी निळी वर्तुळं काही काळ उमटली आणि लवच्या गालांना पडणाऱ्या



अनुक्रमणिका







खोल खळीसारख्या गर्तेत बुडल्यासारखी मला शांत झोप लागली.

त्यानंतर चार एक दिवसातलीच ही गोष्ट आहे. मी जेवण वाढून घेतलं आणि समोर टी.व्ही. तेवत ठेवून घास घेणार इतक्यात कर्कश बेल वाजली. लवला आवडणारी राजमा उसळ केली होती. म्हणून मी उत्साहात उठून एका हातानंच दरवाजा उघडला. गाढव दोन दिवसात कुठे दिसलाच नव्हता! तर समोर कॉलनीतल्या दहा बारा जणांचा घोळका. दोन्ही हात मागे धरून, खाली मान घालून उभा असलेला. काळ्या मुंगीसारखा निरुपद्रवी किणी आणि श्वासोच्छ्वासासारखा सतत जो स्कूटरची चावी फिरवत राहायचा तो काळाभोर उद्धट कदम एवढेच माझ्या ओळखीचे चेहेरे होते. किणीला मागे ढकलून एक जण पुढे झाला. च्युइंग् गम चावत त्यानं माझ्यासमोर एक कागद फडफडवला. कसल्यातरी पत्राचा खर्डा वाटत होता. 'इथे सही कर.' असं कदम मला चावी फिरवत म्हणाला. आणि त्यानं मागं वळून जथ्याला एक तुच्छ स्माइल् दिलं. मी विचारलं, 'हे काय आहे? कशावर सही करायची?' 'सही कर मग सांगतो.' मी त्या जथ्याकडे पाहिलं. बहुतेक जण मला आणि माझ्या घराला न्याहाळत होते. पण त्यांच्यात एक अधीर उत्साह संचारलेला होता. त्यांच्या त्या ताटकळण्यातूनही मला तो जाणवत होता. मी अधिक न ताणता सही केली. 'जारे तुम्ही राहिलेल्यांच्या सह्या घेऊन या. मी गेटवर तुम्हाला भेटतो. तोवर हिला सांगतो काय आहे ते.' 'वाटल्यास मजजवळ एक अतिरिक्त प्रत आहे. तुम्ही वाचून घ्या.' असं म्हणून काळीमुंगी किणी दोन्ही हात मागे धरून त्या सरसर जिन्यानं वर गेलेल्या जथ्यामागोमाग सावकाश मोजत पावलं टाकीत वर गेला. कदम टी.व्ही. बघत दोन पाय फाकवून खूर्चीत at ease बसला होता. 'vediocon काय? माझ्याकडे या महिन्यात येतोय' इत्यादी. मी 'हं' म्हणून T.V. बंद केला. कदम एकदम जमिनीवर आला. म्हणाला, 'तुला माहीत नाही?' मी म्हटलं, 'नाही.' 'तुझ्या खालीच राहतो ना तो पाठक?' मी alert झाले. 'त्याचं काय?' अरे, बायकोला धंद्याला लावलीय त्यानं. तिच्याकडे किती माणसं येतात जातात देवळातल्यासारखी. काही पत्ता नाही?' 'हे साले काशीतले ब्राह्मण. भांच्योद पंधरा जणानी अंगाखाली घेतलेली बाई बाईल म्हणून नांदवतो? अरे, आम्हालाही बायका, बहिणी आहेत. तिच्याकडे जाणारे रंडीबाज उद्या आमची दारं वाजवतील. जंटलमन् लोकांची ही कॉलनी आहे.' तो सुरूच राहिला. मी पत्रावरून नजर फिरवली.

As she is carrying on prostitutional practices, apparently with the approval of her husband, and thus spoiling the cultural atmosphere of this colony...

मी घडी करून पत्र मुठीत धरलं आणि तिरसट चेहरा करून बसून राहिले. कदम एक क्षणभर चावी थांबवून माझ्याकडे बघत राहिला. त्याच्या काय ते लक्षात आलं. तो उठला आणि म्हणाला, 'तू एकटी राहतेस. काळजी घे. अर्थात् आम्ही आहोत म्हणा. पाठकला हितून हुसकल्याशिवाय राहणार नाही. चल निघतो. आता सह्यांचं झालं की मीटिंग आहे.' आणि मग वळून म्हणाला,

'Vediocon ला किती कट् दिला तुला डीलर नं?' मी उत्तर दिलं आणि दरवाजा लावला. थंड झालेल्या राजम्याच्या उसळीभोवती एक डास उत्साहानं फिरत होता. मी तशीच ट्यूबच्या भगभगीत प्रकाशात त्याच्याकडे बघत बसून राहिले. काही मिनिटांनी जिन्यावरून पंधरा वीस जणांचे तीस चाळीस पाय सरसरसरसर वाजत गेले. तोच जथा, एका अनन्वित उत्साहानं बडबडत, शिकारीची योजना करीत, हल्ल्याची आखणी करीत गेल्यासारखा गेला. मी पत्रावरून नजर फिरवली. पत्र हस्ताक्षरात होतं. काळी मुंगी किणीच्याच. प्रश्नच नाही. तो नोटीस बोर्डावर पण सुविचार, thought of the day वगैरे असलंच काहीतरी लिहीत असतो. घरगुती चौबळांनी हं हं म्हणत तर्जुम्याला संमती दिली असेल. सुभद्रानं very good असं खणखणत्या आवाजात म्हणून ओठांचा चंवू करून सही केली असेल. रजनीनं पदराला हात पुसत पुसत सही करून 'हो नं. हे थांवायलाच हवं.' म्हटलं असेल. कुठलाच नियम उघडपणे धुडकावण्याचं धाडस ज्यांना कधी झालं नाही, अशा असुरक्षित, भेकड जथ्याच्या या हिंम्र कारवाया. काहीच पणाला न लावता, जखम करून त्या जखमेत चोच खुपसत राहण्याचा हा खेळ. एखाद्याचं घर मोडूनही करायचा... पण मीही सही केलीच. जथ्याला घाबरून. त्यांच्या संख्याबळाला बळी पडून. संवादाची क्षमताच हरवल्यावर. माकडीण पिलाला पायाखाली घेते तसं मी लवचं घर मोडलं. निदान मोडायला संमती दिली. SPARE ME. SPARE ME एवढी एकच विनंती अखेर आपल्याला या माणसांना करायची असते काय?

दुसऱ्या दिवशी रविवार होता. टळटळलेल्या दुपारी नेरूरकर आला. हातातला डबा त्यानं माझ्याकडे दिला. आणि तो खुर्चीत बसता झाला. आज त्याचा नूर निराळा होता. मग्न, उदासीन. पण आज माझाही नूर निराळा होता. धुमसता, जखमी. मी आल्या आल्या त्याला म्हटलं, 'ड्राफ्ट वाचलास?' तो मुंडी हलवून 'हो' म्हणाला. मी म्हटलं, 'तू सेक्रेटरी आहेस. तू ड्राफ्ट बदलू शकतोस तुझ्या अखत्यारात. तू ड्राफ्ट बदल. बदलच.' मी एका दमात म्हटलं. 'अरे, ती कुणाची बायको आहे. कुणाची आई आहे. तिला तुम्ही वेश्या म्हणता आणि तो कागद दारोदार फिरवता?' मला पुढे बोलवेना. नेरूरकर माझी अवस्था बघून जरा भानावर आला होता. सावधपणे तो म्हणाला, 'पण तिच्याकडे माणसं येतात हे खरं आहे.' मी क्षणभर अवाक् झाले. मग शांतपणे वर्फात चाकू खुपसल्यासारखं म्हणाले, 'तूही माझ्याकडे येतो.' तो कळवळून गेला. आणि लांब वाढवलेल्या करंगळीच्या नखावरून बोट फिरवू लागला. मूकपणे मान हलवत राहिला.

'अरे, लग्नाशिवाय आयुष्यात येणारा प्रत्येक पुरुष म्हणजे गिऱ्हाईक नसतं. फारतर एखादा गरजू इसम असतो. आणि तुमच्या गरजेचा आणि त्याच्या गरजेचा पोत जुळला आणि परिस्थितीनं साथ दिली तर कुठल्याही स्त्री-पुरुषात हे संबंध उगवू शकतात.' नेरूरकरला यातलं काय कळत होतं कुणास ठाऊक. पण मला माझं मन स्पष्ट माहीत होतं की नेरूरकरविषयी काही काही माहीत नसताना मला त्याच्याविषयी जे आकर्षण वाटलं ते निव्वळ शारीर होतं. ज्या संबंधाची










शरीर किंवा मनाला नड नसताना इतर कुठल्या कारणांनी जो संबंध येऊ दिला जातो तो व्यभिचार. मग ते कारण सत्ता, संधी, ब्रेक मिळवण्यासाठीचं असो वा निव्वळ कंटाळ्यावर मात करण्यासाठीचं. जितकी नड कमी तितका त्यातला व्यभिचार जास्त. आणि ही नड व्यक्तिसापेक्ष असते. एकाची नड काय आहे हे दुसरा ठरवू शकत नाही. ही व्यभिचारासाठी पळवाट ठरू शकते. म्हणून समाज नियम वगैरे ठरवतो. हे नियम आदरानं, कौतुकानं पाळणारी कुणी माणसं असतात का? समाज वगैरेंनी घालून दिलेले नियम तमाम जनता घाबरून, दचकूनच पाळते. जे घाबरत नाहीत त्यांना हे नियम बंधनकारक ठरू शकत नाहीत. पण जे दुबळे असूनही एका बलाढ्य अंत:प्रेरणेच्या रेट्याने tactlessly नियम मोडतात— पाठकच्या बायकोसारखे — त्यांचे हाल करायला समाज हावऱ्या लांडग्यासारखा पुढे धावतो. की तसं काही नाहीच? प्रामाणिकपणा हाच साऱ्या पापपुण्याचा निकष आहे? जिथे स्वत:सकट कुणाचीच फसवणूक नाही असा कुणातलाही संबंध योग्यच आहे? निदान स्वच्छ?

मी विचार खूप केला होता. पण हे सारं, नेरूरकरबरोवर अप्रस्तुत होतं. अखेर ड्राफ्ट बदलून घेणं इतकंच त्याच्याकडून मला हवं होतं. नेरूरकर म्हणाला, 'ती वेश्या नाही. हे मला माहित्ये. पाठकही तसा बरा माणूस आहे. चुकला. पण कोण चुकत नाही? काळं किंवा पांढऱ्याच्या मधलंच आहे जग.' मला अचानक नेरूरकरची पापी घ्यावीशी वाटू लागली. तो मग मला पाठकविषयी पाठकनंच त्याला सांगितलेलं काय काय सांगू लागला. पाठक सगळ्यात मोठा मुलगा. घरची हीऽ गरीबी. धडपडत शिकून नोकरी वगैरे मिळवली. पाठच्या बहीणभावांची शिक्षणं, लग्न लावता लावता याची पस्तिशी आली. गावातल्याच गरीब पुजाऱ्यानं शहरातली चांगली नोकरी आहे म्हणून आपली तरुण मुलगी याला दिली. गावची उस्तवार करता करता सेव्हिंग झालंच नव्हतं. पाठक मुंबईला आला. धारावीत राहू लागला. तिकडची गुंडगिरी. धकाधकी. डोक्यावर कर्ज होतं. कायमचं तर तिथं राहायचं नव्हतंच. पण मुंबईत घर म्हणजे... त्यानं बायकोला तिथल्या दादापाशीच रुजू केली. वापरली. या टेन्शनच्या काळात पाठकला दारूची चट लागली. त्याचा अस्थमा बळावला. वयातल्या अंतरापायी त्याचं उधाण तर तसंही तिच्यापेक्षा मंदावलेलंच होतं. तो दारू पिऊन तिला मारायचा. ती सहन करायची. तो ओकायचा. ती काढायची. तो खोकायचा. ती रात्र रात्र जागून त्याचा कफ गोळा करायची. एकदा गुंडाशी झालेल्या मारामारीत पाठक निकामी झाला. त्या फ्रस्ट्रेशनमध्ये त्यानं तिला मारलं तेव्हा ती पोटुशी होती. तिच्या पोटातलं मूल पडलं. ते पाठकचं मूल होतं. त्यानंतर ती पाठकला बधेनाशी झाली. पाठकही आपल्या अपराधी मनावर फुंकर घालीत गप्प बसू लागला. पण ती त्याची बायको उरली नाही. तरी त्याची आई राहिलीच. पाठक हे विसरू शकत नाही. पाठक तिला घराबाहेर काढू शकत नाही. पाठक ज्या मुलांचा बाप म्हणून मिरवतो, त्यातलं एकही मूल पाठकचं नाही. पण देणं चुकवल्यासारखा तो...

या गुंतागुंतीच्या तिढ्यानं पाठक प्रकरणावर एक वेगळाच झोत टाकला. मी

स्तब्धपणे ऐकत होते. नेरूरकर अचानक म्हणाला, 'तू ड्राफ्टवर सही केलीस?' मी म्हटलं, 'हो. ते इतके जण होते. मला नाही म्हणता आलं नाही. तू?' तो म्हणाला, 'नाही. तेच तुला सांगत होतो. माझ्याकडे ड्राफ्ट घेऊन आले तेव्हा मी नव्हतो. तिनं वाचला अन् तसाच परत दिला. मला आल्यावर तिनं सांगितलं आणि म्हणाली, 'तुम्ही सही करू नका. त्यांना इथून हाकलतायत ते. घरात मुलंबाळं आहेत. त्यांना रस्त्यावर काढू नका.' मी बधत नाही म्हटल्यावर म्हणाली, 'अहो, माझा तुम्हाला काही उपयोग नाही, मग तुम्ही नाही का तिच्याकडे जात? ती एकटी आहे, तुमच्या वयातली आहे, शिकली सवरली आहे. आणि समजूतदार आहे. म्हणून चव्हाट्यावर न येता तुमचं तिचं चालू शकतं. अहो, तुम्हाला मन रमवायला सिग्रेटी आहेत, दारू आहे. पिक्चरं आहेत. बाहेरची एवढी दुनिया आहे. तरी... पाठकच्या बायकोनं काय करायचं? तुम्ही सही नका करू...'

मी त्याच्याकडे पाहिलं. तो माझ्याकडे पाहत नव्हता. जणू ती बोलतानाचा तिचा चेहरा डोळ्यांसमोर आल्यासारखा तो गुंगला होता.

'म्हणजे त्यांना हे सारं पहिल्यापासून माहित्यै?' 'असं दिसतंय?' लांब नखानं खुर्चीवर टकटक करीत खांदे उडवून तो म्हणाला. मग तो उठला आणि दरवाज्याजवळ गेला. नेहमीच्या शिरस्त्याने आम्ही दोघे जवळ आलो. पण कुणीतरी बघितल्यासारखे लांब गेलो. तो दरवाजा उघडत म्हणाला 'तुझ्यासाठी डाळिंबी भात पाठवलाय. बरा झालाय.' आणि तो निघून गेला. जितक्या अचानक हे सारं सुरू झालं तितक्याच अचानक संपून गेलं आहे ही जाणीव तिच्या हडकलेल्या बोटातल्या जोडव्यासारखीच माझ्या मनात सलत राहिली.

दुसऱ्या दिवशी office ला गेलेच नाही. घटनांचा शीण आल्यासारखा झाला होता. शाईचा एखादा मोठ्ठा थेंब टपोरावा पण ठिबकूच नये तशी रात्र माझ्या उघड्या डोळ्यांसमोर जमत होती, पण सरतच नव्हती. पहाटे कधीतरी डोळा लागला. ११/११॥ ला उठले. दुधाची पिशवी एखाद्या पोरक्या, गरीब मुलासारखी दरवाज्याबाहेर पडली होती. ती उचलून आत आणली. चहा करून चहा पीत पीत बाल्कनीत गेले. पाण्याचे पंप, कुकरच्या शिट्ट्या, आपटून धुतले जाणारे कपडे, पाववाल्यांच्या सायकली, दूधवाल्यांचे कॅन्स, मुलांना आयांच्या हाका, लिफ्टस्‌चे उघड बंद होणारे दरवाजे, भूले बिसरे गीत... सकाळचे सारे परिचित आवाज संपून गेले होते. आणि सकाळची आन्हिकं आटपून जपमाळ ओढीत बसलेल्या आजीसारखी कॉलनी पेंगली होती.

अचानक लक्ष गेलं तर खालून पाठक लगालगा चालला होता. त्याच्या एका हातात एक मोठी ट्रंक होती. आणि एका हाताता पेंगून लुडकलेला लवचा जुळा भाऊ होता. मागून त्याची बायको एका खांद्याला झोळी लटकवून ताठ, संथ चालली होती. तिच्या दुसऱ्या हाताला, झोंबत, उसळत, उड्या मारीत लव चालला होता आणि मागून मिचकुड्या डोळ्यांचा मुलगा. बरंचसं सामान हातात घेऊन कुणीतरी लोटल्यासारखा.

म्हणजे पाठक घर सोडून चालला? माझ्या हातातला चहाचा कप हिंदकळला. म्हणजे पाठक घर सोडून चालला. जथ्याचा



अनुक्रमणिका






विजय झाला. जथा झिंदाबाद.

दूरवर एक टॅक्सी उभी होती. ते सारे त्या दिशेनं चालत होते. पाठकला हुसकला. बिळात पाणी घालून उंदीर बाहेर काढावा तसा. पाठक लगालगा चालत होता. त्या उंदराची जगण्याची निर्लज्ज धडपड पाठकच्या चालीत होती. माझ्या घशात घोट अडकला. त्याची बायको संथ ताठ चालत होती. त्याच उंदराची जगण्याच्या हक्काची जाणीव तिच्या चालीत होती. पाठकच्या एका हातात पेंगून लुडकलेला लवचा जुळा भाऊ होता. पाठकच्या बायकोच्या हाताला झोंबत, उसळत, उड्या मारीत लव चालत होता. ती दोघं तिचीच दोन रूपं होती. लव - एक चैतन्यमयी, उसळती जिगीषा आणि कुश - एक कण्हतं आजारी औदासिन्य. एक पाठकच्या अपरोक्षच फुलणारं आणि एक पाठकच्या सहवासात बावलेलं. मागून मिचकुड्या डोळ्यांचा मुलगा कुणीतरी लोटल्यासारखा चालला होता. त्यांच्यातल्या नातेसंबंधांसारखाच. नफ्फड, निगरगट्ट, निरीच्छ, निर्विकार.

ते सारे टॅक्सीत वसले. लव खिडकीतून आईची रिबीन बांधलेली वेणी बाहेर काढून झेंड्यासारखी हलवत होता. जाताना लवनं मला सांगितलंही नाही जातो म्हणून. आत्ताही त्याची नजर माझ्याकडे एकदाही वळली नाही. लहान मुलं साली गुलाबाच्या रोपट्यासारखी कुठेही घेऊन जावी पिशवीतल्या मातीतून! लवही जाईल तिथे रमेल. आठवणी काढण्याचं, कुढण्याचं त्याचं वय नाही. टॅक्सी सुरू झाली आणि निघून गेली. आणि शेवटी तिचा ठिपका झाला. गेला, लव गेला. मी बाल्कनीतून घरात वळले.

एकटेपणाची एक बारीक खंत नाहीश्या होणाऱ्या टॅक्सीच्या ठिपक्यासारखीच जाणिवेत नव्यानं विरून गेली.

मी घरात शिरले. रोज दिनक्रमाच्या घट्ट वेटोळ्यात अगदी गुदमरेपर्यंत आपण आवळलेले असतो. आज मरून पडलेल्या लिवलिवीत सापासारखं ते वेटोळं निश्चेष्ट बाजूला पडलंय आणि पांढऱ्या फक्क दिवसाचा खड्डा समोर येऊन उभा ठाकलाय. त्यात पाऊल टाकण्याच्या कल्पनेनं मी शहारले.

ती टॅक्सी चित्रातल्यासारखी गोठून उभी असेल तर? किंवा slow motion सारखी चालत असेल तर? पुन्हा आपल्याला दूरवरून, तिच्या खिडकीतून हलणारा रिबिनीचा गोंडा दिसेल? मी वेड्यासारखी गच्चीत गेले. गच्ची तापली होती. नीरव, निस्तब्ध आसमंत, कडक, निळ्या आकाशाखाली सुलाखत होता. कुणाच्या तरी अँटिनाला अडकून एका फिकटलेल्या, गुलाबी पतंगाचं लक्तर लोंबत होतं. एखादा बेपर्वा दगड बसून मोहोळ उठावं, तशी रंगीबिरंगी पतंगांच्या अनेक फडफडत्या सकाळींचे डंख मला झाले. मी खाली नजर टाकली. नेरूरकरच्या बाल्कनीत नेरूरकरची बायको जानव्यासारखा पदर घेऊन, साडीवर खोचून, जिवाच्या आकांतानं खिडक्यांच्या काचा पुसत होती. मी तिला का हसावं? तिचंही हे खड्डा भरणंच चालू आहे. दिवसांच्या न बुजणाऱ्या गर्तेत बटणांची मांजरं, बाटल्यांचे ताजमहाल फेकायचे... ती घर स्वच्छ करतेय. तिच्याकडे कधीतरी रात्री नेरूरकर येईल. माझ्याकडे तो यायचा. जाण्यासाठी तिच्या घरून तो जातो...

येण्यासाठी आणि तरी दोघीही एकट्याच होतो. टॅक्सी दिसण्याची खोटी आशा दूरवर, निर्मनुष्य शेतांतून वाफ वाफ होऊन गेली होती.

पण असण्याला पर्याय नव्हता. घरी जाण्यासाठी वळले, तर मिचकुड्या डोळ्यांचा, मुरूमं आलेला तो तिशी पस्तीशीचा मुलगा गच्चीतल्या एका कोपऱ्यात नखं खात उभा होता. जणू त्याच टॅक्सीच्या ठिपक्याची त्यालाही आशा लागली होती. त्याला पाहताना का कोण जाणे मला त्या पतंगाच्या लक्तराची उपमा सुचली. घरात शिरताना माझ्या मनात आलं, अनेक एकटी माणसं एकत्र आली म्हणून दुकटी थोडीच होतात?

मग मीही पेटी काढली. राग काफी - ये एक संपूर्ण जातिका राग है । इसमें दो स्वर कोमल तथा बाकी सव स्वर शुद्ध लगते है। प्रात: समय छोडके इस राग को कभीभी गाया बजाया जाता है। करूण, शृंगार रस इस रागमें विशेष खुलते है।...

दिवसाच्या खड्ड्यात मी निर्ममपणे काफीचे सूर फेकत राहिले. ती काचा पुसत होती ना.... तशीच....

☐

मेघना पेठे
बी-३/१६८, रिझर्व बँक कर्मचारी
वसाहत, कांदरपाडा, दहिसर (पश्चिम),
मुंबई ४०० ०६८.

---

## स्वागत

- ☐ **कुसुमाग्रजांच्या प्रतिभेचा उगम विकास :** डॉ. द. वि. पुंडे, पृष्ठे २०६
- ☐ **लक्ष्मीबाई टिळकांची स्मृतिचित्रे एक चिंतन :** मीर इरहास शेख पृष्ठे १२०
- ☐ **धर्मराजाचा वारसा :** मीरा शिराली, पृष्ठे २००
- ☐ **कृष्णकली :** पद्माकर जोशी, पृष्ठे २४०
- ☐ **अत्र्यांची करुण गंभीर नाटके :** डॉ. शशिकांत देशपांडे
- ☐ **भाषांतर मीमांसा :** कल्याण काळे, अंजली सोमण, पृष्ठे ४१५
- ☐ **अत्रे साहित्य दृष्टी व साहित्य विचार :** प्रा. रा. ग. जाधव, पृष्ठे १९०
- ☐ **वेदना-संवेदना :** संगीता जोशी, स्नेहल प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६४

**मंजुळ प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने**

- ☐ **झूला :** सौ. संजीवनी तोफखाने, पृष्ठे ४८
- ☐ **सल :** अप्पा दळवी , पृष्ठे ८९
- ☐ **अवाला :** विष्णू काशिद, मंजुळ प्रकाशन, पुणे पृष्ठे ९१
- ☐ **इंद्रधनू :** जगदीश देवरे, पृष्ठे ७२
- ☐ **संग :** डॉ. दिलीप शिंदे, पृष्ठे ७५
- ☐ **हे दान त्या क्षणाचे :** राम कदम, शारदा प्रकाशन, ठाणे, पृष्ठे ७२
- ☐ **मनोभावे :** अश्विनी भावे, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे १५२

## ननैतिक-नलैंगिक भूमिका/मेघना पेठे

या कथांचं वेगळेपण BOLD या विशेषणातून सुचित होत नाही. हे वेगळेपण कशात आहे? असलंच तर —

(१) माणसाचा सम्यक विचार करीत असताना त्याचं शरीर आणि मन पूर्णत: वेगळं करता येत नाही या मान्यतेत आहे.

(२) लेखकाच्या ननैतिक, नलैंगिक भूमिकेत आहे.

(३) साध्याच घटना - प्रसंगांना साक्षित्त्वानं 'पाहताना' त्यांना रिॲक्ट होताना, माणसाला स्वत:विषयी आणि स्वत:तून संपूर्ण माणूसपणाविषयी काही एक शोध लागत जातो. हा शोध वेधण्याच्या प्रयत्नात आहे.

(४) माणसाचं एकाकीपण LONALINESS आणि एक्टेपण (ALONENESS) या दोन अत्यंत निराळ्या गोष्टी आहेत. या कथांमध्ये आग्रहानं आलं आहे माणसाचं एक्टेपण - अर्थात ALONENESS. निवडीचं अमर्याद स्वातंत्र या कथांत गृहीत धरलेलं आहे. त्यामुळे भवताल कोणताही असो, त्याला REACT करणारा माणूस निरंतरपणे हे निवडीचं स्वातंत्र्य राबवीत असतो. हा भवताल त्यानंतर त्याच्यापुरता पूर्ण निराळा-अपूर्व, अद्वितीय या अर्थानं-होत जातो. कुठल्याही दोघांचं त्यामुळे तेच आणि तसंच भासतं. पण नसतं.

अश्या तऱ्हेने तंतूतंतूनं माणसं एकमेकांपासून वेगळी होत जातात. इतकंच नव्हे, तर रिॲक्ट होणाऱ्या या फरकामुळे कालचा माणूस आज वेगळा होतो. हे इतरांपासूनच नव्हे, तर स्वत:पासूनही वेगळं होत जाणं ही जाणीव रेखायची हा या कथांचा असलाच तर हेतू आहे.

समुद्री चहुकडे पाणी या कथेचं वैशिष्ट्य सांगायचं झाल्यास -

या कथेत आत्मनिवेदनाची शैली वापरली आहे. यामुळे कथनातल्या संपूर्ण प्रामाणिकपणाला एक विश्वासार्हता लाभते. आणि कुठेही बिलंदर लपवाछपवी न करता नायिकेला स्वत:च्या शारीर आणि भावनिक गरजा यांचा एक लेखाजोखा मांडता येतो. पण या कथेत एवढंच नाही.

स्वत:च्या आयुष्यातला सोबतीचा अभाव, शारीर-भावनिक गरजांचा होणारा कोंडमारा, संपूर्ण एक्टेपणा आत्मबळावर झेलायला लागण्याचं भागधेय, हे सारं तिला जाणवत असतानाच दुसऱ्यांच्या आयुष्यातले तिढे, घालमेल, ढोंगं, बुरखे, दडपण, दडवणूक, फसवणूक, शोषण, निरर्थक हेतूहीनता आणि निर्णयस्वातंत्र्याच्या धुरेखाली दबलेलं अस्तित्व हे सारंही तिला दिसतं. बघता येतं. अंतिम उत्तर नसणारे, कायम टांगतेच राहणारे काही प्रश्न जाणवतात. पारंपारिक रीतीरिवाज, समाजमान्य नाती, व्यवस्था यांच्या चौकटीच्या बाहेर फोफावलेले प्रश्न आणि एकूणच माणूसपणाबद्दल तिच्या मनात नव्यानं एक निराळं भान जागं होतं.Judgemental होण्यापासून मुक्त करणारी एक अनुकंपा.

लवमुळे पाठकच्या बायकोबद्दल वाटणारी असूया, नेरूरकरच्या बायकोविषयी वाटणारी असूया, नेरूरकरबद्दलची शारीर ओढ, आणि जथ्यातल्या प्रत्येकाबद्दलची घृणा या सुरुवातीच्या 'एकेरी' भावनांना छेद देणारं काही, उलटंसुलटं करणारं काही काळाच्या ओघात तिला समजत जातं आणि या सम्यक ज्ञानातून चूक - बरोबरच्या पलिकडची सारंच मान्य करणारी क्षमाशीलता तिच्यात येते.

*स्वत:सकट सगळ्यांना क्षमा करण्याचं बळ देणारं 'साक्षीत्व' येतं त्या बिंदूपर्यंतचा प्रवास एका open end वर संपतो. या open end वर सुरुवातीपासूनचं एकटेपण तेवढं अधोरेखीत होतं. तिचंच नव्हे तर साऱ्यांचच. 'मनुष्याचं.'*

*'समुद्री चहुकडे पाणी' (पिण्याला थेंबही नाही!) या शीर्षकातून सुचवायचं असेल तर ते हेच.*

*वरवर पाहता सारख्या दिसणाऱ्या, वागणाऱ्या, भासणाऱ्या समूहातल्या माणसाचं रेषेरेषेनं बदलणारं आयुष्य आणि उरणारं फक्त त्याचं एकटेपण!*

*इत्यलम्!*

❑

---

## स्वागत

- ❑ **साथ :** सदाशिव गोडे, पृष्ठे ६२
- ❑ **ठुमरी :** उमाकांत ठोमरे, समाधी प्रकाशन, नाशिक, पृष्ठे १३७
- ❑ **चक्रावर्त :** उमाकांत ठोमरे, समाधी प्रकाशन, नाशिक, पृष्ठे १०३
- ❑ **सोनपीस :** प्रतिमा इंगोले, सोनल प्रकाशन, दर्यापूर
- ❑ **एका परिवर्तनवादी तरुणाचे आत्मधन :** वा. सी. कटणे, श्री. विद्या प्रकाशन, पुणे पृष्ठे १००
- ❑ **उसशेती :** संपा. डॉ. खाडे, डॉ. गायकवाड, प्रकाशन ज्ञानदीप मंडळ पाडेगाव, पृष्ठे ३४३
- ❑ **माती पंख आणि आकाश :** ज्ञानेश्वर मुळे, प्रकाशक नवसाहित्य बुक स्टॉल बेळगाव, पृष्ठे २४३
- ❑ **कृष्णा काठच्या कविता :** सुरेश मोहिते, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे ६४
- ❑ **रक्त सेतू :** सुखदेव ढाकणे, मयंक प्रकाशन, नागपूर, पृष्ठे ६०
- ❑ **उदक :** लक्ष्मीकांत देशमुख, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे २११
- ❑ **मराठा तितुका मेळवावा :** डॉ. म. वि. गोखले, प्रतिमा प्रकाशन, पुणे
- ❑ **इच्छामरण :** प्रोव्हिजन कंपनी आणि इतर एकांकिका : डॉ. म. वि. गोखले, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १००
- ❑ **इंद्रायणी काठी कवितेसाठी :** संपादक प्रमोद कालपांडे प्रकाशक-स्वत: लेखक, पृष्ठे १९

**स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे यांची प्रकाशने**

- ❑ **मराठी समीक्षेची वाटचाल :** गो. म. कुलकर्णी, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे १०४
- ❑ **लोकसाहित्य मीमांसा :** डॉ. विश्वनाथ शिंदे, पृष्ठे २४३
- ❑ **ब्रह्मविद्या शास्त्र :** डॉ. अण्णासाहेब अडसोड, पृष्ठे ११८

---



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

पटवर्धन : **'गर्भालय' आणि 'लंघनमूर्ती'** □ आनंद पाटील : **'कागूद' आणि 'सावली'** □ मोहन पाटील : **'लिगाड' आणि 'खांदेपालट'** □ श्री. ना. पेंडसे : **रथचक्र, आकांत, गारंबीची राधा, कामेरू** □ प्रभाकर पेंढारकर : **अरे संसार संसार, रारंग ढांग** □ ग. प्र. प्रधान : **साता उत्तराची कहाणी** □ आशा वगे : **त्रिदल** □ वि. ज. बोरकर : **अनाहत, 'माती' आणि 'आदेउश', नागडा, वंश** □ रा. रं. वोराडे : **पाचोळा** □ बा. सी. मर्ढेकर : **मर्ढेकरांच्या कादंबऱ्या** □ अनंत मनोहर : **अरण्यकांड** □ व्यंकटेश माडगूळकर : **बनगरवाडी** □ शरच्चंद्र मुक्तिबोध : **सरहद्द, क्षिप्रा** □ दि. बा. मोकाशी : **आनंदओवरी** □ आनंद यादव : **गोतावळा** □ पु. शि. रेगे : **मातृका** □ मार्जोरी किनन रॉलिंग्ज : **पाडस** (अनुवाद : राम पटवर्धन) □ मनोहर शहाणे : **धाकटे आकाश, 'लोभ असावा' आणि 'एखाद्याचा मृत्यू', इहयात्रा** □ अंबिका सरकार : **एका श्वासाचं अंतर** □ त्र्यं. वि. सरदेशमुख : **बखर एका राजाची, उच्छाद, डांगोरा एका नगरीचा** □ सानिया : **स्थलांतर, आवर्तन** □ विलास सारंग : **एन्कीच्या राज्यात** □ अरुण हेवळेकर : **आदित्य**
□ मौज वितरण - हेमा लेले : **आत्मनेपदी.**



## कवितासंग्रह

इंदिरा : **मृगजळ, मेंदी, रंगबावरी, शेला, बाहुल्या, चित्कळा** □ विंदा करंदीकर : **अमृतानुभव** □ तुळशीराम काजे : **भ्रमिष्टाचें शोकगीत** □ कांत : **दोनुली, मावळते शब्द** □ नारायण कुळकर्णी कवठेकर : **हे माझ्या गवताच्या पात्या, मागील पानावरून पुढे सुरू...** □ उत्तम कोळगावकर : **जंगलझडी** □ अंजली ठकार : **तुलसीदल** □ वसंत आवाजी डहाके : **योगभ्रष्ट, शुभवर्तमान** □ ना. घ. देशपांडे : **शीळ, खुणगाठी, कंचनीचा महाल, गुंफण** □ द. भा. धामणस्कर : **प्राक्तनाचे संदर्भ** □ म. वा. धोंड : **मऱ्हाटी लावणी** □ पद्मा : **नीहार, श्रावणमेघ** □ वसंत पाटणकर : **विजनांतील कविता** □ मंगेश पाडगावकर : **सलाम, गझल, भटके पक्षी, जिप्सी, छोरी, तुझे गीत गाण्यासाठी, उत्सव, बोलगाणी, नवा दिवस, विदूषक, उदासबोध, मीरा, त्रिवेणी, कबीर** □ अनुराधा पोतदार : **कॅक्टसफ्लॉवर** □ प्रियदर्शन पोतदार : **लाटांच्या आसपास** □ आरती प्रभू :

**दिवेलागण, नक्षत्रांचे देणे** □ अशोक बागवे : **आलम** □ वसंत बापट : **मानसी, प्रवासाच्या कविता, राजसी, रसिया** □ बा. भ. बोरकर : **चित्रवीणा, गितार** □ बा. सी. मर्ढेकर : **मर्ढेकरांची कविता** □ वासंती मुझुमदार : **सनेही** □ शरच्चंद्र मुक्तिबोध : **नवी मळवाट, सत्याची जात** □ शंकर रामाणी : **पालाण, दर्पणीचे दीप** □ पु. शि. रेगे : **अनीह** □ तारा वनारसे : **बारा वाऱ्यांवर घर** □ शरद साटम : **गाज** □ गुरुनाथ सामंत : **गुरुचरित्र** □ विलास सारंग : **कविता : १९६९-१९८४.** □ मौज वितरण - निरंजन उजगरे : **परिच्छेद** □ मु. वा. कांत : **पोरके आभाळ** □ गोविंद कुलकर्णी : **मनाचे डोह, तीन रंगांचे इंद्रधनुष्य** □ ह. शि. खरात : **स्वप्नवास्तव** □ वसंत मा. जाधव : **प्रेक्षक** □ सुनिता जोशी : **आत्मरंग** □ विश्वजित तुळजापूरकर : **मधुरा** □ नितीन तेंडुलकर : **पावसाळा** □ पुंडलिक पाटील : **प्राणांतिक** □ य. द. भावे : **पुष्पगंधा** □ रवींद्र लाखे : **जिव्हार** □ वृंदा लिमये : **काळोखकमळ** □ श्रीधर शनवारे : **आतून बंद बेट** □ र. म. शेजवलकर : **रमंथ** □ राजन साटम : **उजेडाचे तुकडे** □ संपादित : **आठवणीतल्या कविता - भाग-१, भाग-२, भाग-३, भाग-४,** □ **कृष्णदास शामा-विरचित श्रीकृष्ण चरित्रकथा** (संपादक : वि. बा. प्रभुदेसाई) □ **प्राचीन गीतमंजूषा** (संपादक : ना. ग. जोशी) □ कृष्णचंद्र ज्ञाते : **कोमलरिषभ**



## नाटक-नाटिका

माधव आचवल : **डार्करूम** □ महेश एलकुंचवार : **सुलतान, पार्टी, वाडा चिरेबंदी, युगान्त** (वाडा चिरेबंदी, मग्न तळ्याकाठी, युगान्त) □ चिं. त्र्यं. खानोलकर : **सगेसोयरे, आपुले मरण** □ वि. द. घाटे : **बाजी आणि डॅडी** □ वृंदावन दंडवते : **खोटं नाटक** □ पु. ल. देशपांडे : **एक झुंज वाऱ्याशी, ती फुलराणी, तीन पैशाचा तमाशा, तुका म्हणे आता** □ श्री. ना. पेंडसे : **पंडित ! आता तरी शहाणे व्हा !, रथचक्र** □ फेडरिको गार्शिया लॉर्का : **चांगुणा** (अनुवाद : आरती हवालदार) □ तारा वनारसे : **नर्सेस क्वार्टर्स** □ शेक्सपिअर : **तीन अंकी हॅम्लेट** (अनुवाद : नाना जोग), **राजा लिअर** (भाषांतर : विंदा करंदीकर).

□ मौज वितरण - विश्वनाथ खैरे : **वंशाचा व्यास, एकलव्य, युरेका** □ जया दडकर : **काय वाट्टेल ते / कीचकवधाचा तमाशा.**



## ललित लेखन

□ अनिल अवचट : **मोर, आप्त** □ सुभाष अवचट : **जीए : एक पोर्ट्रेट** □ माधव आचवल : **किमया, पत्र** □ श्रीनिवास विनायक कुलकर्णी : **डोह, सोन्याचा पिंपळ, पाण्याचे पंख** □ वि. द. घाटे : **पांढरे केस... हिरवी मने, काही म्हातारे व एक म्हातारी** □ रा. भि. जोशी : **वाटचाल, मजल दरमजल** □ कृ. द. दीक्षित : **सहवास** □ गौरी देशपांडे : **विंचुर्णीचे धडे** □ पु. ल. देशपांडे : **बटाट्याची चाळ, व्यक्ती आणि वल्ली, गणगोत, असा मी असामी, हसवणूक, गुण गाईन आवडी, मैत्र, मराठी वाङ्मयाचा (गाळीव) इतिहास, अघळपघळ** □ यशवंत पाठक : **ब्रह्मगिरीची सावली** □ श्री. दा. पानवलकर : **संजारी** □ दुर्गा भागवत : **व्यासपर्व, पैस, दुपानी** □ अनंत भालेराव : **मांदियाळी** □ सुरेश मथुरे : **चंद्रकांत राजाची कन्या** □ वासंती मुझुमदार : **नदीकाठी** □ मं. वि. राजाध्यक्ष : **खर्डेघाशी, शालजोडी** □ फिरोझ रानडे : **बारा जुलै ते अकरा जुलै** □ पु. ल. देशपांडे, मं. वि. राजाध्यक्ष, रा. वा. अलुरकर : **पुरुषराज अळूरपांडे**



## चरित्र-आत्मचरित्र-आठवणी

अनिल अवचट : **स्वत:विषयी** □ प्रभाकर ऊर्ध्वरेषे : **हरवलेले दिवस** □ एक मित्र : **श्री. ना. पेंडसे : लेखक आणि माणूस** □ सुमा करंदीकर : **रास** □ द. न. गोखले : **डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन, स्वातंत्र्यवीर सावरकर : एक रहस्य, गांधीजी : मानव नि महामानव** □ रवीन्द्रनाथ ठाकूर : **पोरवय** (भाषांतर : पु. ल. देशपांडे) □ रा. भि. जोशी : **साठवणी** □ ना. व्यं. देशपांडे : **सरकार ते सरकार** □ सुनीता देशपांडे : **आहे मनोहर तरी..** □ गोदावरी परूळेकर : **जेव्हा माणूस जागा होतो** □ कमल पाध्ये : **बंध-अनुबंध** □ रागिणी पुंडलिक : **साथ संगत** □ भालजी पेंढारकर : **साधा माणूस** □ य. दि. फडके : **आगरकर** □ न. र. फाटक : **नाट्याचार्य**



'मौज'ची ही पुस्तके तुमच्या नेहमीच्या ग्रंथ विक्रेत्याकडे मागा अथवा मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगाव, मुंबई-४००००४ येथून मागवा.

कृ. प्र. खाडिलकर □ पद्मजा फाटक : **शिक्षणतज्ज्ञ ताराबाई मोडक** □ विद्या बाळ : **कमलाकी.** □ मौज वितरण : द्वा. भ. कर्णिक : **चैतन्ययुग** □ अनुताई वाघ : **कोसबाडच्या टेकडीवरून** □ संपादित : **विष्णुपंत भागवत** □ सुलोचना सोमण : **अनुभव.**



## समीक्षा

गो. वि. करंदीकर : **ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र** □ ना. गो. कालेलकर : **भाषा आणि संस्कृती, भाषा : इतिहास आणि भूगोल, ध्वनिविचार** □ द. न. गोखले : **एका चरित्राचे चरित्र** □ सु. रा. चुनेकर : **माधवराव पाटवर्धन : वाङ्मयदर्शन** □ कुसुमावती देशपांडे : **पासंग** □ धों. वि. देशपांडे : **जीएंच्या कथा : एक अन्वयार्थ** □ म. वा. धोंड : **चंद्र चवथिचा, ज्ञानेश्वरीतील लौकिक सृष्टी** □ रा. भा. पाटणकर : **कांटची सौंदर्यमीमांसा, कमल देसाई यांचे कथाविश्व, मुक्तिबोधांचे साहित्य, कथाकार शांताराम** □ प्रभाकर पाध्ये : **मर्ढेकरांची सौंदर्यमीमांसा** □ प्रभाकर वरवे : **कोरा कॅनव्हास** □ वसंत बापट : **तौलनिक साहित्याभ्यास** □ बा.सी. मर्ढेकर : **सौंदर्य आणि साहित्य, कला आणि मानव** (भाषांतर : रा. भि. जोशी) □ विजया राजाध्यक्ष : **मर्ढेकरांची कविता : स्वरूप आणि संदर्भ** (खंड पहिला), **मर्ढेकरांची कविता : स्वरूप आणि संदर्भ** (खंड दुसरा) □ संपादित : **प्रभाकर पाध्ये : वाङ्मयदर्शन** □ **साहित्य : अध्यापन आणि प्रकार** □ त्र्यं. वि. सरदेशमुख : **शारदीय चंद्रकळा.**

□ मौज वितरण - मा. ना. आचार्य : **अनुषंग** □ अचला जोशी : **हरी नारायण आपटे यांच्या कादंबऱ्या** □ प्रभाकर पाध्ये : **वामन मल्हार आणि विचारसौंदर्य** □ श्रीपाद महादेव वर्दे : **मराठी कवितेचा उषःकाल किंवा मराठी शाहीर** □ सुनील सुभेदार : **नाट्यदर्शन** □ संकलित : **सौंदर्यविचार**



## संगीत-नाटक-चित्रपट

कृ. द. दीक्षित : **अतरसुगंध** □ वा. ह. देशपांडे : **घरंदाज गायकी** (संगीतसमीक्षा) □ श्री. दा. पानवलकर : **शूटिंग** □ केशवराव भोळे : **अस्ताई, माझे संगीत, अंतरा**

□ माधव मोहोळकर **गीतयात्री** □ स्वामी धर्मव्रत : **मला उमजलेले अल्लादियाखां.** (संगीतसमीक्षा)

मौज वितरण □ सदानंद कनवळ्ळि : **मल्लिकार्जुन मन्सूर** (अनुवाद : प्रभाकर देशपांडे) □ कुमारगंधर्व : **अनूपरागविलास भाग १, अनूपरागविलास भाग २,** (बंदिशींचा संग्रह) □ संपादित : **रङ्गनायक** (अरविंद देशपांडे स्मृतिग्रंथ), **तें. आणि आम्ही.** (तेंडुलकरी नाटक आणि नाटकवाले)



## बालवाङ्मय

□ विजय तेंडुलकर : **पाटलाच्या पोरीचं लगीन, चिमणा बांधतो बंगला, चांभार चौकशीचे नाटक, चांदोमामा, आता खेळा नाचा, वेडं कोकरू, सुट्टी एके सुट्टी, झुले बाई झुला** □ सई परांजपे : **शेपटीचा शाप, झाली काय गंमत !, जादूचा शंख, भटक्याचे भविष्य, सळो की पळो, हरवलेल्या खेळण्यांचे राज्य** □ आरती प्रभू : **गोपाळगाणी** □ वृंदा लिमये : **जंतरमंतर, लॉलिपॉप, कमाल आणि धमाल** □ शांता ज. शेळके : **टिप टिप चांदणी.**

□ मौज वितरण - सुरेश मथुरे : **गाणारे पत्ते** □ वृंदा लिमये : **टिवल्या बावल्या**



## विविध

अनिल अवचट : **माणसं !** (समाजचित्रे) □ गो. वि. करंदीकर : **उद्‌गार** □ गोविंद तळवलकर : **सत्तांतर : १९४७ (खंड १)** (आधुनिक राजकीय इतिहास), **सत्तांतर : (१९४७ (खंड २)** (आधुनिक राजकीय इतिहास) **सत्तांतर : १९४७ (खंड ३)** (आधुनिक राजकीय इतिहास), □ पु. ल. देशपांडे : **चित्रमय स्वगत** (सचित्र आत्मनिवेदन), **चार शब्द, दाद** □ वसंत देशपांडे : **म्हैसाळ : दलितमुक्तीचा एक प्रयोग, हमाल पंचायत** □ वसंत सरवटे : **खडा मारायचा झाला तरं...!** (हास्यचित्रे), **सावधान ! पुढे वळण आहे !** (हास्यचित्रे) □ गीता साने : **भारतीय स्त्रीजीवन** □ संपादित : **जीएंची निवडक पत्रे : खंड १ व २**

□ मौज वितरण - शांता किर्लोस्कर : **गोष्ट पासष्टीची** □ काशिनाथ वासुदेव केंकरे : **गोमंतकीय लेखकांच्या मराठी ग्रंथांची सूची** □ व. ह. गोळे : **महाराष्ट्रातील**



'मौज'ची ही पुस्तके तुमच्या नेहमीच्या ग्रंथ विक्रेत्याकडे मागा अथवा मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगाव, मुंबई-४००००४ येथून मागवा.

# काव्यानंद



नरेंद्र बोडके



कवितासंग्रह छापून, प्रकाशित करण्याची एक अनावर आसक्ती अलीकडे कविता लिहिणाऱ्यांमध्ये जाणवते. स्वत:च्या आत्मिक विकासाची एक निश्चित पातळी गाठल्याशिवाय आणि कवितालेखनाच्या साधनेचे किमान एक आवर्तन पूर्ण झाल्याशिवाय कवितासंग्रह प्रकाशित करणे म्हणजे चार-पाच महिन्यांचा गर्भाला जबरदस्तीने जन्माला घालण्यासारखे आहे. हे कवींना निदान त्यांच्या प्रस्तावनकारांनी तरी वडीलकीच्या नात्याने सांगायला हवे. पण तसे होत नाही. त्यामुळे अनेक संग्रह निघतात. त्यात काही पूर्ण कच्चे ,काही अर्धेकच्चे, काही अधुरपिके, काही पक्क वाटणारे असे संग्रह भेटतात. काहींमध्ये कच्च्या-पक्क्यांचे मिश्रण असते. अशा बऱ्याच संग्रहांतून दर्जाबावत दिलासा देणारे हे काही संग्रह निवडलेले आहेत.

### हे दान त्या क्षणांचे

राम कदम हे उतारवयात अकस्मात कवितेच्या ज्वानीचा अनुग्रह लाभलेले कवी. त्यांचा हा संग्रह वाचताना त्यातील छांदस रचनांचे वैविध्य सहज लक्षात येते. क्वचित कुठे परिष्करणाची गरज जाणवते (सोन्याचा पिंपळ अजून जागा दारी/टाकली पुसून पानावरची अवतरणे : यात 'पानावरची' मधला 'ची' छंदभंग करणारा आहे. मात्र या कवीकडे कवितेचा एक नितळ झरा आहे हे नि:शंक. या कविता वाचताना काही पूर्वसूरींची आठवण होत असली तरी या कवीची स्वत:ची एक मूस आहे याचीही नोंद घ्यावी लागतेच. निसर्गाशी एकरूप होताना कवी काहीटवटवीत ओळी लिहून जातो.

'आले मोड भिजाण्याला
आत कोवळं उधाण
केणराच्या तुऱ्यासाठी
माझं अंगण गहाण'

निसर्गानुभव आणि प्रेमानुभवात मीलनाच्या औत्सुक्याचा अनुभव कवी विशेष ताकदीने व्यक्त करतो.

(ओंजळीतली रात उपाशी/शहारते सरसरा/लाज जरी सैलसर/उकळ फुटे विल्वरा)

यातल्या 'विविधा' मधील कणिका 'चारोळी' वाल्यांनी मनन करण्याजोग्या आहेत. या संग्रहातली 'तिरडीवरची वलयवर्तुळे' ही कविता विचारांची अनेक वर्तुळे निर्माण करणारी आहे. 'तिरडीवरचा गंध वेचतो वलयाची वर्तुळे' या



अनुक्रमणिका






ओळी मनात रेंगाळत राहतात. छंदावर स्वत:ची मुद्रा उमटवणे कठीण असते. कवी कदम यांना हे साध्य होत चालले आहे. कविवर्य पुरुषोत्तम पाटील यांची प्रस्तावना नीरक्षीर विवेक सांभाळणारी आहे.

**हे दान त्या क्षणांचे**
राम कदम
शारदा प्रकाशन, ठाणे
पृष्ठे : ७२, मूल्य : ४० रुपये

**चिंताक्रांत मुलुखाचे रूदन**

व्यवस्था आणि तिच्याविरुद्धचे बंड या गोष्टींचा काव्यानुभव म्हणून स्वीकार विद्रोही कवितेमुळे झाला. मानवी मूल्यांचा उद्‌घोष या कवितेने केला. अर्थात दलित चळवळ स्थिरावली आणि तिच्यातही एक व्यवस्था निर्माण झाली. या व्यवस्थेचा दंभस्फोट महेंद्र भवरे हा तरुण कवी आपल्या कवितेतून करतो. 'जननिष्ठ विचारधारेच्या पार्श्वभूमीवर वर्तमान संदर्भाचे सूक्ष्म अवलोकन या कवितेत आढळते असे निरीक्षण औरंगाबादच्या मिलिंद महाविद्यालयाचे मराठी विभागप्रमुख प्रा. अविनाश डोळस यांनी नोंदविले आहे. हे वर्तमान संदर्भ कुठले याचाही उलगडा कवी भवरे यांच्या मनोगतातून होतो. 'दलित साहित्य आणि चळवळीला इथल्या मूलतत्त्ववाद्यांनी इमानेइतबारे भोके पाडली. आमचे बुद्धिजीवी त्यांच्या गळाला लागले. प्रस्थापित दलित नेत्यांनी एक पिढी दारूच्या दुकानात बुडविली आणि प्रस्थापित दलित साहित्यिकांनी नवी पिढी वाऱ्यावर सोडली' या वस्तुस्थितीकडे कवी म्हणूनच आत्मपरीक्षण आणि स्व-टिका करतो. 'माझ्या देशांचे भव्य कोलाज' या कवितेत कवी म्हणतो :

'नकार घंटेचे अनंत आकार
कोणत्याच वाटेला नाही होकार'

अस्वस्थ करणारा वर्तमान हाच या कवितेच्या केंद्रस्थानी आहे. खडबडून जाग आणणारी ही कविता त्यामुळेच महत्त्वाची ठरते.

**चिंताक्रांत मुलुखाचे रूदन**
महेंद्र भवरे,
अस्तित्त्व प्रकाशन,
औरंगाबाद
पृष्ठे : ७३, मूल्य : ४५ रुपये.

**सल**

बालपण हरवलेला, विविध आघातांनी दबलेल्या आणि मुंबईत गिरणी कामगार म्हणून काम करणाऱ्या अप्पा दळवी यांनी कवितेचा आधार घेऊन आपली जगण्याची उभारी टिकवून ठेवली आहे. अशा वेळी कवी आणि कवितेचे नाते केवळ रचनाबंध आणि रचनाकार अशा स्वरूपाचे राहात नाही. प्रत्यक्ष जीवनाचा एक चिवट धागा कवीला कवितेशी जखडूच टाकतो. अर्थात हे बंधन आनंददायक असते. जगण्याची उमेद टिकवून ठेवणारे असते. दैनंदिन जीवनातील तडजोडी, माणसांच्या लांड्यालबाड्या, निर्ढावलेपण, झुंडशाही, स्वप्ने उद्‌ध्वस्त होणे या सगळ्या सलांची टोचणी कवीला लागते. हे सल कवितेतून व्यक्त करून तो मोकळा होतो. हे सल दूर करण्यासाठी आपण स्वत:ही फारसे काही करत नाही याचे भान त्याला आहे.

'पाहुनी का धावलो ना आसवांचा कत्तली
पाय मातीचेच माझे हे सलाया लागले...'

अशा शब्दांतून हे भान व्यक्त झाले आहे. गझलेत हा कवी गळा मोकळा करतो असे जाणवते. प्रस्तावनेत प्रा. केशव मेश्राम यांनी .

निर्देशित केलेल्या अनुकरणशीलतेच्या धोक्याकडे कवीने लक्ष देणे आवश्यक आहे.

**सल**

अप्पा दळवी

मंजुल प्रकाशन, पुणे

पृष्ठे ९० : मूल्य २७ रुपये

**निरुक्त**

नीलांबरी कुलकर्णी यांच्या 'निरुक्त' या संग्रहात एक भळभळती जखम जाणवते. या जखमेची जाणीव देणाऱ्या अनेक कविता या संग्रहात ठिकठिकाणी भेटतात.

'आपलीही भेट
त्या क्षितिजासारखीच
केवळ भास बनून राहिलेली
तुला किनाऱ्यांची बंधनं
मला बंधनांचे किनारे'

अशा ओळींमधून मनाचा तळ ढवळणाऱ्या दु:खाचे पापुद्रे विलगतात. व्यक्तित्त्व विरघळून टाकणाऱ्या अद्वैताचा अनुभव आल्यानंतर वास्तवात द्वैतासकट जगावं लागणं हा अत्यंत क्लेशदायक अनुभव असतो. या दु:खानुभवाचे अनेक कंगोरे 'आत्ममविरूपणपर उक्ती' मधून व्यक्त होतात. 'तुझ्या नसण्यानं... सूर्य नुसता एक तेजाचा गोळा आणि चंद्र केवळ एक परप्रकाशी ग्रह' अशा शब्दात एक भर्जरी नातं व्यक्त होतं. 'मनभर सावळे ढग', 'बदललेल्या वारांचे अंश', 'मौनाचा अविर्भाव', 'पावलांचे ठसे पुसणारा धर्म', 'असंख्य श्वासांचं अंतर', 'आभाळाचे पोरके डोळे', अशा अनेक शब्दातून एक 'अश्वत्थामी' जीवंतकहाणी खुणावू लागते. भावविवशता टाळण्यात यशस्वी होते तेव्हा ही कविता खोल आत डंख करून जाते.

निरुक्त/नीलांबरी कुलकर्णी

महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर

पृष्ठे ७२, मूल्य ५० रुपये

**उमलताना**

कु. अदिती कर्णिक या बालकवयित्रीचा 'उमलताना' हा पहिलावहिला संग्रह. केवळ चौदा वर्षांच्या अदितीनं बालसुलभ विषयांपासून चिंतनाच्या पातळीवर जाणारे अनेक विषय हाताळून निरंजन उजगरेंसारख्या उत्तम कवीचं प्रस्तावनापर कौतुकही प्राप्त केलं आहे. देश, शाळा, परीक्षा, बहिण-भाऊ, फोन यासारखे विषय अदितीनं हाताळले आहेत. तसेच माणुसकी, सागर, पाऊस, शब्द, गांधीजी असे गंभीर विषयही तिला वर्ज्य नाहीत. पारदर्शकता आणि निरागसपणा आज तिच्या कवितांमध्ये आहे. वाढत्या वयानिशी येणाऱ्या प्रगल्भतेतून निर्माण होणाऱ्या तिच्या 'उमललेल्या' कवितांची प्रतीक्षा करणे क्रमप्राप्त आहे.

उमलताना

कु. अदिती कर्णिक

प्रकाशिका : सौ. शर्मिला कर्णिक, बदलापूर

पृष्ठे ५६, मूल्य ३५ रुपये

---

## स्वागत

- **आकाशदिवे :** मधु जामकर, पृष्ठे १४९
- **महाराष्ट्रातील राजकारणाचे साहित्यातील प्रतिबिंब** : संपादक विलास खोले, पृष्ठे ९६
- **द्वादशी :** राम शेवाळकर, प्रतिमा प्रकाशन पुणे, पृष्ठे १४०










# कार्यवृत्त

(१ जुलै १९९८ ते ३० सप्टेंबर १९९८)



राजा फडणीस (प्रमुख कार्यवाह)



**६ जुलै, १९९८**

कै. र. वा. दिघे स्मृतिदिनानिमित्त, सोमवार दिनांक ६ जुलै रोजी डॉ. सुधाकर के. भोसले यांचे र. वा. दिघे यांची 'कार्तिकी' कादंबरी या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

**१४ जुलै, १९९८**

कै. प्रा. बाबुराव शिरोळे व कै. शांतादेवी शिरोळे पारितोषिक

दरवर्षीप्रमाणे ज्येष्ठ बाल वाङ्मय लेखकास देण्यात येणारे रु. २५००/- चे कै. बाबुराव शिरोळे पारितोषिक यंदाचे वर्षी ज्येष्ठ लेखक श्री. राजा मंगळवेढेकर यांना देण्यात आले.

त्याचप्रमाणे लेखिकेला देण्यात येणारे रु. २०००/- चे कै. शांतादेवी शिरोळे पारितोषिक यंदाचे वर्षी सुप्रसिद्ध लेखिका प्रा. सौ. प्रतिमा इंगोले यांना देण्यात आले.

ही दोन्ही पारितोषिके सुप्रसिद्ध विचारवंत प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या हस्ते दि. १४।७।९८ रोजी समारंभपूर्वक देण्यात आली.

**२० जुलै, १९९८**

कै. प्रा. वा. म. जोशी यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. मंदा खांडगे यांचे 'मराठीतील स्त्री कविता' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

**२२ जुलै, १९९८**

दरवर्षी ग्रामीण साहित्याला देण्यात येणारा कै. ग. ल. ठोकळ रु. २१००/- चा पुरस्कार यंदाचे वर्षी श्री. लक्ष्मीकांत देशमुख यांच्या 'उदक' या कथासंग्रहाला, सुप्रसिद्ध ग्रामीण लेखक व परिषदेचे उपाध्यक्ष डॉ. आनंद यादव यांच्या हस्ते २२ जुलै १९९८ रोजी समारंभपूर्वक देण्यात आला. पारितोषिकाची निवड डॉ. मंदा खांडगे व प्रा. मनोहर जाधव यांनी केली.

**२८ जुलै, १९९८**

दरवर्षी एका अनुवादित पुस्तकाला कै. स. ह. मोडक पुरस्कार देण्यात येतो. १९९७ सालासाठी श्री. अनिल रघुनाथ कुलकर्णी यांची 'सिटी ऑफ जॉय' या पुस्तकाच्या केलेल्या अनुवादाला हा पुरस्कार २८ जुलै १९९८ रोजी प्राचार्य के. रं. शिरवाडकर यांच्या हस्ते समारंभपूर्वक देण्यात आला. या पारितोषिकाची निवड करण्यासाठी प्रा. डॉ. शिरीष चिंधडे व प्रा. प्र. ना. परांजपे या परीक्षकांनी काम पाहिले.

**३१ जुलै, १९९८**

संत सावतामाळी महाराज यांच्या पुण्यतिथीनिमित्त, श्री. ह. भ. प. किसनमहाराज साखरे यांचे ज्ञानेश्वरीतील 'नवरस दर्शन' या विषयावर ३१ जुलै, १९९८ ला प्रवचन आयोजित करण्यात आले होते.

**१ ऑगस्ट, १९९८**

महाराष्ट्र साहित्य परिषद व दलित साहित्य परिषद यांचा संयुक्त विद्यमाने लोकशाहीर अण्णाभाऊ साठे यांच्या जन्मदिनानिमित्त पुणे विद्यापीठातील प्रा. मनोहर जाधव यांचे 'दलित स्त्रियांची आत्मकथने' या विषयावर महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सभागृहात दि. १ ऑगस्ट १९९८ रोजी व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

**१० ऑगस्ट, १९९८**

दरवर्षी देण्यात येणारे रु. २०००/- कै. शंकर पाटील पारितोषिक यंदाचे वर्षी श्री. राजन गवस यांच्या 'कळप' या कादंबरीस देण्यात आले. परीक्षक म्हणून डॉ. नागनाथ कोतापल्ले व डॉ. अंजली सोमण यांनी काम पाहिले. हे पारितोषिक डॉ. अरविंद वामन कुलकर्णी यांच्या हस्ते, १० ऑगस्ट १९९८ रोजी समारंभपूर्वक देण्यात आले.

**दि. १८ ऑगस्ट, १९९८**

आचार्य अत्रे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त, डॉ. प्र. ल. गावडे यांच्या अध्यक्षतेखाली भावे शाळेच्या प्राथमिक विभागाच्या विद्यार्थ्यांनी 'अष्टपैलू अत्रे' हा कार्यक्रम सादर केला. या कार्यक्रमाचे मार्गदर्शन सौ. रोहिणी सोमण यांनी केले. हा कार्यक्रम १८।८।९८ रोजी मसापरिषदेच्या सभागृहात सादर करण्यात आला.

**२८ ऑगस्ट, १९९८**

कै. पु. भा. भावे यांच्या स्मृतिदिनानिमित्त 'पु. भा. भावे एक विलक्षण व्यक्तिमत्त्व' या विषयावर श्री. चित्तरंजन कोल्हटकर यांचे व्याख्यान झाले.

**१२ सप्टेंबर , १९९८**

दरवर्षीप्रमाणे यंदाही कै. बालकवी यांच्या स्मृत्यर्थ 'निसर्गप्रेम' या विषयावर आधारित कविसंमेलन दि. १२।९।९८ रोजी आयोजित करण्यात आले. या कविसंमेलनाचे सूत्रसंचालन श्री. अरविंद भुजबळ यांनी केले. या कविसंमेलनात सौ. आश्लेषा महाजन, विमल लिमये, शोभा शेट्टीवार, जयंत भिडे, शीला निपुणगे, संजीवनी तोफखाने, मीनल बाठे, मिरदेव गायकवाड, तुकाराम पाटील, प्रियदर्शन पोतदार, संजीवनी बोकील, प्रभा सोनावणे, राजेंद्र भोसले या कवींनी भाग घेतला होता.



अनुक्रमणिका

## शाखावृत्त

### सासवड शाखा

दि. १२ ऑगस्ट १९९८ ला सासवड येथे आचार्य अत्रे प्रतिष्ठान आणि महाराष्ट्र साहित्य परिषद, सासवड शाखा यांच्या विद्यमाने ९ वे विभागीय साहित्य संमेलन संपन्न झाले. संमेलनाच्या अध्यक्षपदी ज्येष्ठ विचारवंत प्रा. ग. प्र. प्रधान होते. संमेलनाचे उद्‌घाटन प्राचार्य शिवाजीराव भोसले यांच्या हस्ते झाले. स्वागताध्यक्ष श्री. विजय कोलते यांनी संमेलन आयोजित करण्यामागील भूमिका सांगितली. 'आत्रेय' या स्मरणिकेचे प्रकाशन झाले. साहित्य क्षेत्रातील अनेक नामवंत आणि सासवडमधील नागरिक या समारंभाला उपस्थित होते.

रात्री ९ वाजता निमंत्रितांचे कविसंमेलन झाले. कविवर्य वसंत बापट अध्यक्षस्थानी होते. श्री. रामदास फुटाणे यांनी सूत्रसंचालन केले.

दि. १३ ऑगस्ट रोजी आचार्य अत्रे यांचे जन्मशताब्दीचे दिवशी सकाळी कै. आचार्य अत्रे यांच्या पुतळ्याला पुष्पहार अर्पण करण्यात आला. यानंतरचा 'अष्टपैलू अत्रे' हा परिसंवाद डॉ. आनंद यादव यांचे अध्यक्षतेखाली झाला. यात प्रा. शरद वाघ, श्री. राम गवाले, डॉ. अ. वा. कुलकर्णी, डॉ. न. म. जोशी, डॉ. द. ता. भोसले, डॉ. गं. ना. जोगळेकर व पत्रकार चंद्रकांत पुरंदरे यांनी भाग घेतला. दुपारी स्थानिक लेखकांच्या मेळाव्यात सुमारे चाळीस जणांनी भाग घेतला. डॉ. रामचंद्र देखणे यांनी संयोजित केलेल्या 'लोककला दर्शन' या कार्यक्रमाला प्रचंड प्रतिसाद मिळाला. अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार यांच्या खुमासदार भाषणाने या विभागीय साहित्य संमेलनाचा समारोप झाला. दि. १३ ऑगस्ट रोजी राज्याचे सांस्कृतिक मंत्री ना. प्रमोद नवलकर यांनी संमेलनस्थळी भेट देऊन आचार्य अत्रे यांच्या अर्धपुतळ्याला अभिवादन केले. संमेलन यशस्वी करण्यासाठी मसाप सासवड शाखा, सासवड नगरपालिका व नागरिकांनी खूपच परिश्रम घेतले. मसाप सासवड शाखेचे अध्यक्ष रावसाहेब पवार यांनी आभार मानले.

### सोलापूर शाखा

दि. २७/८/९८ ला 'मी पाहिलेला रशिया' या विषयावर प्रा. श्रीराम पुजारी यांचे व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी डॉ. निर्मलकुमार फडकुले, शाखाध्यक्ष हे होते. प्रास्ताविक, कार्याध्यक्ष प्रा. मीर इसहाक यांनी केले. कार्यवाह श्री. पद्‌माकर कुलकर्णी यांनी आभार मानले. सूत्रसंचालन श्री. व्यंकटेश कामतीकर यांनी केले.

सोलापूर शाखेच्या त्रैवार्षिक निवडणुका दि. १९ जुलै, १९९८ रोजी झाल्या. सर्व पदाधिकारी आणि कार्यकारिणीची बिनविरोध निवड झाली.

### वाई शाखा

वाई शाखेची वार्षिक सर्वसाधारण सभा दि. २७/७/९८ ला घेण्यात आली होती. पदाधिकाऱ्यांची निवड या सभेत झाली. शाखेच्या अध्यक्षपदी प्रा. गो. ह. जोशी यांची निवड झाली. वाई शाखेने आठ नवीन आजीव सभासदांची नोंद केली. आणखी काही नवीन सभासद करून घेण्याचा प्रयत्न चालू आहे, असे कोषाध्यक्ष अशोक भट यांनी कळविले आहे.

**सोनई शाखा** (जिल्हा अहमदनगर)

दिं. १-ऑगस्ट १९९८ रोजी म. सा. प. सोनई शाखेची मासिक वैठक कार्याध्यक्ष विनायकराव आंबरे पाटील यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाली.

श्री. दीपक बनकर व प्रा. महावीरसिंग चव्हाण यांच्या कवितांचे वाचन व रसग्रहण झाले. श्री. नामदेवराव देसाई यांनी प्रास्ताविक केले. काव्य रसग्रहणात प्रा. डॉ. भाऊसाहेब गवळी, श्री. विजय नांगरे, प्रा. व्ही. बी. सपकाळ इत्यादींनी भाग घेतला.

**बारामती शाखा**

शाखेची वार्षिक सर्वसाधारण सभा ५।७।९८ रोजी संपन्न झाली. या सभेत पुढील तीन वर्षांसाठी कार्यकारी मंडळ निवडण्यात आले. शाखेच्या अध्यक्षपदी डॉ. अप्पासाहेब पवार यांची निवड झाली.

दि. १९ जुलै ९८ रोजी प्रा. डॉ. कृ. मं. सुर्वे यांचे कबिराचे साहित्यविश्व या विषयावर व्याख्यान झाले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी श्री. अनंत सुमंत होते.

दि. २६ जुलै ९८ रोजी प्रा. सीताराम गोसावी यांचे 'मराठी साहित्यातील आधुनिक प्रवाह' या विषयावर व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी पद्मश्री डॉ. अप्पासाहेब पवार होते.

**श्रीरामपूर (जि. अहमदनगर) शाखा**

दि. १४ जुलै ९८ रोजी शाखेची वार्षिक सर्वसाधारण सभा झाली. त्यामध्ये कार्यकारिणी सदस्य व पदाधिकाऱ्यांची निवड करण्यात आली. शाखेच्या अध्यक्षपदी ॲडव्होकेट रावसाहेब शिंदे यांची निवड झाली. □





अनुक्रमणिका

## ९ व्या विभागीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष
## प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या अध्यक्षीय भाषणाचा सारांश...

मित्रहो,

विभागीय साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद देऊन आपण माझा जो गौरव केला त्यावद्दल मी आपले मन:पूर्वक आभार मानतो. आचार्य अत्रे यांच्या जन्मशताब्दी वर्षात कऱ्हेच्या काठी भरणाऱ्या साहित्य संमेलनाचा अध्यक्ष होणे हा माझ्या जीवनातील परम भाग्याचा प्रसंग आहे.

साहित्य संमेलन हा आनंद सोहळा आहे, कारण आनंद हीच साहित्याची एक महत्त्वाची प्रेरणा आहे. मात्र या आनंदाचे स्वरूप जीवनात आपल्या शारीरिक गरजा तृप्त झाल्या म्हणजे होणाऱ्या आनंदापेक्षा वेगळे आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. साहित्य वाचताना आपण आपल्या संकुचित वैयक्तिक जीवनाची कुंपणे ओलांडतो, इतरांच्या सुखदु:खाशी एकरूप होण्यातील आनंद आपण अनुभवतो. नेहमीच्या व्यवहारी जगापेक्षा वेगळे विशाल जीवन साहित्यातून आपल्याला दिसते. ललित साहित्यामुळे जीवनातील सौंदर्याचा प्रत्यय येऊन होणारा आनंद आणि वैचारिक साहित्यामुळे मनात अनेक तऱ्हेचा क्षोभ निर्माण होऊनही होणारा बौद्धिक आनंद यांच्यामुळे जीवनाचा खरा अर्थ आपल्याला उमगतो, आपल्या अनुभवाच्या कक्षा विशाल होतात आणि या सर्वांमुळे एक उदात्त आनंद आपल्याला लाभतो. वाचकांना असा श्रेष्ठ आनंद देणाऱ्या सरस्वतीच्या दरबारातील थोर मानकऱ्यांना अभिवादन करणे हे साहित्य संमेलनाचे एक उद्दिष्ट असते. आपणा सर्वांसमेवत मी मराठीतील ज्ञानेश्वर-तुकारामांच्या पासून आजपर्यंतच्या सर्व थोर साहित्यिकांना अभिवादन करतो. ज्यांच्या जन्मशताव्दीचा सांगता समारंभ उद्या होणार आहे त्या आचार्य अत्रे यांना मी नम्रतापूर्वक आदरांजली वाहतो.

आज मराठी साहित्यापुढे नवी आव्हाने उभी ठाकली आहेत, कारण समाज जीवनात प्रचंड उलथापालथी होत आहेत. एकीकडे राजकीय स्वातंत्र्य उपभोगीत असताना जगात आज वैश्विकीकरणाच्या नावाखाली जो नवा आर्थिक साम्राज्यवाद आला आहे त्याच्यामुळे आपण आर्थिक गुलामगिरीच्या सापळ्यात अडकण्याची भीती निर्माण झाली आहे. दुसरीकडे अत्याधुनिक तंत्रविज्ञानामुळे आपल्यासारख्या प्रचंड लोकसंख्या असलेल्या देशातील तरुणपिढी वेकारीच्या खाईत फेकली जात आहे. याच वेळी प्रसार माध्यमांमुळे आणि विशेषत: दूरदर्शनमुळे आपल्या जीवनाचे स्वरूप अमुलाग्र पालटून ते वाजारी वनण्याचा धोका निर्माण झाला आहे. या उलथापालथीमुळे असाहय्य, आगतिक झालेल्या सामान्य माणसाला आजचे वैचारिक साहित्य नवा आधार देणार का, आणि आजचे ललित साहित्य आजच्या निराशाजनक स्थितीतही चालू असलेल्या विविध संघर्षांचे वास्तवदर्शन घडवून वाचकांच्या मनात नव्या आशांचे अंकूर निर्माण करणार का, हे आजच्या साहित्यापुढील आव्हान आहे. या आव्हानाला सामोरे जाताना आपल्याला संतांच्या मानवतावादाचा आणि फुले, आगरकर, आंवेडकर आणि महर्षी शिंदे यांच्या विचारधनाचा वारसा पुढे चालविला पाहिजे. साने गुरुजींच्या साहित्यात प्रगट झालेली अंत:करणाची विशालता, आचार्य अत्रे यांच्या शैलीतील आवेश, कुसुमाग्रजांच्या कवितांची अग्निफुले, नारायण सुर्वे यांच्या काव्यातील चळवळींच्या विद्यापीठामध्ये घडलेल्या श्रमिकांची हिंमत आणि दलित साहित्यातील विद्रोहाची गर्जना - या विविध प्रवाहांतून २१ व्या शतकातील युगाचे

मराठी साहित्य निर्माण झाले पाहिजे. यासाठी ललित साहित्यात प्रचारकी अभिनिवेश यावा असे मला मुळीच सुचवावयाचे नाही. परंतु साहित्य लिहिताना लेखकांनी वास्तवाचे भान राखावे, समाजातील उपेक्षित आणि पददलित समाजांबद्दल त्यांच्या मनात आपुलकी असावी, समतेच्या विचारांच्या आधारे चाललेल्या परिवर्तनाच्या लढ्यातील कार्यकर्त्यांच्या मनाच्या ऊर्मीचे स्वरूप या लेखकांनी समजून घ्यावे, ही मात्र माझी अपेक्षा आहे.

स्वातंत्र्यपूर्व काळात आणि स्वातंत्र्यानंतरच्या पंचवीस वर्षांत झालेल्या राजकीय आणि सामाजिक चळवळीत येथील मध्यमवर्ग आघाडीवर होता. परंतु गेल्या पंचवीस वर्षांत येथील शहरांतील मध्यमवर्ग आणि ग्रामीण भागात राहात असूनही मनाने शहरात वावरणारा शिक्षित वर्ग कमालीचा आत्मकेंद्रित बनला आहे. गरिबांशी, श्रमिकांशी असलेले पूर्वीचे नाते तोडून हा मध्यमवर्ग येथील धनिकांच्या, प्रस्थापितांच्या शोषणकर्त्या आणि चंगळवादी आघाडीत सामील झाला आहे. त्यांची मुले इंग्रजी माध्यमाच्या भोवऱ्यात सापडली आहेत. हा वर्ग नव्या युगाला आवश्यक असलेले पुरोगामी विचार मांडू शकणार नाही. समाजाच्या अभिरूचीवर संस्कार करून परिवर्तनवादी चळवळींशी वाचकांचे नाते जोडणे हे काम भाऊसाहेब खांडेकर, कुसुमाग्रज यांची परंपरा चालविणाऱ्या ध्येयवादी लेखकांनाच करावे लागेल. आजच्या जीवनातील संघर्षांचे स्वरूप फार भीषण आहे. अनेक अनिष्ट प्रवृत्ती बोकाळल्या आहेत. अशा वेळी विस्थापितांना न्याय मिळावा, कष्टकरी माणसांच्या जीवनातील लाचारी नष्ट व्हावी, कष्टकरी स्त्रियांना घरात आणि समाजात स्वाभिमानाने जगता यावे यासाठी जे लढे आज चालू आहेत, त्यांच्यामधून प्रेरणा घेऊन, ते लढे करणाऱ्या कार्यकर्त्यांच्या जीवनाशी एकरूप होणारे लेखकच नव्या युगातील नव्या दमाच्या शूर शिपायांचे साहित्य निर्माण करू शकतील. असे साहित्य गेल्या काही वर्षांत लिहिले गेले आहे याचे मला समाधान वाटते. समाजावर भ्रष्टाचाराची मगरमिठी बसली असताना ध्येयवादी कार्यकर्ता त्याविरूद्ध कसा झगडतो, कोणते संघर्ष करतो याचे प्रभावी चित्रण विश्वास पाटील यांनी 'झाडाझडती' या त्यांच्या कादंबरीत केले आहे. 'ताम्रपट' या कादंबरीत रंगनाथ पठारे यांनी महाराष्ट्रातील राजकीय वास्तवावर भेदक प्रकाश टाकला आहे. राजन गवस यांनी लोकपरंपरेशी धागा जोडून समाजातील विविध गटांच्या जीवनाचे वास्तव आणि परिणामकारक चित्र त्यांच्या कादंबऱ्यांमधून रेखाटले आहे. प्रतिमा इंगोले, प्रज्ञा लोखंडे या लेखिकांचे साहित्य वाचल्यावर त्यांनी ग्रामीण भागातील स्त्री जीवनातील संघर्षांचे सम्यक् स्वरूप समाजापुढे मांडावे अशी अपेक्षा माझ्या मनात निर्माण झाली आहे. परिस्थिती विकट असली तरी मानवी मनातील ध्येयवादाचे कधीही निर्मूलन होऊ शकणार नाही. साहित्य क्षेत्रात एकीकडे भोगलोलुप जीवनाचे चित्रण करणारे, सवंग लोकप्रियतेसाठी धडपडणारे लेखक असले, तरी दुसरीकडे सामाजिक बांधिलकी स्वीकारून तडफदारपणे लिहिणारे काही तरुण लेखक-लेखिका आहेतच. त्यांच्यातूनच भारतीय भाषांतील महाश्वेतादेवी, वासुदेव नायर यांच्यासारखे समर्थ लेखक महाराष्ट्रात निर्माण होतील, हा माझ्या मनातील विश्वास व्यक्त करून मी माझे हे स्वैर बोलणे संपवितो.

☐

## स्वागत

- **अमरनाथच्या वाटेवरच्या कथा आणि व्यथा :** अनिल साठ्ये माधवी प्रकाशन पुणे, पृष्ठे ९०
- **गिरगाव ते गोरेगाव :** वासंतिका पुणतांबेकर, प्रपंच प्रकाशन पुणे, पृष्ठे १८७
- **सुवासिनी :** सीमा देव, श्री विद्या प्रकाशन पुणे, पृष्ठे १५५
- **नव्या दिशा बदलते संदर्भ :** माधव गोडबोले, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे २३१
- **प्राक्तनाचे वेध :** एस. डी. इनामदार, कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे, पृष्ठे ३१०
- **नोबल नगरीतील नवल :** सुधीर थत्ते, नंदिनी थत्ते, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ४८
- **नवे गाव नवे पाणी :** व. शं. खानवेलकर, आकाश प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठे ५६
- **जीवनावर प्रेम माझं :** शि. ह. नाईक, आकाश प्रकाशन डोंबिवली, पृष्ठे ८०
- **मला माणसात घ्या :** अच्युत रानडे, नवजीवन मंडळ, पुणे, पृष्ठे ११४
- **अवतरण :** सुदेश शरद लोटलीकर, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १००
- **फ्रेंच परफ्युम :** कल्पना भागवत, मनोहर ग्रंथालय, पुणे, पृष्ठे १९५
- **मनपाखरू :** कल्पना भागवत, मनोहर ग्रंथालय प्रकाशन, पुणे, पृष्ठे २००
- **कोणीही यावे टिकली मारूनी जावे व आमचं टी.व्ही.करण :** अरुण साळवेकर, पृथ्वीराज प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६४, पृष्ठे ३०
- **कविता मनातल्या :** सौ. शोभा बडवे, केदार प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६७
- **तिसेकाठचा वृत्तांत (अनुवाद) :** विलास गिते, साहित्य अकादमी, मुंबई, पृष्ठे ६१६
- **नानासाहेब दांडेकर एक आधार वड :** शरद दांडेकर, प्रकाशक स्वतः लेखक, मुंबई, पृष्ठे २३१
- **गाव शोधतो आहे :** वामन धुमाळ, केदार सप्लायर प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६४
- **काला :** उषा लेले, मुद्रा प्रकाशन, पुणे, पृष्ठे २५६
- **आकाशाशी जडले नाते :** जयंत नारळीकर, राजहंस प्रकाशन, पुणे
- **मन करारे प्रसन्न :** उल्हास लुकतुके व सरिता भावे, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे ११०
- **धर्म :** संजीवनी खरे, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे १०५
- **सप्रेम नमस्कार :** बाळ सामंत, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे १७५

### प्रतिमा प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने

- **सय :** वि. शं. पारगावकर, पृष्ठे १२०
- **निगुडा :** वि. शं. पारगांवकर, पृष्ठे ९४
- **सरदार पटेल आणि भारतीय मुसलमान :** अनुवाद - एकनाथ वपगुळ, पृष्ठे १४३
- **मराठी कादंबऱ्यांची नाट्य रूपांतरे :** कल्पना कामत, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे४२९

## श्रद्धांजली



कै. विश्राम बेडेकर

मोजकीच पण अत्यंत दर्जेदार साहित्य निर्मिती करणारे ख्यातनाम लेखक, सिने-नाट्य क्षेत्रातही आपल्या वैशिष्ट्यपूर्ण कामगिरीने ठसा उमटविणारे ज्येष्ठ साहित्यिक विश्राम बेडेकर यांचे दि. ३० ऑक्टोबर ९८ रोजी सकाळी दु:खद निधन झाले. त्यांच्या निधनाने साहित्य क्षेत्रातील ज्येष्ठ व्यक्तिमत्त्व हरपले, याचे सर्वांनाच दु:ख होत आहे. त्यांची 'रणांगण' ही कादंबरी पन्नास वर्षांहून अधिक काळ साहित्यक्षेत्रात मानाचे स्थान पटाकवून सतत उभी आहे. त्यांनी लिहिलेले 'एक झाड, दोन पक्षी' हे आत्मचरित्रही गाजले आहे. त्याला साहित्य ॲकाडमी पुरस्कार मिळाला आहे. त्यांचे 'ब्रह्मकुमारी', 'टिळक आणि आगरकर' आदि नाटकेही वैशिष्ट्यपूर्ण ठरली आहेत.

'प्रतिभाशक्ती, अभिजात भाषाशैली, तळपणारी नवनवोन्मेषशाली कल्पनाशक्ती आणि विविध अनुभवांची समृद्ध जीवनदृष्टी श्री. बेडेकर यांना लाभली होती. मराठी साहित्यातील नवतेचे मूळ त्यांच्या 'रणांगण' मध्ये शोधता येईल. त्यांच्या कलाकृती संख्येने मोजक्या, पण गुणांनी श्रेष्ठ दर्जाच्या आहेत. खरे सांगायचे तर आंतरराष्ट्रीय वाङ्मयात मानाचे स्थान मिळू शकेल असे ते भारतीय प्रतिभावंत होते!' असे त्यांच्याबद्दल श्री. श्री. पु. भागवत यांनी म्हटले आहे.

कै. विश्राम बेडेकर यांच्या कुटुंबियांच्या दु:खात आम्ही सहभागी आहोत.

परमेश्वर मृतात्म्यास शांती देवो, हीच प्रार्थना!

संपादक



अनुक्रमणिका

## श्रद्धांजली



कै. अनंतराव कुलकर्णी

कॉन्टिनेन्टल प्रकाशनाचे संस्थापक अनंतराव कुलकर्णी यांचे शुक्रवार दि. ६ नोव्हेंबर, १९९८ ला सकाळी दु:खद निधन झाले. केवळ साहित्यावर, साहित्य निर्मितीवरच नव्हे तर या क्षेत्राशी निगडित असलेल्या सर्व मुद्रकांवर, प्रकाशकांवर, पुस्तक विक्रेत्यांवर, लेखकांवर आणि वाचकांवरही खूपच प्रेम करणारे, सर्वांच्या सुखदु:खाशी मनापासून समरस होणारे, सर्वांना संकटात मदत करणारे आणि सर्वांचे सतत भले चिंतणारे आमचे ज्येष्ठ स्नेही, मार्गदर्शक, हितचिंतक आज आमच्यात नाहीत, याचे आम्हाला आणि या साहित्य क्षेत्रातील सर्वांनाच अतीव दु:ख होत आहे.

कॉन्टिनेन्टल प्रकाशनाने साहित्य निर्मितीत स्वत:चा ठसा उमटविलेला आहे. त्यांनी प्रकाशित केलेले ललितसाहित्य गेली कित्येक वर्षे खपाच्या आघाडीवर आहे. श्री. शिवाजी सावंतांचे 'मृत्युंजय', 'छावा', श्री. ना. सं. इनामदारांच्या 'झेप', 'झुंज', 'मंत्रावेगळा' आदि कादंबऱ्या हे त्याचेच उदाहरण आहे. कॉन्टिनेन्टलने म्हणजेच अनंतरावांनी प्रकाशन क्षेत्राला आपली नवी दृष्टी दिली आणि ती जोपासली. कै. अनंतरावांनी खास संपादित करून घेऊन प्रकाशित केलेली नामवंत लेखकांची कथा-कवितांची संपादने अनेक विद्यापीठांच्या अभ्यासक्रमांत नेमली गेली, आजही नेमली जात आहेत, हे त्यांच्या प्रकाशन कौशल्याचेच प्रतीक होय.

त्यांनी प्रकाशित केलेल्या शेतीविषयक पुस्तकांनाही असेच अमाप यश लाभले आहे. या पुस्तकांची त्यांची चोखंदळ निवड हेच त्याचे कारण होय.

अनंतरावांनी लिहिलेली 'मी जेनी', 'राजमाता कुंती', 'तस्मै श्री गुरुवे नम:' आणि 'लेखकाला हे माहीत हवेच !' या पुस्तकांनाही वाचकांनी भरभरून प्रतिसाद दिला.

त्यांनी म. सा. प. ला देणगी देऊन चिं. वि. जोशी पुरस्कार आणि कवी कुसुमाग्रज पुरस्काराची केलेली महत्त्वपूर्ण योजना हे त्यांच्या साहित्य-लेखक प्रेमाचेच प्रतीक होय.

एकूण त्यांनी साहित्य क्षेत्रात केलेली बहुमोल कामगिरी नव्या प्रकाशकांना आणि लेखकांना नेहमीच प्रेरक राहील.

कै. अनंतराव कुलकर्णी यांच्या कुटुंबियांच्या दु:खात आम्ही सहभागी आहोत. परमेश्वर मृतात्म्यास शांती देवो, हीच प्रार्थना !

संपादक



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत

कवी कुसुमाग्रज पारितोषिक वितरण - जागतिक मराठी अकादमी व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने (दि. २७.२.९८) बालगंधर्व रंगमंदिर, पुणे.




डावीकडून परीक्षिका हेमा लेले, अरुणा ढेरे, कुमार केतकर (संपादक महाराष्ट्र टाइम्स, मुंबई) यांचे हस्ते स्वीकारताना कवी सतीश काळसेकर काव्यसंग्रह 'विलंबित' प्रकाशक लोकवाङ्मय गृह प्रकाशन, मुंबई.

